Santa vacanamrta
by
R.D. Ranade

# अध्यात्मग्रंथमाला

" तैसें अध्यात्मशास्त्रीं इये । अंतरंगचि अधिकारिये ।
परि लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ "

ज्ञानेश्वरी १८-१७५०

ग्रंथांक २

# संतवचनामृत





रा. द. रानडे, एम्. ए.



किंमत १॥ रुपया.

## पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें

१ Academy of Philosophy and Religion, Post Deccan Gymkhana, Poona.

२ अध्यात्मविद्यापीठ, पोष्ट निंबाळ, जिल्हा विजापूर.

३ आर्यभूषण प्रेस, पुणें.

४ गणेश प्रिंटिंग वर्क्स, शनिवार पेठ, पुणें.

५ सर्व प्रसिद्ध बुकसेलर्स, पुणें, मुंबई, नागपूर, वगैरे.



हें पुस्तक

रा. गणेश काशिनाथ गोखले यांनीं गणेश प्रिंटिंग प्रेस, जमखंडीकर यांचा वाडा ( पानें १–२३२ ), व रा. अनंत विनायक पटवर्धन यांनीं आर्यभूषण छापखाना ( प्रस्तावना, पानें १–३८) यांमध्यें पुणें येथें छापिलें, व तें प्रो. रामचंद्र दत्तात्रेय रानडे यांनीं पुणें येथें प्रसिद्ध केलें.

# संतवचनामृत.

## प्रस्तावना.

१. अध्यात्मग्रंथमालेच्या या दुसऱ्या पुस्तकांत निवृत्तिज्ञानेश्वरांपासून तों थेट जनार्दनएकनाथांपर्यंत जे संतकवि महाराष्ट्रांत निर्माण झाले त्यांच्या चरित्रांचा व शिकवणीचा थोडक्यांत इतिहास द्यावयाचा आहे. हा जो तीनचारशें वर्षांचा काल आहे त्याचे सहजच तीन भाग पडतात. पहिल्या भागांत निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, व चांगदेव यांच्या अभंगांचा विचार व्हावयाचा आहे. दुसऱ्या भागांत नामदेव व इतर पंढरपुरांतील व पंढरपुरनजीकचे सर्व जातींचे व धंद्यांचे जे भगवद्भक्त होऊन गेले त्यांच्या शिकवणीचा विचार होईल. तिसऱ्या भागांत भानुदास, जनार्दनस्वामी, व एकनाथ यांच्या अभंगांचा विचार होऊन हा ग्रंथांक पुरा व्हावयाचा आहे.

## ज्ञानदेवादि संत.

२. या ग्रंथमालेच्या पहिल्या पुस्तकांत ज्ञानेश्वरांची सर्वांगीण शिकवण कशी होती याचा ज्ञानेश्वरीच्या आधारें आपण ऊहापोह केलेलाच आहे. तेथेंच निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, व मुक्ताबाई यांचें अल्पचरित्रही दिलें आहे, तें वाचकांच्या लक्षांत येईलच. निवृत्तिनाथांचा जन्म शके ११९५ मध्यें होऊन त्यांची समाधि शके १२१९ मध्यें नाशिकजवळ त्र्यंबकेश्वर येथें झाली. ज्ञानेश्वरांचा जन्म निवृत्तिनाथांच्या नंतर दोन वर्षांनीं म्हणजे शके ११९७ मध्यें होऊन त्यांची समाधि निवृत्तिनाथांच्या अगोदर एक वर्ष म्हणजे शके १२१८ मध्यें आळंदी येथें झाली. सोपानदेवांचा जन्म शके ११९९ मध्यें होऊन शके १२१८ मध्यें त्यांची समाधि सासवड येथें झाली. मुक्ताबाईंचा जन्म शके १२०१ मध्यें होऊन त्यांची

समाधि एदलाबाद येथें शके १२१९ मध्यें झाली. निवृत्तिनाथांची समाधि ब्रह्मगिरीच्या पायथ्याजवळच आहे. त्यांस ज्ञानदेव व इतर भावंडें गेल्यावर जिणें जड होऊन "वळचणीचें पाणी आढ्यासि गेलें" असें वाटलें, व जेथें आपल्यास प्रथम गहिनीनाथांचा प्रसाद झाला त्याच ब्रह्मगिरीच्या पायथ्याजवळ त्यांनीं समाधि घेतली, व आपला देह गुरूस अर्पण केला. ज्ञानेश्वरांची ज्यावेळीं आळंदी येथें समाधि झाली, त्यावेळीं निवृत्ति, नामदेव इत्यादि संत तेथें हजर होतेच, व त्या वेळचा सोहळाही फार अवर्णनीय होता. ज्ञानदेव गेल्यावर बरोबर एक महिन्यानें सोपानदेव हे सासवड मुक्कामीं जाऊन तेथें समाधिस्थ झाले. मुक्ताबाईनीं ज्यावेळीं एदलाबादेस समाधि घेतली त्यावेळीं त्या विजेच्या कडकडाटांत निमून गेल्या अशी जी गोष्ट आहे, ती कदाचित् ज्ञानेश्वरांच्या या पुढील अभंगाच्या आधारें लिहिली गेली असेलः—

मोतियांचा चूर फेडिला अंबरीं । विजुचिया परी कीळ झालें ॥
जरी पीतांबर नेसविलें नभा । चैतन्याचा गाभा नीळबिंदु ॥
तळींवरीं पसरे शून्याकार झालें । सर्पाचेंही पिलें नाचूं लागे ॥
कडकडोनि वीज निमालीच ठायीं । भेटली मुक्ताई गोरोबाला ॥
ज्ञानदेव म्हणे कैसी झाली भेट । ओळखिलें अविट आपुलेंपण ॥

३. ज्ञानेश्वरांनीं आपल्या ज्ञानेश्वरीमध्यें जी आपली गुरुपरंपरा दिली आहे तीच निवृत्तिनाथांनीं आपल्या अभंगांत क्रमांक १ मध्यें दिली आहे. मत्स्येंद्रनाथांनीं आपली "मुद्रा" गोरक्षांस दिली, व गोरक्षांनीं गहिनीनाथांवर पूर्ण कृपा केली; गहिनीनाथांपासून निवृत्तीस परमार्थ मिळून त्यांचें सर्व कुळच कृष्णनामानें पावन झालें (क्र. १). गुरु करणें असेल तर जो प्रत्यक्ष देव आपल्या डोळ्यांस दाखवील असाच गुरु करावा, व तनुमनधन त्यास देऊन त्यापासून वस्तु मागून घ्यावी असें निवृत्तिनाथ सांगतात (क्र. ४). देहामध्यें देव आहे हीं गोष्ट खास; परंतु वासना शुद्ध झाल्यावांचून तेथें देव प्रकट होत नाहीं (क्र. ८). अंतःकरण शुद्ध करण्याचा एक मार्ग म्हटला म्हणजे परापवाद अगर परनिंदा कानीं पडल्याबरोबर त्याकडे लक्ष न देतां निजमौन्यानें कृष्णाचा जप करणें हा होय (क्र. १०). स्वतःची स्तुति व दुसऱ्याची निंदा हीं न ऐकतां आपलें भान विष्णुपणामध्यें लोपून जावें (क्र. ११). ज्याच्या मुखांतून नामाची अमृतसरिता अखंड वाहते तोच एक घट पूर्णतेस पोंचला आहे असें समजावें.

(क्र. १६). हें विश्व श्रीकृष्णानें व्यापिलें असल्यानें या जगांत ज्या गोष्टी घड-तात त्या सर्व कृष्णरूपांतच होत जातात (क्र. १९). अंधाऱ्या रात्रीं ज्याप्रमाणें सूर्य उगवावा त्याप्रमाणें श्रीकृष्णाचें रूप उद्यास येऊन गुरुरूपेनें तें केव्हांच अस्तवत नाहीं असा चमत्कार होतो (क्र. २२). ईश्वराचा सुगंध चंदनाच्या वासापेक्षां, जाईजुईच्या परिमळापेक्षां, अगर कल्पतरूच्या सुगंधापेक्षांही श्रेष्ठ आहे (क्र. २७). तेज आणि सुगंधाप्रमाणें ईश्वराचा शब्दही आनंदमय रीतीनें प्राणापानांचें मथन झाल्यावर आंतल्या आंत उमटतो, व त्याच्या अनुसंधानामुळें गुरुनाममंत्र दृढतर होतो (क्र. २९). परंतु या अनुभवाच्या गोष्टी लोकांची बुद्धि विषयविषानें घारिली असल्यानें त्यांस प्रतीत होत नाहींत (क्र. ३१). निवृत्तिनाथ मात्र चातकाप्रमाणें हरीस्तव आकाशाकडे दृष्टि ठेवून वरती पाहतात (क्र. ३२) एखाद्या दिवट्याप्रमाणें देहांत परापश्यंत्यादि चारी वाटा देव प्रकाशमान करतो. (क्र. ३४); त्या तेजांत ताराग्रहमंदिनी यांचा लोप होऊन सर्वत्र जनार्दनरूप भासतें (क्र. ३६). आकाशांतील पोकळी नाहींशी होऊन तेथेंहि हरि घनदाट भरलेला दिसतो (क्र. ३७). निवृत्तिरूप घट सर्वत्र बिंबलेला दिसत असल्यानें आत्मरूप पाहण्यास दर्पणाची जरूरी रहात नाहीं (क्र. ३८). हें आत्मरूपच गोसावीरूपानें अगर गहिनीरूपानें आम्हांस दिसतें (क्र. ४१); आणि देव व भक्त व गुरु यांचा त्रिवेणीसंगम होऊन सर्व विश्वच देवानें भरलेलें दिसतें (क्र. ४३), अशी एकंदरींत निवृत्तिनाथांची शिकवण आहे.

४. निवृत्तिनाथांच्या अभंगचर्चेनंतर आपण आतां ज्ञानेश्वरांच्या अभंगचर्चेकडे वळूं. येथें ही एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं कांहीं वर्षांपूर्वी रा. भारद्वाज यांनीं अभंगकार ज्ञानेश्वर निराळे, व ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वर निराळे, अशी एक कल्पना पुढें मांडली होती. त्यावेळीं रा. भिंगारकर यांनीं न्यायमूर्ति रानडे वगैरेंच्या सहाय्यानें त्यांच्या मताचें सप्रमाण खंडण केलें होतें. हा वाद येथें पूर्ण-पणें पुनः सांगण्याचें कारण नाहीं. तथापि ज्ञानेश्वरीकार व अभंगकार हे दोन निरानिराळे होते किंवा काय याबद्दलचा खुलासा थोडक्यांत येथें करणें जरूरीचें आहे. रा. भारद्वाज यांच्या मतें (१) ज्ञानेश्वरीकार ज्ञानदेव हे आपेगांवास असून ते शैव होते, व अभंगकार ज्ञानदेव हे आळंदीस असून ते विठ्ठलभक्त होते. (२) आपेगांव येथें जी दुहेरी समाधि दाखविण्यांत येते, त्यांपैकीं एक ज्ञानेश्वरांचें -पणजे त्रिंबकपंत यांची मानिली, तथापि दुसरी समाधि ज्ञानेश्वरांची आहे असें

मानण्यास हरकत नाहीं. याचें कारण एक तर या ज्ञानदेवांच्या समाधीचा उत्सव कार्तिक वद्य १२।१३ स होतो. व दुसरें, आपेगांव येथील कुलकर्ण्यांच्या दप्तरावरून या "ज्ञानेश्वरांच्या समाधीकडे" जमीन लावून दिली गेली आहे ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होते. ( ३ ) शिवाय अभंगांची व ज्ञानेश्वरीची भाषा इतकी भिन्न आहे कीं त्या दोहींचा कर्ता एकच असूं शकत नाहीं. या तीन्ही मुद्यांस पुढीलप्रमाणें उत्तरें देतां येण्याजोगीं आहेत. ( १ ) आपेगांवकर ज्ञानदेव हे जर शैव होते तर आपेगांवच्या समाधीच्या मागें विठ्ठलरखुमाईच्या मूर्ति कां आहेत ? व आळंदीकार ज्ञानेश्वर हे जर रा. भारद्वाज यांच्या मताप्रमाणें विठ्ठलभक्त होते तर त्यांनीं सिद्धेश्वरापुढें म्हणजे शिवाच्या लिंगापुढें समाधि कां घेतली ? या गोष्टींचा उलगडा असा आहे कीं, ज्ञानेश्वरीकार व अभंगकार एकच असल्यानें त्यांस शिव असो अगर विठ्ठल असो, यांमध्यें भेद नव्हता. ज्ञानेश्वरीमध्यें विठ्ठलभक्ति आहे किंवा नाहीं याची चर्चा या मालेंतील ग्रंथांक १ च्या प्रस्तावनेंत केलीच आहे. त्यावरून असें निष्पन्न होतें कीं, ज्ञानेश्वरींत विठ्ठल असा शब्द जरी आला नसला तथापि ज्ञानेश्वरीकाराचा विठ्ठलभक्तीशीं खात्रीनें परिचय असावा असें दिसतें. तसेंच अभंगांमध्यें केवळ विठ्ठलभक्ति नसून "स्वर्ग जयाची साळोंखा" अशा प्रकारच्या त्रिभुवन व्यापणाऱ्या शिवाच्या लिंगाचीही भक्ति सांगितली आहे. (क. ६६ ). ( २ ) आपेगांव येथें ज्या समाधीचा कार्तिक वद्य १२ स व १३ स उत्सव होतो ती ज्ञानेश्वरांची मूळची समाधि नसून ती केवळ ज्ञानेश्वरांच्या नांवानें केलेली असावी असें दिसतें. अशाच प्रकारच्या ज्ञानेश्वरांच्या समाधि नानज, पुंसेसावळी, वगैरे ठिकाणीं आहेत. संतांस मान देण्याच्या इच्छेनें, अगर त्यांची स्मृति रहावी म्हणून, अगर त्यांची भक्ति वाढविण्याच्या इच्छेनें त्यांच्या समाधि एकापेक्षां जास्त ठिकाणीं करण्यांत येतात हें सर्वविश्रुतच आहे. शिवाय ज्ञानेश्वरांचा जन्म आपेगांव येथें झालेला असल्यानें त्यांची खरी समाधि आळंदी येथें असली, तथापि त्यांच्या नांवानें आपेगांवास दुसरी समाधि करणें हेंही योग्यच ठरतें. याच समाधीचा उत्सव चालावा म्हणून आपेगांवचें उत्पन्न या समाधीकडे लावून दिलें असावें. ( ३ ) आतां ज्ञानेश्वरी व अभंग यांची भाषा भिन्न आहे म्हणून ज्ञानेश्वर दोन निरनिराळे समजले पाहिजेत, या मतास उत्तर इतकेंच आहे, कीं अभंगाची भाषा नेहमीं लोकांच्या तोंडांतून गेली असल्यानें ती ज्ञानेश्वरीच्या भाषेपेक्षां किंचित् आधुनिक दिसते यांत संशय नाहीं. ज्ञानेश्वरी हा अन्वय-

नाचा ग्रंथ आहे, आणि अभंग हे पाठ म्हणण्याचे आहेत. अभंगांतील व्याकरणाचीं रूपें अगदीं ज्ञानेश्वरीबरहुकूम कां नाहींत याचेंही हेंच कारण आहे. तथापि ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं बरेचसे मूळचे शब्द जे ज्ञानेश्वरींत येतात ते अभंगांतही दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ, " साइखेडिया, बिक, पालेजोनि, नीचनवा, बरवंट, बुंथी, गळाळा, संवसाटी, खडाणी, सिंतरणें, वांडेंकोडें पारिखे, " व असेच कित्येक शब्द ज्ञानेश्वरी व अभंग यांत सारखेच आहेत. यावरून ज्ञानेश्वरी व अभंग यांचें शब्दभांडार एकच आहे हें सिद्ध होतें. (४) या तीन वर दिलेल्या कारणांखेरिज आणखीही कांहीं कारणें दोनी ज्ञानेश्वर एकच होत हें दाखविण्याकरितां देतां येण्याजोगीं आहेत. त्यांतून आपण येथें एकाचाच विचार करूं. शब्दभांडाराप्रमाणेंच ज्ञानेश्वरी व अभंग, अगर अमृतानुभव आणि अभंग, यांचें विचारभांडारही एकच आहे हें सहज दाखवितां येण्याजोगें आहे. हा विषय मोठा असून याचा कोणी सांगोपांग अभ्यास केला पाहिजे. तूर्त दोन चारच मासले येथें दाखवितों. या पुस्तकांत दिलेल्या ज्ञानेश्वरांच्या अभंगांतील क्रमांक ९३ " मलयानिळ शीतळु । पालवी नये गाळु । सुमनाचा परिमळु । गुंफितां नये "; क्रमांक ३५ " श्रीगुरु सारिखा असतां पाठिराखा ।...राजयाची कांता काय भीक मागे । कल्पतरुतळवटीं जो कोणी बैसला । काय वाणी त्याला सांगिजो जी "; क्रमांक १३ " सर्पें पैं दर्दुर धरियेला रे मुखीं । तेणेंही रे माशी धरियेली पक्षीं "; क्रमांक ५ " मिथ्या मोहफांसा । शुकनळिके जैसा । मुक्त परि आपैसा । पळों नेणे "; पुनः क्रमांक ५ " राखोंडी फुंकितां दीप न लगे "; क्रमांक १०० " दिसतें परी न धरवे हातें । तें सतातें पुसावें " या सर्वांस ज्ञानेश्वरींतून अत्यंत सदृश अशा ओंव्या सहज दाखवितां येतील. त्याप्रमाणेंच ज्ञानेश्वरांचे आणखी कांहीं अभंग " मृगजळाच्या जळीं । चारिशी जळचरें "; " स्तुति ते तुझी निंदा । स्तुतीजोगा नव्हेसी गोविंदा "; यांस व ज्ञानेश्वरअभंगांच्या क्रमांक ८६ मधील " नारीपुरुष दोघे । एकरूपें दिसती । ज्ञानदेव म्हणे शिव तेचि शक्ति । पाहतां व्यक्तीं व्यक्त नाहीं " यास सदृश उतारे अमृतानुभवांतून दाखवितां येतील. एकंदरींत ज्ञानेश्वरी व अभंग, आणि अमृतानुभव व अभंग, यांमध्यें कल्पनांचें इतकें साम्य आहे कीं, ज्ञानेश्वरी व अमृतानुभव ज्या लेखणींतून उतरले त्याच लेखणींतून अभंगही उतरले असले पाहिजेत असें निश्चित रीतीनें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं.

५. आतां आपण या पुस्तकांत घेतलेल्या ज्ञानेश्वरांच्या अभंगांच्या चर्चेकडे वळूं. एकंदरींत ज्ञानेश्वरांचे अभंग इतके चांगले आहेत, आणि त्यांतल्यात्यांत साक्षात्कारविषयक अभंग इतके उत्कृष्ट आहेत, कीं ते त्या बाबतींत ज्ञानेश्वरीसही थोडेंबहुत मागें टाकतील असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्ञानेश्वरीमध्यें जसें ज्ञानेश्वरांचें उच्च दर्जाचें तत्त्वज्ञान दिसतें, त्याप्रमाणें त्यांच्या अभंगांमध्यें भक्तिरस व स्वानुभव हीं विशेषेंकरून दिसतात. प्रथमच ज्ञानेश्वरांनीं सकळ मंगळनिधि श्रीविठ्ठलाचें नाम घ्या असें सर्वांस विनविलें आहे ( क्र. १ ). इतर कांहींच न जाणतां एक विठ्ठल जाणल्यास पुरे; हींच भक्ति व हेंच ज्ञान, असें ज्ञानेश्वरांनीं सांगितलें आहे ( क्र. २ ). बहुत सुकृताची जोडी असेल तरच विठ्ठलावर आवड उत्पन्न होते, असें त्यांचें म्हणणें आहे ( क्र. ३. ). पुत्र, दारा, धन हीं सर्व काळाचें खाद्य असल्यानें आपणांस शुकाप्रमाणें नळिकेस लटकावून घेऊन आपण बद्ध आहों अशी भावना करून घेऊं नये; राखुंडी फुंकून ज्याप्रमाणें दीप लागत नाहीं, त्याप्रमाणें शब्दज्ञानानें आत्मप्रकाश होत नाहीं ( क्र. ५ ). आमिषाकडे लक्ष ठेवून जसें बक ध्यान करतो, त्याप्रमाणें ध्यान करूं नकोस ( क्र. ७ ). तुला पापांतून सुटका हवी असेल तर तूं गुरूस शरण जा ( क्र. ९ ). गुरुनाथानें मस्तकीं हस्त ठेविल्यावांचून मनास समाधान प्राप्त होणार नाहीं ( क्र. ११ ). गुरु हा एक संतकुळींचा राजाच आहे; गुरूस सुखाचा सागर अगर धैर्याचा डोंगर असेंही म्हणतां येईल (क्र. १२). सर्प बेडूक गिळीत असतां बेडकानें जसा मासा खावा त्याप्रमाणें तूं काळांच्या सपाट्यांत सांपडला असतांना विषयलोलुप होऊं नकोस ( क्र. १३ ). ज्या नामानें ध्रुव, प्रल्हाद, अंबरीष तरले, तेंच नाम सार आहे असें समज ( क्र. १४ ). नाम घेण्यास अधिकार व अनाधिकार असें कांहीं नसून केवळ त्याच्या उच्चारानेंच मोक्ष मिळतो ( क्र. १६ ). नाम ही श्रेष्ठांतील श्रेष्ठ वस्तु आहे ( क्र. १८ ). जन्मजन्मांतरींच्या पुण्याचा संचय असेल तरच रामाचें नांव वाचेस येईल (क्र. १९). नामानें क्षणार्धांत पापराशि दग्ध होतील (क्र. २०). नाम उच्चारण्यास काळ वेळ वगैरे पाहण्याचें कारण नाहीं ( क्र. २४ ). एकतत्त्व नामाचें साधन केलें असतां केव्हांही द्वैताची बाधा होणार नाहीं; नामामृतगोडी लाधल्यास ती एक जीवनकळाच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं ( क्र. २५ ). अर्धघटिकाही नामस्मरणावांचून राहूं नको ( क्र. २६ ). एकतत्त्वनाम तूं हृदयांत दृढ धरशील तर हरीस तुझी खात्रीनें करुणा येईल; ज्ञानेश्वरानें मौन्यरूप जपमाळ

अंतरीं धरल्यानें ( क्र. २७ ), व वैकुंठाचा पाठ चालविल्यानें, त्यास हरि हा घनदाट भरलेला दिसत आहे ( क्र. २८ ). ज्यांनीं ज्यांनीं रामकृष्णटाहो फोडला त्यांस वैकुंठभुवनांतलें घर मिळालें आहे ( क्र. २९ ) भानुबिंबाप्रमाणें हे साधु निर्मळ व अलिप्त आहेत. ( क्र. ३० ) त्यांची भेट आज होणार असल्यानें बाहेरच्या दोन भुजा, व आंतल्या दोन भुजांनीं जणूं कांहीं चतुर्भुज होऊन मी त्यांस अलिंगन देण्यास धांवत आहे ( क्र. ३१ ). व्यासांच्या खुणेनें ज्ञानेश्वर सांगतात कीं, अशा भक्तांच्या घरीं देव राबतो ( क्र.३२ ). पूर्वजन्मांमध्यें मी फार सुकृतें केलीं म्हणून आज संतदर्शन झाल्यानें तीं फळास आलीं असें मी समजतों; आज अंतःकरणांत परमानंद उत्पन्न होऊन अचेतनास प्राण मिळावा, वत्सास धेनु भेटावी, अगर कुरंगिणीस पाडस मिळावें, तसें झालें आहे ( क्र. ३३ ). श्रीगुरुसारिखे पाठिराखे असतां दुसऱ्या कोणत्याही गोष्टीची काळजी करण्याचें कारण नाहीं; ज्याप्रमाणें राजाच्या कांतेस भीक मागावी लागत नाहीं, अगर कल्पतरूच्या छायेखालीं जो बसला त्यास कोणत्याही गोष्टीची उणीव पडत नाहीं, त्याप्रमाणें श्रीगुरूंनीं सांभाळ केला असतां आपले सर्व मनोरथ पूर्ण होतात ( क्र. ३५ ).

६. ज्ञानदेवांमध्यें वैराग्ययुक्त बोल फारसे दिसत नाहींत. नामदेवतुकारामांच्या अंतःकरणांत देवाच्या प्राप्त्यर्थ ज्याप्रमाणें खळबळ उडून राहिली, अगर देवाची कृपा होण्याकरितां ज्याप्रमाणें रामदासांनीं असंख्य करुणाष्टकें केलीं, त्याप्रमाणें वैराग्ययुक्त बोल ज्ञानेश्वरांमध्यें फारच थोडे सांपडतात. ज्ञानेश्वरांस ईश्वरप्राप्त्यर्थ फारच थोडे श्रम पडले असावे असें वाटतें. त्यांच्या सर्व ग्रंथांत येथपासून तेथपर्यंत आनंदाची व अधिकाराची वाणी दिसते. ज्ञानेश्वरींत तर अंतःकरणाच्या तळमळीचे फारसे उद्गार दिसतच नाहींत. ज्ञानेश्वरांच्या अभंगांत मात्र चार दोन ठिकाणीं असे वैराग्याचे बोल आहेत, त्यांचा जिज्ञासूंनीं अवश्य अभ्यास करावा. क्रमांक ३७ मध्यें देव जवळ असून त्याची भेट होत नाहीं याबद्दल ज्ञानेश्वर दिलगिरी प्रगट करितात. क्रमांक ३८ मध्यें आपल्या अंगावरचें घोंगडें फाटलें असल्यानें आपल्यास धडौता करण्याविषयीं त्यांनीं देवास विनंति केली आहे; माझें घोंगडें फाटलें असल्यानें मला दुसरें घोंगडें केव्हां प्राप्त होईल याबद्दल मला रात्रंदिवस चिंता वाटत आहे, असें ज्ञानेश्वर म्हणतात; नवीन घोंगडें घेण्यास जवळ वित्त नाहीं; उघड्या पाठीवर हींव वाजत असल्यानें देवास घोंगडें देण्याबद्दल त्यांनीं प्रार्थना केली आहे. क्रमांक ३९ मध्यें जिचा भ्रतार परदेशास गेला आहे,

अशा विरहिणी स्त्रीच्या रूपकानें त्यांनीं गरुडवाहना, गंभीरा, मला लौकर भेट दे अशी ईश्वराची प्रार्थना चालविली आहे; रजनी दिवसाप्रमाणें होऊन मला रात्रीं डोळाही लागत नाहीं; मला अवस्था लाऊन गेला तो अजून कां येत नाहीं; अशी देवाच्या भेटविषयीं त्यांनीं उत्कंठा दर्शविली आहे. क्रमांक ४० मध्यें याच विरहिणीचा विरह जाज्वल्यदशेप्रत जाऊन आपल्या भ्रताराची भेट होत नाहीं म्हणून तिला फार वेदना होत आहेत; चंद्र, अगर चांफा, अगर चंदन, यांच्या योगानें मनांतील दुःख वाढत मात्र आहे; चंदनाचे चोळीनें माझें सर्वांग पोळत आहे; पुष्पांची शेज शीतळ म्हणतात, पण ती आगीप्रमाणें माझ्या अंगास पोळत आहे; कोकिळांनों, तुम्हीं सुस्वर गातां, पण त्याच्या योगानें माझ्या अंतःकरणांतील दुःख जास्तच वाढत आहे; दर्पणांत पहात असतां माझें रूप मला दिसत नाहीं, अशी देवकीनंदनानें माझी स्थिति केली आहे, असें ज्ञानेश्वर म्हणतात. क्रमांक ४१ मध्यें " पुरे पुरे आतां जड झालें जिणें " असें ज्ञानेश्वर म्हणतात; जेथें तेथें तूंच पूर्वीं दिसत असून आतां तूं लपून मजशीं अबोला कां धरिलास असें ज्ञानेश्वर देवास विचारतात. नभ नभांत मिसळून कालिंदीजलास क्षोभ आल्यानें तुझें रूप पहावयास सर्व जगाचे डोळे उत्सुक झाले आहेत; तूं आपल्या कटीवर हात ठेवून भवजलाब्धीचा अंत इतकाच आहे असा जनांस संकेत दाखवित आहेस; आमच्या हृदयांतील दिसणारी श्रीमूर्ति विठ्ठलवेषाचें आवरण घेऊन आम्हांस चाळवित मात्र आहे; तूं कितीही वंचना केलीस तरी माझ्या चित्तांत पालट होणार नाहीं; बाप रखुमादेविवरा विठ्ठला, तूं मजशीं अबोला कां धरिलास; तुझ्याशीं संभाषण न झाल्यानें माझ्या कुडींतून प्राण बाहेर निघूं पाहत आहे, असें ज्ञानेश्वर म्हणतात ( क. ४२ ).

७. ज्ञानेश्वरांस साक्षात्कार झाला त्याचा मूळ पाया निवृत्तिनाथांनींच घातला असें ज्ञानेश्वरांचें म्हणणें आहे. ज्यावेळीं निवृत्तिनाथांनीं मला उपदेश दिला त्यावेळीं तेथें एक वृक्ष होता; त्याच्या तळीं योग्य रीतीनें बसवून त्यांनीं मला नामामृत पाजलें; अशा निवृत्तिनाथांच्या धर्माची भरभराट होवो असें ज्ञानेश्वर म्हणतात. त्यांनीं मला परमार्थाचें रहस्य दाखविल्याबरोबर माझें अंधत्व नाहींसें झालें ( क. ४३ ). करतलावर ज्याप्रमाणें आंवळा द्यावा त्याप्रमाणें परमार्थाचें सर्व वर्म निवृत्तिनाथांनीं माझे हातीं दिलें ( क. ४४ ). ज्ञानेश्वरांनीं आपल्या परमार्थमार्गांतील जे जे अनुभव सांगितले आहेत ते ते

सर्व साधकांनी ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत. रक्त, शुभ्र, नील, पीत, वर्ण समजून तुम्हीं मौन्यानें रहा असें ज्ञानेश्वरांचें म्हणणें आहे ( क्र. ४५ ). काळा, निळा, पारवा अखंड तमाशा डोळ्यापुढें दिसून ( क्र. ४६ ), देवाचें बरवें कृष्णवर्ण अमोलिक रूप मला दिसलें ( क्र. ४७ ); जणूं कांहीं मला काळा दादुला पाचारीतच आहे असें वाटूं लागलें, असें ज्ञानेश्वर म्हणतात ( क्र. ४८ ). हा जो गगनांत नांदणारा कृष्णवर्ण पुरुष तोच आत्मरूपानें मी या दृष्टीनें पाहिला ( क्र. ५० ). जिकडे तिकडे नीलप्रभा फांकून तिनें सर्व आकाश व्यापून टाकिलें ( क्र. ५३ ). ही अनुभवाची खूण बोटानें दाखवितां येण्याजोगी नाहीं; आपण गुरुपुत्र होऊन तिचा अनुभवच घ्यावयास पाहिजे; ज्या ठिकाणीं स्वरूप चळणार नाहीं व ढळणार नाहीं, त्या ठिकाणींच तें पहावें; ज्याच्या सत्तेनें सर्व विश्व चालतें, जें मागें पुढें बरोबर नेहमीं असतें, जें पायाखालीं तुडविलेंही जातें, जें दृष्टीपुढें सर्वदा दिसतें, तें बोटानें दाखवितां येणें शक्य नाहीं. ही खूण समजून तिच्या यथार्थतेबद्दल गुरुपुत्रास जाऊन प्रश्न करा, असें ज्ञानेश्वर सांगतात ( क्र. ५४ ). पाहतां पाहतां पाहण्याचा भाव नष्ट झाल्यानें मौन्यच धरावें लागतें; म्हणून अनुभवी जो मनुष्य आहे त्याचें बोलणें खुंटतें असें समजावें ( क्र. ५५ ). जें बुडणार नाहीं, ज्याचें आकलन करतां येणें शक्य नाहीं, जें चोराचे हातीं लागणार नाहीं, असें अमोलिक रत्न तुझ्या हातीं सांपडलें आहे ( क्र. ५६ ). सतेज व उत्तम आकाराचें, ज्याच्या अष्टही अंगांतून ज्योतीचा प्रकाश बाहेर पडत आहे, अशा मोत्याचा लाभ तूं करून घे ( क्र. ५७ ). तें कोठें बाजारांत सांपडणार नाहीं, अगर शहरांत सांपडणार नाहीं; फक्त लक्षरूप लक्षाच्या मोलानें मात्र तें मिळेल ( क्र. ५८ ). ज्यानें शून्य शोधिलें नाहीं त्याचें जिणें केवळ गाढवाचें होय; शुभ्र, श्वेत, ताम्र, नील वर्णाचें शून्य पहावें (क्र. ५९). या शून्याचा शेवट तो डोळ्यानेंच आपला डोळा पहावा ( क्र. ६२ ). ज्ञानेश्वरांस निवृत्तीनीं हा नयन दाखविल्यानें त्यांस हा नयनच सर्व ठिकाणीं दिसूं लागला ( क्र. ६३ ). त्यांच्या शरीरांत ज्योतिलिंग उगवून त्यांनीं हस्तावांचून त्यास कवळिलें ( क्र. ६५ ). ज्याची स्वर्ग ही शाळुंका आहे, समुद्रवलय ही पिंडी आहे, शेषाप्रमाणें ज्याची बैठक आहे, जें तिहीं लोकांस आधारभूत आहे, तें लिंग मी देखिलें देखिलें असें ज्ञानेश्वर म्हणतात. मेघधारारूप धार त्याजवर धरिली, तारारूपी पुष्पांनीं त्यास पूजिलें, चंद्रफळ त्यास अर्पण केलें, रविरूपी दिव्यानें त्यास ओंवाळिलें, व शेवटीं आत्मनैवेद्य त्यास

समर्पण करून त्या ज्योतिर्लिंगाचें आपल्या हृदयांत मी ध्यान केलें असें ज्ञानेश्वर सांगतात (क्र. ६६). त्याचें तेज चंद्रसूर्यापेक्षांही जास्त होतें. (क्र. ६९.) तें अणुप्रमाण असूनही जगाची उत्पत्ति त्यापासूनच होते असें माझ्या अनुभवास आलें, असें ज्ञानेश्वर म्हणतात (क्र. ७१). रात्रीस सूर्याचा व दिवसास चंद्राचा उजेड असा विपरीत चमत्कार मीं पाहिला. ज्यास उदय नाहीं व अस्त नाहीं, असा आपल्यास आपण दर्पणच होऊन मी ठेलों. ही खूण अनुभवी लोकांसच कळणार. ही खूण सांगितली असतां संत संतुष्ट झाले असें ज्ञानेश्वर म्हणतात (क्र. ७२). नाद असो अगर ज्योति असो, दोहींच्या योगानें परिपूर्ण असा आत्मा माझ्या नजरेस आला (क्र. ७३). जो योगी अष्टांगसाधन करितो त्यास याच मार्गानें आत्मप्राप्ति होते, असें ज्ञानेश्वर सांगतात (क्र. ७४).

८. ज्ञानेश्वरांच्या अनुभवाची याच्याहीपुढें बहार आहे. देवाचें रूप पाहिल्यावर ज्ञानेश्वरांस मौन पडलें, व पुढें बोलवेनासें झालें, असें तें म्हणतात (क्र. ७६). देवांचा जो देव तो मी पाहिला पाहिला, असें ज्ञानेश्वर द्विवार सांगतात. मी त्यांस अनंतरूपानें व अनंतवेषानें पाहिल्यानें माझा संदेह फिटून गेला (क्र. ७७). सबाह्य अभ्यंतर व्यापक अशा देवास निश्चयपूर्वक पाहिल्यानें आज दिवस सोनियाचा झाला आहे, व जणूं कांहीं अमृताचा वर्षावच होत आहे असें वाटतें. (क्र. ७८). मुक्यास जसा आपला आनंद व्यक्त करतां येत नाहीं, तशी माझी स्थिति झाली आहे (क्र. ७९). माझेंच रूप सर्वत्र दिसत असल्यानें मी आनंदांत मुरून गेलों आहें (क्र. ८०). हा आनंद माझ्या आंत न मावतां लोकांच्या नजरेस दिसूं लागला आहे (क्र. ८१). कापराची वात उजळून ती जशी आपल्यामध्येंच लीन व्हावी, तसा मी माझ्या आनंदांतच मुरून गेलों आहें (क्र. ८२). अंगणांत कोण बोललें म्हणून पाहूं गेलों असतां मी पंढरिरायास पाहिलें; व त्यामुळें जागृति, स्वप्न, सुषुप्ति, व तुर्या या अवस्थांमधील भेद नाहींसा झाला (क्र. ८४). नारी व पुरुष दोघे एकाच रूपानें दिसतात, असें मी नवल पाहिल्यानें शिव तोच शक्ति, व शक्ति तोच शिव, अशी माझी खात्री पटली (क्र.८६). तें रूप पहात असतां माझें पात्यास पातें सुद्धां लागण्याचें राहिलें (क्र ८८); व त्या रूपाकडे पाहतां पाहतां मी तन्मय होऊन गेलों (क्र. ८९). मी हें देखणें पाहिल्यावर प्रथम माझी दृष्टि गेली; मी बाह्या उचलून त्यास क्षेम द्यावयास गेलों; आनंदानें "अगा, गुरुनाथ, देवराया" असें म्हणून मी स्फुंदल्यानें माझ्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहिल्या

( क्र. ९० ). मी त्यांस क्षेम देऊं गेलों तसा तो माझ्या अंगांतच जडून गेला; याची आशा केली असतां हा पळून जातो, पण निराश बनल्यास तो तत्काळ पावतो, असा याचा चमत्कार आहे ( क्र. ९२ .) याच्या स्वरूपाचा निर्धार करणें अशक्य आहे. जसा मलयानिल पदरांतून गाळतां येत नाहीं, अगर फुलांच्या वासाचा हार गुंफितां येत नाहीं, अगर मोत्यांचें पाणी रांजणांत भरतां येत नाहीं, तसें याचें वर्णनही करतां येणें अशक्य आहे ( क्र. ९३ ). मी देह बळी दिल्यानेंच याची मला प्राप्ति झाली; या निराकारास चंदन ज्याप्रमाणें भरावा, अगर अश्वत्थ ज्याप्रमाणें फुलावा, त्याप्रमाणें मी पाहिलें. आतां प्रपंच पाहणें पुरे; स्वरूपाच्या आनंदांत राहणें हेंच श्रेष्ठ होय, अशी माझी खात्री पटली ( क्र. ९४ ). आंत विठ्ठल, बाहेर विठ्ठल, मीच विठ्ठल, असें मला आतां वाटूं लागलें ( क्र. ९६ ). ध्याता व ध्येय यांमधलि भेद नाहींसा झाल्यानें देवा, तूं व मी आतां एकच घोंगडें पांघरूं, असें मी म्हणूं लागलों ( क्र. ९६ ). मी माझे गुरु जे श्रीनिवृत्ति तद्रूपच बनलों ( क्र. ९७ ). रखुमादेवीवरास मी चक्षूंविण पाहिलें, व हातावांचून स्पर्श केला ( क्र. ९९ ). जें दिसतें पण हातीं धरवत नाहीं, त्याची खूण संतांस पुसावी, असें ज्ञानेश्वर म्हणतात ( क्र. १०० ). रखुमादेवीवरास मी देहावांचून आलिंगन दिलें ( क्र. १०१ ). त्यानें मला भेट दिली; तरी तो मजशीं संभाषण करीना, म्हणून माझा जीव लांचावून गेला ( क्र. १०२ ). ज्याच्या निढळावर कोटिचंद्र प्रकाशमान होतात, जो कमळनयन आपलें हास्यवदन दाखवीत आहे, तोच आतां हालूं व डोलूं लागला; उभा राहून हातानें खुणावूं लागला; व घडोघडीं गुजगोष्टी सांगूं लागला ( क्र. १०३ ). ज्या नरास आत्मज्ञानाच्या गोष्टी माहीत नाहींत त्यास या स्थितीचें वर्म कळणार नाहीं ( क्र. १०४ ); म्हणून या गोष्टींचा मूर्खापुढें उलगडा करूं नये असें ज्ञानेश्वर म्हणतात ( क्र. १०५ ).

९. ज्ञानेश्वरांच्या अभंगचर्चेनंतर आपण सोपान, मुक्ताबाई व चांगदेव यांच्या अभंगचर्चेकडे वळूं. जो सर्वदा रामकृष्णध्यान करितो त्यास नानायोनिरूप आपदा भोगाव्या लागत नाहींत, असें सोनापदेव सांगतात ( क्र. १ ). या जगांत सर्व कांहीं सोवळें आहे, फक्त अभक्तांचें मन मात्र ओंवळें आहे; सोपानदेवाचें मोठें प्रचंड सोवळें असून, ते हरीविण वितंड बोलतच नाहींत असें ते म्हणतात ( क्र. २ ). देवामध्यें लीन होऊन आपण सुखदुःख

विसरावें असें त्यांचें म्हणणें आहे ( क्र. ४ ). भक्तियुक्त गोपाळांचा शब्द कानावर पडल्याबरोबर देव त्यांस सामोरा येतो, असें सोपानदेव म्हणतात ( क्र. ५ ) मुक्ताबाईंनीं आपण अंध वाया जात असतांना निवृत्तिनाथांनीं आपल्यास कसें सावध केलें याचें वर्णन केलें आहे ( क्र. १ ). आम्ही या परमार्थनदींतून निवृत्तिनटाकानें गेल्याकारणानें आपल्या ध्येयास जाऊन पोंचलों, असें मुक्ताबाई सांगतात ( क्र. २ ). आकाशांत मुंगी उडून तिनें सूर्यास झांकून टाकिलें; वांझेस देवरूपी पुत्र निर्माण झाला; शेषानें विंचवास नमन केलें; माशीएवढी आस्रांत विऊन त्यांतून घार निर्माण झाली; व तें पाहून मुक्ताबाईस हंसें आलें, असें त्या म्हणतात ( क्र. ४ ). दिवसास चांदणें दिसून रात्रीं उष्णतेज पडल्याप्रमाणें वाटतें, असें मुक्ताबाईंनीं म्हटलें आहे ( क्र. ५ ). चंद्नाच्या वासानें वनांतील सर्व झाडें जशीं सुवासिक व्हावींत, त्याप्रमाणें श्रीहरीची सेवा केली असतां मनुष्य हरिरूपच बनतो, असें मुक्ताबाईचें म्हणणें आहे ( क्र. ६ ).

१०. ज्ञानदेवादि चार भावंडांशीं ज्यांचा अत्यंत संबंध आला असे पुरुष म्हणजे चांगदेव हे होत. चांगदेव चौदाशें वर्षें जिवंत राहिले अशी जी एक समजूत आहे तिचा अर्थ इतकाच कीं, एक तर चांगदेव या नांवाचे चौदा निरनिराळे पुरुष होऊन गेले, अगर निळोबांनीं म्हटल्याप्रमाणें चांगदेव या नांवाच्या व्यक्तीस चौदा निरनिराळीं नांवें पडलीं. निळोबांनीं एकाच व्यक्तीस चौदा निरनिराळीं नांवें होतीं असें जें म्हटलें आहे तें अशक्य दिसत नाहीं. आत्माराम या नांवाच्या रामदासपंथांतील एका कवीनें " दासविश्रामधाम " या नांवाचा जो एक ग्रंथ लिहिला आहे त्यांत प्रत्यक्ष रामदास यांस " विप्र, फकीरजिंदा, रामीरामदास " वगैरे निरनिराळीं नांवें होतीं असें लिहिलें आहे. एकंदरींत ही गोष्ट खरी आहे कीं, चांगदेव या नांवाचा जो प्रसिद्ध पुरुष होऊन गेला त्याचा जन्मशक माहीत नसला तरी त्याची समाधि गोदावरीनदीवर पुणतांबें या गांवीं शके १२२७ मध्यें झाली. या चांगदेवाचा ज्ञानदेवादि चारी भावंडांशीं जरी संबंध आला होता, तथापि त्यांतल्या त्यांत ज्ञानेश्वर व मुक्ताबाई यांच्याशीं त्याचा संबंध जास्त आला. चांगदेव व ज्ञानदेव यांचा संबंध म्हणजे हठयोग व राजयोग यांचा संबंधच होय. चांगदेव हठयोगांत फार निष्णात होता व त्यानें पाठविलेल्या कोऱ्या कागदास उत्तर म्हणून ज्ञानदेवांनीं " चांगदेवपासष्टी " या नांवाचें पासष्ट ओव्यांचें एक पत्र त्यास पाठविलें आहे. या पत्राच्या योगानें

चांगदेवाचें गर्वहरण होऊन हठयोग सोडून परमार्थसाक्षात्कार व्हावा या हेतूनें ज्या वेळेस तो चारी भावंडांस शरण गेला त्या वेळेस ज्ञानेश्वरांनीं मुक्ताईकडून त्यास उपदेश देवविला. हठयोगापेक्षां साक्षात्कार श्रेष्ठ आहे अशी ज्यावेळीं चांग-देवाची खात्री पटली त्यावेळीं त्यांनीं पुढील अभंग केला आहेः—

मोतियाचें पाणी रांजण भरिला । पोट भरुनी प्याला ज्ञानदेव ॥
अभ्राची साउली धरोनिया हातीं । गेलासे एकांतीं निवृत्तिदेव ॥
पुष्पाचा परिमळ वेगळा काढिला । हार तो लेइला सोपानदेव ॥
हिऱ्यांचिया घुगऱ्या जेवण जेवली । पोट भरुनी धाली मुक्ताबाई ॥
चौघांचें वर्म आलें असे हातां । चांगदेव स्वतां तये ठायीं ॥

या अभंगावरून चौघांचेंही वर्म आपणांस प्राप्त झालें असें चांगदेवांनीं लिहिलें आहे. आतां ज्ञानेश्वरांनीं चांगदेवपासष्टी या नांवाचें जें पत्र चांगदेवास पाठविलें त्याबद्दल अलीकडे रा. चांदोरकर यांनीं त्याचा कर्ता ज्ञानेश्वर नसून चक्रपाणि चांगा हा आहे असें म्हटलें आहे. या चक्रपाणि चांग्याचा उल्लेख पासष्टींत आला असून त्यानें आपला गुरु वटेश चांगा यांस पासष्टींत नमनही केलें आहे असें चांदोरकर यांचें म्हणणें आहे. शिवाय चांदोरकर असेंही म्हणतात कीं, हा चक्रपाणि म्हणजे प्रसिद्ध महानुभाव चक्रधरच होय. हें मत खरें मानिल्यास चांगदेवपासष्टीचें कर्तृत्व ज्ञानेश्वरांकडे येतच नाहीं. या मताविरुद्ध इतकेंच म्हणावयाचें आहे कीं ज्याप्रमाणें ज्ञानेश्वरी व अमृतानुभव एका बाजूस व अभंग दुसऱ्या बाजूस ठेवून पाहिलें असतां त्यांच्या भाषासादृश्यामुळें व विचारसादृश्यामुळें त्यांचें कर्तृत्व एकाच व्यक्तीकडे येतें, असें सिद्ध करितां येतें, त्याप्रमाणेंच ज्ञानेश्वरी व अमृतानुभव एका बाजूस ठेवून दुसऱ्या बाजूस चांगदेवपासष्टी ठेविली असतां त्यांमध्येंही भाषासादृश्य व विचारसादृश्य इतकें आहे कीं त्या सर्वांचें कर्तृत्व एकाच व्यक्तीकडे येतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. "स्वस्ति श्रीवटेशु । जो लपोनि जगदाभासु । दावी मग ग्रासु । प्रगटला करी" (१); "प्रगटे तंव तंव न दिसे । लपे तंव तंव आभासे । प्रगट ना लपाला असे । न खोमता जो (२);" "नुसधें मुख जैसें । देखिजतसे दर्पणमिसें । वायांचि देखणें ऐसें । गमों लागे" (२०); "यालागीं मौनेंचि बोलिजे । कांहीं न होनि सर्व होइजे । नव्हतां लाहिजे । कांहींच नाहीं" (३३); "एवं ज्ञानदेव चक्रपाणी ऐसे । दोन्ही डोळस आरिसे । परस्पर पाहतां कैसे । मुकले

भेदा" (६२); या व इतर पासष्टींतील ओंव्यांवरून तिचें ज्ञानेश्वरी अगर अमृतानुभव यांशीं किती सादृश्य आहे हें सहज दिसून येईल. जवळजवळ पासष्टींतील प्रत्येक ओंवीस ज्ञानेश्वरी अगर अमृतानुभव यांमधून समानार्थक ओंवी काढून दाखवितां येईल असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. ज्या वटेश्वराचा उल्लेख चांगदेवपासष्टींतही आहे व चांगदेवाच्या अभंगांतही आहे (क्र. १, २, ४, ५, ८, ९, १०) तो वटेश्वर म्हणजे चांगदेवाचें उपास्य दैवत असलें पाहिजे असें दिसतें. मुक्ताबाईनीं उपदेश दिला, तरी चांगदेवांनीं आपलें उपास्य दैवत वटेश्वरच ठेविलें होतें असें दिसतें. वटेश्वर हें नांव वाटीच्या आकारावरून त्या देवास पडलें असावें असें म्हणतात.

११. मुक्ताबाईनीं चांगदेवास दिलेल्या उपदेशांत "उलट उलट माघारा प्राण्या" अशा आरंभाचें एक उत्तम पद आहे. ज्ञानेश्वरांनीं जशी मायानदीची कल्पना केली, त्याप्रमाणेंच मुक्ताबाईनीं या संसारास नदीची उपमा देऊन "उलट उलट" असा चांगदेवास उपदेश केला आहे. हें भवनदीचें पाणी फार ओढणारें असल्यानें मोठमोठ्या पोहणाऱ्यांस सुद्धां तें खालीं पाडतें असें त्यांनीं म्हटलें आहे (क्र. ७). अहंकाररूप घोंगडयाचा त्याग करून तूं आतां गुरूपदेशाप्रमाणें वटेश्वराचें ध्यान कर, असें मुक्ताबाई चांगदेवास सांगितात (क्र. ८). गुणातीत फांदीवर पाळणा लाविला, व तेथें मुक्ताबाईचा सुत पहुडला; मुक्ताबाईनीं अनाहताचा हल्लर वाजवून त्यास उन्मनीरूप निद्रेंत निजविलें, असें मुक्ताबाई म्हणतात (क्र. १०). तूं सोऽहं सोऽहं हाच छंद धर, व जागृति व निद्रा याच्या पलीकडच्या स्थितींत म्हणजे समाधींत सुखोपभोग घे, असें मुक्ताबाईनीं चांगदेवास सांगितलें आहे (क्र. ११). नोवरीच्या पोटासच नोवरा आला, आणि नोवरा जमल्यावर त्यानें नोवरी पाहिलीच नाहीं; असा तो नोवरा कोणासच सांपडत नाहीं, असें मुक्ताबाई म्हणतात (क्र. १२.) चांगदेवांचे जे अभंग उपलब्ध आहेत, त्यांत त्यांनीं मुक्ताबाईचा मोठ्या गौरवानें उल्लेख केला आहे. वटेश्वर चांग्यास मुक्ताईनें पोसण्यास घेतलें असें चांगदेव म्हणतात (क्र. १.) ज्यावेळेस चांगदेव तयार होऊन शांतिनोवरीशीं लग्न लावावयास गेले त्यावेळीं मुक्ताईकरवलीनें हळद वाटली असें ते म्हणतात (क्र. ३). हें लग्न म्हणजे आत्मा व कुडी यांमधील लग्नच होय (क्र. ४). ज्याची नोवरी त्याच्या हातांत दिल्यानें मी निश्चिंत झालों असें ज्याप्रमाणें कण्वऋषींनीं शकुंतलेस दुष्यंताकडे पाठविलें

त्यावेळेस म्हटलें, त्याप्रमाणेंच आतां चांगदेवही म्हणतात ( क्र. ५ ). मागें मुक्ताबाईनीं उपमा दिल्याप्रमाणें चांगदेवांनींही मुंगीनें जाऊन आकाशास गवसणी घातली, व तेथें एक असें मोठें नवल वर्तलें कीं, मुरकुटानें विश्व व्यापून टाकिलें असें म्हटलें आहे ( क्र. ७ ). माझ्या डोळ्यांस फार उत्कंठा झाल्यानें ते निडारले असतां डोळ्यांवांचून मी स्वस्वरूप भोगिलें असें चांगदेव म्हणतात ( क्र. ८ ); व शेवटल्या एका अभंगांत ( क्र. १० ) यंत्रांतून ज्याप्रमाणें शब्द निघतो त्याप्रमाणें शब्द निघतात, पण डोळ्यांस देव दिसत नाहीं; नेहमीं रुणझुण रुणझुण किनरी वाजते, व याच आनंदांत चांगदेव निमून जातात, असें त्यांनीं लिहिलें आहे.

## नामदेवादि संत.

१२. ज्ञानेश्वरांचे समकालीन पण त्यांच्या पश्चात् सरासरी अर्धशतक राहून ज्यांनीं विठ्ठलसांप्रदाय वाढविला अशा म्हान् भगवद्भक्त नामदेवांचें चरित्र समजण्यास थोडाबहुत मागचा पंढरीसांप्रदायाचा इतिहास पाहिला पाहिजे. पंढरीसांप्रदायाचा उगम केव्हां झाला व त्या सांप्रदायाचा आद्यमुनि पुंडलीक हा केव्हां होऊन गेला याबद्दल अद्याप निश्चितरीतीनें लिहितां येण्याजोगें नाहीं. पुंडलीक हा कानडी भक्त असावा असें दिसतें. व पंढरपुरास विठोबाची स्थापना त्याच्या हातून झाली असावी असेंही दिसतें. ही विठ्ठलस्थापना झाल्यावर विठ्ठलाची भक्ति हळू हळू महाराष्ट्र, कर्नाटक, तैलंगण, गुजराथ वगैरेकडेही पसरली. ज्ञानेश्वरांच्या जन्माच्या अगोदर ६६ वर्षें म्हणजे शके ११३१ मध्यें प्रत्यक्ष आळंदी येथेंच झालेल्या एका कृष्णस्वामीच्या समाधीवर विठ्ठलरखुमाईच्या मूर्ति आहेत ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. यावरून असें दिसतें कीं विठ्ठलभक्ति ज्ञानेश्वरांच्या अगोदरच आळंदीपर्यंतही पसरली होती. तदनंतरचा आणखी एक महत्त्वाचा शिलालेख म्हटला म्हणजे शके ११५९ मधील पंढरपूरच्या देवालयांतील होय. त्यांत सोमेश्वर या नांवाच्या राजानें भिमरथीच्या तीरावर पंडरगे नामक ग्रामांत तळ दिला होता, व त्यावेळीं पुंडलिकाचें मुनि म्हणून लोक प्रेमपूर्वक चिंतन करीत होते असें लिहिलें आहे. त्यानंतर शके ११९५ मध्यें म्हणजे ज्ञानेश्वरांच्या जन्माच्या अगोदर दोनच वर्षें पंढरपुरामध्यें विठोबाच्या देवळांतच चौऱ्यांशीचा शिलालेख कोरण्यांत आला. हा शिलालेख कोरण्याचें काम शके ११९५ पासून शके ११९९ पर्यंत चाललें होतें. त्यांत विठ्ठलाच्या देवळाचा जीर्णोद्धार करण्याच्या कामांत ज्यांनीं ज्यांनीं मदत

केली त्या सर्वांचा उल्लेख आहे. हे लोक कर्नाटक, तेलंगण, कोंकण, देश वगैरे सर्व भागांतून आलेले दिसतात. त्यांतच प्रसिद्ध मुत्सद्दी हेमाडपंत, व महाराष्ट्राधिपति रामदेवराव जाधव, यांनीं शके ११९८ मध्यें देवळास भेट देऊन जीर्णोद्धाराचे कामीं बरीच मदत केली असें लिहिलें आहे. रामदेवरावास तर "पांडरीफडमुख्य" असें म्हटलें आहे. यावरून रामदेवरावाची विठ्ठलावर अतिशय भक्ति होती असें दिसून येतें. असो. अशा रीतीनें ज्या विठ्ठलाचें महत्त्व पंढरी येथें वाढत चाललें होतें त्याच्याच सांप्रदायांत ज्ञानेश्वरांप्रमाणेंच नामदेवही निर्माण झाले, व विठ्ठलभक्तीचा प्रसार दीर्घकाल करण्याचें श्रेय ज्ञानदेवांस जरी लाधलें नाहीं, तथापि त्यांच्यानंतर पन्नास वर्षें राहून नामदेवांनीं विठ्ठलभक्तीचा वृक्ष फारच विस्तीर्ण केला, हें त्यांचें भाग्य होय. नामदेवरायांसारखा भक्त निर्माण झाला नसता, तर आजचें विठ्ठलभक्तीचें विस्तीर्ण स्वरूपही लोकांच्या नजरेस पडलें नसतें. नामदेवराय हे विठ्ठलभक्तीचा पाया होत असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

१३. नामदेवाचा जन्म शके ११९२ मध्यें झाला असें त्यांच्याच एका अभंगावरून कळतें (क्र. १). त्यांचा बाप दामाशेटी हा नरसीब्रह्मणी येथील राहणारा शिंपी होता. नामदेव आपल्या लहान वयामध्यें फार द्वाड होता, व त्याचें आचरणही बरेंच दुष्ट असावें असें दिसतें. तो चोरांच्या संगतीस लागून त्यानें पुष्कळ वाटसरूंस लुबाडलें, व कित्येकांस ठारही मारलें. "ब्राह्मण कापडी गरीब साबडी । केली प्राणघडी बहुतांची ॥ चौऱ्यांशी राऊत नाम्यानें मारिले । चहुंकडे झाले भयाभीत ॥" हा अभंग नामदेवांचाच आहे असें मानलें तर वाल्मिक ऋषीप्रमाणेंच नामदेव हाही एकवार वाटवधाच होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. तो आंवढ्यास एकदां देवाच्या दर्शनास गेला असतां तेथें आलेल्या एका बाईनें आपल्या मुलास उद्देशून उच्चारलेले करुणोद्गार ऐकून, व तिचा भ्रतार आपण चौऱ्यांशीं स्वारांत मारला असें समजून, नामदेवास जें दुःख झालें त्याच्या योगानें अत्यंत विव्हल होऊन त्यानें आपल्या मानेवर सुरी मारली, व रक्ताची धार देवावर जाऊन धरिली. याच गोष्टीमुळें त्याचें लक्ष एकदां देवाकडे जें लागलें तें लागलें. तो पंढरपुरास येऊन विठ्ठलाची भक्ति करूं लागला. एकदां ज्ञानेश्वरादिक संतांच्या भेटींत गोऱ्या कुंभारानें आपलें थापटणें त्याच्या डोक्यावर मारून तें मडकें कच्चें आहे असें ठरविलें (क्र. ५). ही गोष्ट आळंदी येथें घडली असें दिसतें. त्यामुळें नामदेवाचा मोठा मानभंग होऊन तो जो इंद्रायणीच्या पार

निघाला ( क्र. ७ ), तो प्रथम पंढरपूर, व नंतर तेथून काशीकडे विसोबाखेचराच्या दर्शनास गेला. तेथें विसोबास त्यानें लिंगावर पाय ठेवून निजलेला असतांना पाहिलें. विसोबानें देवाच्या सर्वव्यापित्वाबद्दल नामदेवास उपदेश केला ( क्र. ८ ), व पाषाणाच्या देवानें भवव्याधि हरणार नाहीं असें सांगून ( क्र. ९ ), नामदेवाच्या डोळ्याचा डोळा उघडला ( क्र. १० ). नामदेवास विसोबापासून जी परमार्थप्राप्ति झाली तिचा विकास ज्ञानेश्वरांच्या संगतींत झाला. नामदेवांचें व ज्ञानेश्वरांचें परस्पर अत्यंत प्रेम होतें. एका प्रकारें ज्ञानदेव हे नामदेवांचे आजेगुरु होत. नामदेवांचे गुरु विसोबा खेचर यांस सोपानदेवांचा उपदेश झाला होता, व सोपानांस ज्ञानेश्वरांप्रमाणेंच निवृत्तिनाथांपासून परमार्थप्राप्ति झाली होती. ज्ञानेश्वर हे ज्ञानाची मूर्ति, व नामदेव हे भक्तीची मूर्ति असल्यानें त्यांच्या संयोगामुळें ज्ञान व भक्ति या दोहींसही महत्त्व चढलें. ज्ञानेश्वरबरोबर नामदेव हिंदुस्थानचीं तीर्थें पाहण्यास गेले. त्या प्रसंगाचे अभंग त्यांनीं आपल्या " तीर्थावळी " या प्रकरणांत केले आहेत. ज्ञानेश्वरांची समाधि शके १२१८ मध्यें झाली त्या वेळीं नामदेव तेथें हजर होते. पंढरपुरास अगर पंढरपुराजवळ नाना यातींमध्यें जे महान् भगवद्भक्त होऊन गेले त्यांचे आद्य आचार्य नामदेव हेच होत. आपणांसारखे मोठमोठे संत निर्माण करून, व त्यांच्या संगतीमध्यें अर्धशतक भक्तीचा उपभोग घेऊन, नामदेव शके १२७२ मध्यें समाधिस्थ झाले. हल्लीं पंढरपुरास विठ्ठलाचे महाद्वाराजवळ जी पायरी आहे तीच नामदेवांच्या समाधीची जागा आहे असें सांगतात. एका बाजूस नामदेव व दुसऱ्या बाजूस चोखामेळा या उभयतांच्या समाधि महाद्वाराच्या वाटेवर असल्यानें त्या द्वारास फार महत्त्व आलें आहे हें सांगण्याचें कारण नाहीं. नामदेवांनीं आपल्या घरांत ज्या केशिराजाची स्थापना केली, व त्यापुढें भजन केलें, ती मूर्ति व तें घर अद्याप दाखविण्यांत येतें. नामदेवांसारखा भक्त झाला नसता तर पंढरीचें माहात्म्यही वाढलें नसतें. या भगवद्भक्त नामदेवांनीं कीर्तनाचा सांप्रदाय घालून दिला, व प्रथम अभंगांची रचना केली. यांच्या अभंगांतच विष्णुदास नामा या नांवाचा जो एक ग्रंथकार शेंदोनशें वर्षांनीं नामदेवानंतर होऊन गेला त्याचे अभंग मिसळलेले आहेत. तथापि प्रतिभा, भाषेचें सौंदर्य, जुनी भाषा, निकट भक्ति, वगैरे गुणांनीं नामदेवांचे अभंग निवडतां येण्याजोगे आहेत. नामदेवांच्या अभंगांची खरी गाथा जगापुढें मांडणें हें एक मोठेंच काम आहे, व तें काम कोणी होतकरू व आस्थेवाईक महाराष्ट्रभाषाभक्तानें केलें पाहिजे. नामदेवांनीं

आपल्या ह्यातींत इतकी प्रसिद्धी मिळविली कीं त्यांचे ऐंशीं अभंग शीख लोकांच्या ग्रंथसाहेबांत घेतले गेले; तसेंच गुजराथी भगवद्भक्त नरसी मेहता यानें आपल्या संवत् १४७० मध्यें लिहिलेल्या " हरमाळा " या नांवाच्या ग्रंथांतही नामदेवांचा उल्लेख केला आहे असें पंडित पांडुरंगशर्मा यांनीं दाखविलेंच आहे. नामदेवांच्या अभंगांची भाषा जरी सोपी आहे, तरी तिच्यांत रा. भावे यांनीं दाखविल्याप्रमाणें " वेळायितु, अनारिसा, केउता, दारवंटा, साउमा, नाथिलें, पडिपाडी, वोरसु " वगैरे ज्ञानेश्वरकालीन जुने शब्द आले आहेत हें ध्यानांत ठेविलें पाहिजे; याच कारणामुळें ज्ञानदेव व नामदेव हे समकालीन होते, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं.

१४. नामदेवांचे समकालीन इतर जे संत होते व ज्यांचे अभंग थोडेबहुत या पुस्तकांत घेतले आहेत त्यांचाही येथें अल्पमात्र उल्लेख केला पाहिजे. ज्यानें नामदेवांच्या डोक्यावर थापटणें मारून त्यांची परीक्षा केली तो गोरा कुंभार शके ११८९ मध्यें जन्मला. तो तत्कालीन संतांत सर्वांत वडील असल्यानें त्यास सर्व लोक " काका " म्हणत असत. तो तेरढोकी येथें रहात असे. कीर्तनाच्या भरांत त्यानें एकदां आपलें मूलही पायाखालीं तुडविलें होतें. ज्ञानदेव, नामदेव यांच्या तीर्थयात्रेच्या वेळीं हा हजर होता. विसोबा खेचर हा जातीचा ब्राम्हण खरा, पण त्याचा खिस्तीचा व्यापार असे. यास परमार्थाविषयीं प्रथम अश्रद्धा असल्यानें ज्ञानेश्वर व मुक्ताबाई यांनीं यास उपहासानें " खेचर " अशी संज्ञा दिली होती. याचे गुरु सोपानदेव असावेत असें वाटतें. हा आंवढ्या व बार्शी यांच्या दरम्यान असे. शंकराच्या पिंडीवर पाय ठेवून देवाच्या सर्वव्यापकत्वाबद्दल यानें नामदेवांची खात्री करून दिली. हाही ज्ञानदेव नामदेव यांच्या तीर्थयात्रेंत होता. यानें बार्शी येथें श्रावण शुद्ध एकादशी शके १२३१ मध्यें देह ठेविला. या संतांशीं समकालीन सांवता माळी हा पंढरपूरनजीक अरणगांव येथें रहात असे. अरणगांव हें मोडानिंब स्टेशनपासून तीन मैलांवर आहे. सांवता माळ्याची बाग व विहीर अद्यापही तेथें दाखविलीं जातात. हाही ज्ञानदेव नामदेव यांच्या तीर्थयात्रेंत होता. यानें शके १२१७ मध्यें आश्विनवद्य १४ स समाधि घेतली. त्याची समाधि फार चांगली बांधली असून तिच्यापुढेंच त्याच्या एका ब्राम्हण भक्ताची समाधि आहे. याचे कांहीं या पुस्तकांत न छापलेले असे अभंग श्रीमंत बाळासाहेब मिरजकर यांजकडे आहेत. त्यांचा द्वितीयावृत्तींत उल्लेख केला जाईल. सध्यां येथें सांवतामाळ्याच्या या इतर अभंगांपैकीं एकच उद्धृत करितों:—

कांदा मुळा भाजी । अवघी विठाबाई माझी ॥
लसुण मिरच्या कोथिंबिरी । अवघा माझा झाला हरी ॥
मोट नाडा विहीर दोरी । अवघी व्यापिली पंढरी ॥
सांवत्यानें केला मळा । विठ्ठल पायीं गोंविला गळा ॥

या अभंगावरून सांवत्या माळ्यांस अद्वैतसाक्षात्कार होऊन सर्वच हरिमय कसें भासत होतें हें उत्कृष्ट रीतीनें दिसून येतें. नरहरि सोनार हा महाकट्टा शिवभक्त प्रथम देवगिरी येथें राहणारा. तेथून तो पंढरपुरास रहावयास आला. त्याचे गुरु गैबीनाथ (पा. भे.–गैनीनाथ) असावेत असें दिसतें. पांडुरंग हें प्रथम शिवाचें नांव असून तें जसें नंतर विठ्ठलास देण्यांत आलें, त्याप्रमाणेंच नरहरी सोनार हा प्रथम शिवभक्त असून नंतर तो विठ्ठलभक्त बनला. "सोनार नरहरि न देखे द्वैत । अवघा मूर्तिमंत एकरूप" अशी त्याची स्थिति झाली. हा माघ कृष्ण शके १२३५ मध्यें समाधिस्थ झाला. मंगळवेढें येथें राहणारा चोखा हा खरोखरच वर्तनानें चोख होता; व त्यास शोभेशी त्याची बहीणही निर्मळा होती. हाही ज्ञानदेवनामदेवांच्या तीर्थयात्रेंत होता. मंगळवेढ्यास गांवकुसूं बांधीत असतां त्याच्या अंगावर भिंत ढांसळून पडली, व तो तेथें समाधिस्थ झाला. ही गोष्ट वैशाख वद्य ५ शके १२६० मध्यें घडली. त्याच्या रोमरोमांत विठ्ठलनाम भरलें होतें, अशी त्याची विठ्ठलावर एकनिष्ठ भक्ति होती. नामदेवाच्या सांगण्याप्रमाणें त्याच्या अस्थि मंगळवेढ्याहून पंढरपुरास आणिल्या, व त्या महाद्वारासमोर पुरल्या. ज्या जागीं मंगळवेढ्यास चोखामेळ्याच्या अंगावर कुसूं पडलें ती जागा अद्याप तेथें बाजारांत दाखवितात. जनाबाई ही दामाशेट याच्या घरची दासी. ती नामदेवांच्या कुटुंबांतील नसली, तरी ती नामदेवांची एकनिष्ठ भक्त होती. महाराष्ट्रकवयित्रींमध्यें तिचें स्थान उच्च दर्जाचें आहे. एकदां महापुरांतून नामदेवांनी पंढरपूर गांव कसें वांचविलें हें तिनें आपल्या एका अभंगांत सांगितलें आहे. सेना हा बेदरच्या बादशहाचा न्हावी. देवभक्तीमुळें हा पिसा झाला होता, व लोकांसही तो पिसें लावी. आरशांतल्याप्रमाणें आपलें रूप दाखविण्याचा त्याचा धंदा होता. हा शके १३७० मध्यें हयात होता असें दिसतें. श्रावण वद्य १२ दिवशीं सेना समाप्त झाला, अशाबद्दलचे त्याचे दोन अभंग आहेत (क्र. १२, १३). कान्होपात्रा ही मंगळवेढें येथील श्यामा या नांवाच्या एका

दासीची मुलगी. ती फार सुस्वरूप असल्यानें आपल्या योग्यतेनुरूप ज्याचें रूप असेल त्यास तिनें वरण्याचा निश्चय केला होता. विठ्ठलाखेरीज तिची प्रीति दुसऱ्या कोणावर जाईना. बेदरच्या बादशहानें आपल्या राजगृहांत तिला सक्तीनें बोलाविलें असतां त्याजकडे जाण्यापेक्षां मृत्यु बरा, असें वाटून तिनें पंढरपुरास विठ्ठलासमोरच देह ठेविला. ही गोष्ट शके १३९० मध्यें घडली असें दिसतें. ज्या ठिकाणीं देवळांत हिला पुरलें आहे त्या ठिकाणीं एक चमत्कारिक झाड उगवलें आहे, तें अद्यापही पाहण्यास सांपडतें. या संतांखेरीज इतरही आणखी कांहीं संत होऊन गेले; पण त्यांचे अभंग फारसे उपलब्ध नसल्यानें त्यांचा तेथें उल्लेख करतां आला नाहीं याबद्दल खेद वाटतो. एकंदरींत विठ्ठलभक्ति ही सर्व जातींच्या व सर्व वर्णांच्या लोकांस एकत्र कशी करित्ये हें या संतांच्या चरित्रांवरून उत्तम रीतीनें कळून येण्याजोगें आहे. ईश्वरभक्तींत कुळजातिवर्णाचें निष्कारणत्व कसें आहे याचें प्रतिपादन ज्ञानेश्वरांनीं आपल्या ज्ञानेश्वरींत ( ९. ४४१–४६० ) फार उत्तम रीतीनें केलें आहे तें जिज्ञासूंनीं पहावें.

**१५.** आतां आपण नामदेवाच्या अभंगचर्चेकडे वळूं. सर्व भक्तांमध्यें नामदेव व तुकाराम हे अत्यंत आतुर भक्त होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. पुढें दोन तीनशें वर्षांनीं जसा तुकारामांनीं देवाच्या प्राप्त्यर्थ टाहो फोडला, त्याप्रमाणेंच यावेळींही नामदेवांनीं मोठ्या करुणामय वाणीनें देवाची प्रार्थना केली आहे. भ्रमर जसा सुवासावर लुब्ध व्हावा, अगर माशी जशी मधावर लुब्ध व्हावी, तसा मी देवावर लुब्ध झालों आहें, असें नामदेव म्हणतात ( क्र. ११ ). मजसारख्या पतिताचा उद्धार केल्याखेरिज तुला पतितपावन हें नांव शोभावयाचें नाहीं ( क्र. १३ ). या प्रपंचाशीं झोंबी खेळवून आपल्यापासून तूं माझें चित्त परावृत्त केल्यानें तूं मजकडून आपला द्रोह मात्र करवितोस ( क्र. १६ ). तूं माझी पक्षिणी असून मी तुझें अंडज आहे; तूं माझी कुरंगिणी असून मी तुझें पाडस आहे ( क्र. २० ). पक्षिणी प्रभातीं चरावयास गेली असतां तिचें पिलूं जशी तिची वाट पाहतें तशी मी तुझी वाट पाहात आहे ( क्र. २२ ). अग्निमध्यें बाळक पडलें असतां माता ज्याप्रमाणें कळवळ्यानें धांवते, त्याप्रमाणें या तापत्रयाग्नींत मी पडलों असल्यानें तूं माझ्याकडे धांव ( क्र. २३ ). मृत्यूच्या वेळीं माझी स्थिति काय होईल याचा विचार केला असतां माझ्या अंतःकरणांत भडभडून येतें. जिनें मला नऊ मास पोटांत वाहिलें ती आई मला टाकून जाईल; कन्यापुत्रादि बाळें अंतीं

दूर राहतील; देहगृहाची कामिनी तर भवनांतच राहील; मी मात्र अग्नीबरोबर जळून जाईन ( क्र. २४ ). या कारणामुळें डोळ्यांत आसवें येऊन बाहु उभारून हा नामदेव तुझी वाट पाहात आहे ( क्र. ३० ); त्याची लाजही नाहींशी होऊन कंठांत प्राण धरून तो तुझें ध्यान करीत आहे ( क्र. ३१ ). शोकमोहाच्या ज्वाळा चहूंकडे झळंबीत असल्यानें, व चिंतेचा वणवा चोंहीकडे पेटला असल्यानें, करुणाघना, तूं अंबरांत केव्हां बोळशील असें होऊन गेलें आहे ( क्र. ३२ ). वांसरूं जसें आपल्या खुंट्याभोंवतीं फिरतें तसा मी आपल्याच भोंवतीं फिरून खोट्याच भावांत गुंतून गेलों आहे ( क्र. ३३ ). माझे गुणदोष मनास मुळींच आणूं नकोस; मी अपराधांची राशिच आहें; अंगुष्ठापासून मस्तकापर्यंत मी पातकें आचरीत आलों आहे; स्वप्नांतही तुझी भक्ति मला घडली नाहीं; तुझ्यावांचून मला तारणारा दुसरा कोणी राहिला नाहीं ( क्र. ३५ ). हें हृदयच बंदिखाना करून तुला कोंडून ठेविल्याखेरीज तूं हातीं सांपडावयाचा नाहींस; ज्या वेळेस तुला सोहं शब्दानें मार करावा त्यावेळेसच तूं काकुळतीस येशील ( क्र. ३७ ). भक्तांचें कांहींतरी घेतल्याखेरीज देव त्यांस कांहीं देतच नाहीं असा देव सकाम आहे; सुदाम्याचे तीन मुठी पोहे घेतले तेव्हांच त्यानें त्यास राज्य दिलें; द्रौपदीचें भाजीपान घेण्याइतकेंही मन हळुवार करून, नंतर त्यानें तिला अन्न पुरविलें ( क्र. ३८ ). अशा कृपणाचे दारांत जाऊन काय मागावयाचें आहे ( क्र. ४० )? मढ्यापाशीं हात जोडून बोलावें, तशी देवापाशीं माझी स्थिति झाली आहे ( क्र. ३९ ). भक्तभागवतांनीं देवास थोरीव आणली, त्याचा उपकारच देव विसरला ( क्र. ४१ ). ध्रुवास अढळपद देऊन तूं ठकविलेंस, उपमन्याची दुधाचा छंद पुरवून तूं फसगत केलीस; मी त्याप्रमाणें अज्ञान नाहीं ( क्र. ४२ ). मदमत्सरादि श्वापदें खा खा करित मजजवळ आलीं असतां, व कंठास विषयव्यालानें मिठी दिल्यानें मी विषानें झळंबलों असतां, शेवटची लहरी येण्याच्या अगोदरच तूं आलास तर कांहीं आशा आहे ( क्र. ४५ ). या व इतर प्रकारानें पुढें ज्याप्रमाणें तुकारामांनीं देवाशीं भांडण केलें, त्याप्रमाणें नामदेवांनींही केलें. नामदेवांनीं आपला सर्व जीवभाव देवापाशीं समर्पिल्यावर देवानें त्यांस नामप्रेम दिलें; व त्या प्रेमामृतामुळें नामदेव तृप्त झाले ( क्र. ३४ ). हें प्रेम त्यांच्या सर्वांगांत भरून ओसंडावयास लागल्यानें ज्या शब्दांनीं विठ्ठल डोलेल असे

शब्द ते आतां बोलूं लागले, व खेचरदात्याच्या कृपेमुळें आपल्या हातीं सर्व सत्ता आली म्हणून त्यांस आनंद झाला ( क्र. ४७ ).

१६. आतां आपण नामदेवांची शिकवण कशी होती याचा थोडक्यांत विचार करूं. नामस्मरणाचें महत्त्व नामदेवांनीं जितकें गायिलें आहे तितकें इतर संतांनीं क्वचित्‌च गायिलें असेल. माझ्या मुखांत तुझ्या नामाचें खंडण झाल्यास माझी रसना शतधा विदीर्ण होवो; तुझें रूप माझ्या दृष्टीस न पडल्यास माझे डोळे उन्मळून निघोत, असें नामदेवांनीं देवाजवळ मागितलें आहे ( क्र. ४९ ). अनुभवानें, भावानें, अगर कपटानें कसेंही नाम वाचेस आलें असतां चालेल ( क्र. ५१ ); कारण अठरा पुराणांच्या पोटांत नामावांचून दुसरी गोष्टच सांगितली नाहीं ( क्र. ५५ ). शेतास थोडें धान्य नेऊन ज्याप्रमाणें गाडाभर परत आणितात, त्याप्रमाणें केवळ नामस्मरणानें देवाच्या प्राप्तीइतका मोठा लाभ होतो ( क्र. ५८ ). नामस्मरणापुढें अग्नीचें सामर्थ्य चालत नाहीं ( क्र. ५९ ). नामस्मरणानें जिभेवरचे असत्याचे मळ धुवून जातात ( क्र. ६१ ), व सर्व सत्ता प्राप्त होते ( क्र. ६१ ). देव लपला तरी आपलें नाम तो कोठेंही नेत नसल्यानें नामस्मरण केलें असतां देवास अवश्य यावेंच लागतें ( क्र. ६६ ). देह गेला तरी बेहेत्तर, पण नामाचें वर्म सोडूं नये ( क्र. ६७ ). प्रेमयुक्त नामस्मरण करणें ही कांहीं लहान गोष्ट नाहीं. चंद्रसूर्यांचीं चित्रें काढलीं तरी त्यांत प्रकाश भरतां येत नाहीं ( क्र. ७५ ). हातांत विणा व मुखांत हरीचें नाम धरून अन्नउदक सोडून देवाचें ध्यान लागलें असतां देवाचें दर्शन होईल ( क्र. ७७ ), व काळ देहास खावयास आला असतां असा भक्त आनंदानें गाईल व नाचेल ( क्र. ८० ).

१७. नामस्मरणाप्रमाणेंच इतर गोष्टींबद्दलही नामदेवाचा उपदेश फार विचारणीय आहे. इंद्रियें सर्वांगसाजिरीं असेपर्यंतच हरिकथेस आपण सादर व्हावें ( क्र. ८१ ). संसार करीत असतां देवाची प्राप्ति झाली असती तर सनकादिक संसार सोडून बाहेर जाते ना ( क्र. ८३ ). वावडी दूरच्या दूर उडत असतां तिजकडे वावडी उडविणारा जसें लक्ष ठेवितो, त्याप्रमाणें सर्वेश्वरावर लक्ष ठेवून कोणताही व्यापार करण्यास हरकत नाहीं ( क्र. ८५ ). दगडाचा देव व मायेचा भक्त यांचा संदेह फिटणें शक्य नाहीं; अशा प्रकारचे देव तुरुकांनीं फोडले तरी ते ओरडत आरडत नाहींत; अशीं लोखंडमय दैवतें मला दाखवूं नकोस असें नामदेव देवास म्हणतात ( क्र. ९४ ). सजीव तुळस सोडून निर्जीव दगडाची पूजा कां

करावी ( क्र. ९५ ) ? भक्तीचे नानाविध प्रकार आहेत; एकादशी करणाऱ्या मांजराची भक्ति, ध्यानास बसलेल्या लांडग्याची भक्ति, स्वयंपाक पाहिलेल्या श्वानाची भक्ति, पतिव्रता बनलेल्या वेश्येची भक्ति, या सर्व भक्ति सोडून एका लक्ष्मीपतीस शरण जाण्याचीच भक्ति करावी ( क्र. ९८ ).

**१८.** संताचें मुख्य लक्षण म्हटलें म्हणजे जो मानापमानरहित झाला त्यासच संत म्हणण्यास हरकत नाहीं ( क्र. १०९ ). चित्तांतून वासना खणून काढून नामावर सर्वभावानें विश्वास टाकणें हाच वैष्णवांच्या कुळींचा कुळधर्म होय ( क्र. ११० ). निंदास्तुति समान लेखणें हीच समाधि ( क्र. १११ ). असे संत बोधसाबण लावून मनुष्यांचीं अंतःकरणें ज्ञानगंगेंत निर्मळ धुतात ( क्र. ११५ ); व एकमेकांस सावधान करून नामाचें अनुसंधान तुटूं देत नाहींत ( क्र. ११८ ). अशा संतांचे पायांवर विश्वास टाकिल्यास देवास आपोआप भेटावेंच लागतें (क्र. १२१); कारण जो प्रत्यक्ष राम दाखवील तोच संत, इतर संत घेऊन काय करावयाचे ( क्र. १२५ ) ? नामस्मरण जरी स्वतःसिद्ध असलें तरी गुरूवांचून वर्म हातीं येत नाहीं ( क्र. १२७ ). रविरश्मी धरून स्वर्गास जातां येईल, पण संतसंगतीचा पार कळणार नाहीं ( क्र. १२८ ). कोकिळ जसा वसंतऋतूखेरीज दुसऱ्यापुढें गात नाहीं, अगर मोर जसा मेघावांचून दुसऱ्यापुढें नाचत नाहीं, त्याप्रमाणें संत हे देवावांचून दुसऱ्यापुढें काकुळतीस येत नाहींत ( क्र. १३० ). अशा संतांनीं अव्हेरिल्यामुळें मुक्तिपद दीनरूपानें वाळवंटांत हिंडतें, व कोणाचाच आसरा त्यास सांपडत नाहीं म्हणून तें योग्यांच्या घरांत शिरतें ( क्र. १३१ ). संतांमध्यें नाना प्रकारचे खेळिये होऊन गेले आहेत. एक खेळास भ्यालेलें बारा वर्षांचें नागवेंच पळून गेलेलें ब्राम्हणाचें पोर; एक कपाट फोडून गेलेलें सहा तोंडांचें शंभूचें बाळ; एक कामव्यसनांत न सांपडलेला शहाणा हनुम्या; एक बहुतच खेळ खेळलेला यादवांचा पोर गोप्या; असे नाना प्रकारचे खेळिये या जगांत होऊन गेले आहेत, व त्यांनीं आपल्या क्रीडा निरनिराळ्या रीतींनें करून दाखविल्या आहेत ( क्र. १३४ ).

**१९.** देवास जाणण्याची कळा ही एक निसर्गदत्त देणगी आहे असें नामदेवांचें म्हणणें आहे. मोगऱ्याचें फूल उपजल्याबरोबरच त्यास सुवास कसा उत्पन्न होतो ! बनांत व्यालेल्या धेनूचें वत्स तिच्या स्तनास कोण लावितो ! त्याप्रमाणेंच, सहज

लक्षण ज्याच्या अंगांत असेल त्यासच देवाची प्राप्ति होईल ( क्र. १३५ ). एक वेळ देवास पाहिल्यावर मग भलत्या गावांस गेलें असतांही हरकत नाहीं; कारण मग देव नेहमीं जवळ असतोच ( क्र. १३७ ). अमृतालिंग केशव हा सदैव नामदेवांच्या चित्तांत असल्यानें त्यांस अखंडित तृप्ति प्राप्त झाली. डावीउजवीकडे, आणि मागेंपुढें, देवाचे चरण जोडावे अशी नामदेवांनीं इच्छा प्रदर्शित केल्याबरोबर ( क्र. १४० ), नामदेवांनीं पहावें तिकडे चारी दिशांस दिशाद्भ्रमित भरलेला हरि त्यांस दिसूं लागला (क्र. १४१). हें देवाचें स्वरूप आंधळ्यांसही दिसूं शकतें, व बहिऱ्यांसही त्याचा श्रवणानुभव येतो असें नामदेव म्हणतात ( क्र. १४२ ). देवाचें नामस्मरण केल्यावर देव जर पूजेचा संभार घेऊन सामोरा येणार नाहीं तर माझें मस्तक छेदा असें नामदेवांनीं म्हटलें आहे (क्र.१४४). बसून नाम आळविलें असतां देव पुढें उभा राहतो, व प्रेमाच्या भरानें उभें राहून गर्जना केली असतां देव भक्तांपुढें नाचतो (क्र. १४५ ). गरुडाच्या संचारानें दाही दिशा भरून जाऊन कोटिसूर्यप्रभामय जगज्जीवनाचें भक्तांस दर्शन होतें असें नामदेव म्हणतात ( क्र. १४७ ). आपण आपल्यास पाहण्यास चंद्रसूर्याचें कारण नाहीं; महाप्रळयांत सप्तसागर एकवटावे तसा देव सर्व विश्व व्यापून राहतो ( क्र.१४८ ). उन्मन्यवस्थेंत पाहिलें असतां धिम्‌धिम्‌ तुरे वाजून अनाहतध्वनीच्या गर्जनेमध्यें, चंद्रसूर्यांपलीकडच्याही तेजांत ( क्र.१४९ ), केशव तोचि नामा व नामा तोचि केशव असा अनुभव नामदेवांस प्राप्त झाला असें ते सांगतात ( क्र. १५० ).

२०. नामदेवांचे समकालीन जे संत होते त्यांच्या अभंगांचा थोडक्यांत येथें विचार करणें जरूरीचें आहे. नामदेवांची परीक्षा करणारा गोरा कुंभार यानें नामदेवास अनुभवप्राप्ति झाल्यावर आपल्यामध्यें व त्याच्यामध्यें भेद उरला नाहीं असें सांगितलें ( क्र. १ ). पाहतां पाहतां आपली खेचरी मुद्रा लागून जाते ( क्र. २ ); व जयजय झनकून झांगट वाजते असें ते म्हणतात ( क्र. ३ ). आपण जीवन्मुक्त होऊन कोणासच आपली स्थिति कळूं देऊं नये, असेंहि ते सांगतात ( क्र. ८ ). नामदेवांचे गुरु विसोबा खेचर यांनीं नामदेवास तूं देव पाहिला असें म्हणशील, तर तें बोलणें खोटें आहे असें सांगितलें; जोंपर्यंत आपला अहंकार गेला नाहीं, तोंपर्यंत आत्माराम भेटणें शक्य नाहीं (क्र. १). अच्युत हरे, केशव हरे, हीं नामें उच्चारिलीं असतां पर्वतप्राय पापराशि दग्ध होतील (क्र. ३); असें म्हणून नामदेवाच्या श्रवणांत मात सांगून त्याच्या मस्तकावर विसोबांनीं हात ठेविला, व त्यांस पदपिंडविवर्जित

केलें ( क्र. ४ ). सांवतामाळी यांस आपल्या हीनयातीबद्दल थोडीशी जास्त जाणीव होती असें दिसतें ( क्र. ३ ). एकापरीनें ही हीनयाती आली, व त्यामुळें माझी महंती वाढली नाहीं, हें बरेंच झालें असें ते सांगतात ( क्र. २ ). आपण नेहमीं देव ठेवील त्या स्थितींत आनंदानें रहावें; कधीं हत्तीवर बसावें, तर कधीं पायानें चालत जावें; कधीं घरांत धान्य नाहीं, तर कधीं द्रव्य कोठें ठेऊं व कोठें न ठेऊं असें होऊन जावें; कधीं स्मशानांत जाऊन एकटे रहावें, तर कधीं सद्गुरूची कृपा होऊन सांवत्याच्या बापाचें दर्शन घ्यावें, असें ते म्हणतात (क्र.४). नरहरि सोनारानें "गैबीनाथ" असें आपल्या गुरूचें नांव सांगितलें आहे ( क्र. २ ). जसा एकादा चितारी भिंतिवर चित्रें काढितो व लगेच तीं पुसून टाकितो, जशीं पोरें एकादा खेळ खेळतात व शेवटीं तो मोडून टाकितात, त्याप्रमाणेंच हें जग आहे असें नरहरि सोनार सांगतो ( क्र. १ ). अनाहत ध्वनीनें माझें मन मोहून गेलें आहे असेंही तो सांगतो ( क्र. ४ ). शेवटीं, आपण सोनाराचा धंदा परमार्थांत सुद्धां कसा चालविला याचें तो उत्तमरीतीनें वर्णन करितो. देह हीच कोणी एक शेगडी, व अंतरात्मा हेंच कोणी एक सोनें होय. त्रिगुणाची मूस करून मी त्यांत ब्रह्मरस ओतिला; जीवशिवांची फुंकी करून रात्रंदिवस ठोकाठोकी केली; विवेकहातोडा हातीं घेऊन कामक्रोध पूर्ण केले; मनबुद्धीची कात्री घेऊन त्यानें रामनाम सोनें चोरिलें; व ज्ञानताजव्यांत घालून त्या दोन्ही अक्षरांचें वजन केलें, तर तें अमूल्य भरलें असें नरहरि सोनार सांगतो ( क्र. ५ ). एकदां चोखामेळ्यास विठोबाचा हार प्राप्त झाला असतां त्यास बडव्यांनीं मारिलें, तेव्हां मी तुझ्या दारींचा कुतरा आहे मला मोकलूं नको, असें त्यानें देवास विनविलें ( क्र. २ ). बाहेरची पंढरी व विठ्ठल पाहणें हें फारसें मोठें काम नव्हे; माझा देह हीच कोणी पंढरी असून अविनाश आत्मा हाच विठ्ठलरूपानें त्यांत दिसत आहे; त्याचें दर्शन झाल्यानें मी त्याचे पायीं जडून गेलों असें चोखामेळा सांगतो ( क्र. ३ ). ऊंस वांकडा असला तरी त्याचा रस जसा वांकडा होत नाहीं, अगर कमान वांकडी असली तरी बाण जसा वांकडा होत नाहीं, त्याप्रमाणें चोखा वांकडा असला तरी त्याचा भाव वांकडा नाहीं हें लोकांनीं ध्यानांत ठेवावें (क्र.४). पुत्र होणार असेल तर तो संत झाल्यासच त्याचा उपयोग; कन्या होणार असेल तर ती मिरामुक्ताबाईप्रमाणेंच व्हावी; असें न झाल्यास त्यापेक्षां निःसंतान बरें असें चोखामेळा म्हणतो ( क्र. ५ ). खटनटांनीं पंढरीस येऊन शुद्ध होऊन जावें

अशी चोखामेळा सदैव दवंडी पिटितो असें त्यानें म्हटलें आहे ( क्र. ६ ) जनाबाईचे अभंग फार प्रेमळ आहेत, व त्यांत एक प्रकारचें तेज आहे. पतंग सुखाऊन दीपावर उडी घालील तर तो अधोगतीस मात्र जाइल, असें जनाबाई म्हणतात ( क्र. १ ). शूरांचें शस्त्र, अगर हत्तीच्या गंडस्थळावरचें मोतीं, सिंहाचें नख, अगर पतिव्रतेचे स्तन हीं जशीं प्राण गेल्यासही हातीं लागणार नाहींत, त्याप्रमाणें अहंकारत्याग झाल्यावांचून देव मिळणार नाहीं असें जनाबाई म्हणतात ( क्र. ४ ). आपण कायावाचामन सद्गुरूस देऊन त्यापासून वस्तु मागून घ्यावी; जो आत्मा प्रगट दाखवील तोच सद्गुरु होय असें जनाबाई म्हणतात ( क्र. ५ ). भक्ति ही इंगळाच्या खाईप्रमाणें,विषाच्या ग्रासाप्रमाणें, अगर खड्गाच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण आहे असें जनाबाईचें म्हणणें आहे (क्र.६). हृदय बंदिखाना करून ज्यावेळीं विठ्ठलास मीं आंत कोंडिलें, व सोहं शब्दाचा मारा केला, त्यावेळीं विठ्ठल काकुळतीस आला असें नामदेवांप्रमाणेंच जनाबाईनीं म्हटलें आहे ( क्र. ११ ). नवऱ्यामुलाबरोबर वऱ्हाडयांसही ज्याप्रमाणें पुरणपोळीचें जेवण मिळतें, त्याप्रमाणें नामदेवाबरोबर मलाही देवाची प्राप्ति झाली असें जनाबाई सांगतात ( क्र. १२ ). रक्त, श्वेत, श्याम, नीळ वर्णांच्यावर भ्रमरगुंफेंत मी देवाचें दर्शन घेतलें असें त्या सांगतात ( क्र. १५ ). वामसव्य, खालींवर, सर्वत्र देवाचें मला दर्शन झालें ( क्र. १६ ). स्वरूपाचा पूर डोळ्यावर आल्यानें डोळ्यांस एकदम झांपड पडली ( क्र. १७ ). माझा कान डोळा झाला, व बायको निबर असतांनाही भ्रतार तान्हा बनला असें नवल वर्तून गेलें ( क्र. २० ). सहजगत्याच जरी मीं द्वाराकडे पाहिलें तरी तेथें विठ्ठल उभा आहे असें मला दिसूं लागलें ( क्र. २२ ). आतां मी देव खातें, देव पितें, देवावर मी शयन करितें, असें जनाबाई म्हणतात. ( क्र. २३) सूर्य आणि रश्मि हीं जशीं दोन नाहींत, त्याप्रमाणें देव आणि भक्त यांमध्यें भेद नाहीं, असें जनाबाईचें म्हणणें आहे (क्र.२८). सेना न्हावी यानें देवाच्या प्राप्त्यर्थ गिरिकाननास जाण्याचें कारण नाहीं असें सांगितलें आहे. गिरिकाननास जाल तर विभांडकाप्रमाणें रंभेकडून नागवून मात्र घ्याल असें तो म्हणतो ( क्र. ४ ). सेनान्हावी यानें आपण वारिक असून बारीक हजामत करितो असें सांगितलें आहे. विवेकआरसा दाखवून आम्ही वैराग्याचा चिमटा हालवितों, शांतिरूप उदक डोईस चोळून अहंकाराची शेंडी पिळितों, भावार्थाच्या बगला झाडून कामक्रोधनखें काढितों, चारी वर्णांस आम्हांवांचून गत्यंतरच नाहीं, आमच्या आधारानेंच ते जिवंत राहतात, असें सेनान्हावी यानें म्हटलें आहे ( क्र. ११ ). कान्होपात्रा इला

ज्यावेळीं बादशहाचें बोलावणें आलें, त्यावेळीं विषयध्यासानें इंद्राअंगींही भगें पडलीं, व भस्मासुर भस्म झाला, अशा अर्थाचा तिनें एक अभंग केला ( क. १ ); व सिंहाचें खाद्य जर जंबूक नेईल तर त्याची लाज कोणास असा भगवंतास प्रश्न करून, तिनें देवास आपलें ब्रीद जतन कर असें विनविलें, व आपला देह देवास अर्पण केला ( क. ३ ).

## एकनाथादि संत.

२१. महाराष्ट्रसंतांच्या इतिहासांत पहिला काल जसा ज्ञानदेवादिकांचा, व दुसरा जसा नामदेव व तत्कालीन संतांचा, तसाच तिसरा काल म्हटला म्हणजे एकनाथादि संतांचा होय. एकनाथांचे पणजे भानुदास हे पैठण येथें शके १३७० मध्यें जन्मले. हे दामाजीपंतांचे समकालीन असावेत असें दिसतें. कारण दामाजीपंतांचे वेळीं जो दुष्काळ पडला तो शके १३८० अगर १३९० चे सुमारास पडला असावा असें दिसतें. लहानपणापासूनच भानुदासांस सूर्याची उपासना होती, व पुढें हे विठ्ठलसांप्रदायाचे एक मोठे अध्वर्यु बनले. मुसलमानांच्या स्वाऱ्यांपासून विठ्ठलमूर्तीचें रक्षण करण्याच्या उद्देशानें म्हणा, अगर आपली राजधानी जी विजयानगर तीस शोभा व महत्त्व आणण्याच्या उद्देशानें म्हणा, तेथील राजा कृष्णराय यानें विठ्ठलाची मूर्ति पंढरपुराहून हंपी येथें नेली; व तेथें हल्लीं जें विजयविठ्ठलाचें देऊळ दाखविलें जातें त्यांत त्या मूर्तीची स्थापना केली. पुढें पंढरीच्या भक्तांच्या आग्रहामुळें व आपल्याही विठ्ठलभक्तीच्या आतुरतेनें भानुदास विजयानगरास गेले व तेथून त्यांनीं आपल्या भक्तीमुळें कृष्णराय याचें मन आपल्याकडे वळवून घेऊन ती मूर्ति पुनः हंपीहून पंढरपुरास परत आणली. भानुदास यांनीं शके १४३५ मध्यें देह ठेविला. एकनाथांचे गुरु जे जनार्दनस्वामी त्यांचा जन्म चाळिसगांव येथें शके १४२६ मध्यें झाला. त्यांचें लक्ष प्रथम परमार्थाकडे नव्हतें. पण उपरति होऊन त्यांस नृसिंहसरस्वतींचा अनुग्रह औदुंबरनजीक अंकलकोप येथें झाला असावा असें दिसतें ( क. २ ). याच नृसिंहसरस्वतींनीं विजापूर येथील बादशहास रोगापासून मुक्त केल्यानें त्यांचें देऊळ त्या बादशहानें विजापूर येथें किल्ल्यांत आपल्या अगदीं राजवाड्यानजीक बांधलें, तें अद्याप तेथें पहावयास सांपडतें. वाडी, औदुंबर, व गाणगापूर हीं क्षेत्रें या नृसिंहसरस्वतींचींच होत. जनार्दनस्वामी जरी दत्तोपासक असावें असें दिसतें, तरी त्यांनीं एकनाथास " पंढरीचा सोपा मार्ग पतकर " असेंच सांगितलें आहे. प्रपंच व परमार्थ यांची गुरुशिष्यांनीं म्हणजे जनार्दनस्वामी

व एकनाथ यांनीं फार उत्तम सांगड घालून दिली. जनार्दनस्वामींस एका यवन बादशहानें देवगडचा किल्लेदार नेमिलें होतें. हे शके १४९७ मध्यें समाधिस्थ झाले, व त्यांची समाधि देवगडावर एका गुहेंत अद्यापिही दाखविली जाते.

**१२.** या जनार्दनस्वामींचे पट्टशिष्य एकनाथ यांचा जन्म केव्हां झाला याबद्दल दोन मतें आहेत. रा. भावे व सहस्रबुद्धे यांच्या मतें एकनाथांचा जन्म शके १४७० मध्यें झाला; व रा. पांगारकर यांच्या मतें शके १४५५ मध्यें झाला. एकनाथांच्या समाधीचें साल मात्र शके १५२१ हें जवळ जवळ निश्चितच आहे. एकनाथ हे भानुदासाचे पणतु होत. त्यांचीं मातापितरें त्यांच्या लहानपणींच निवर्तलीं. त्यामुळें त्यांचे आजे चक्रपाणि यांनींच त्यांचें संरक्षण केलें. हे बारा वर्षांचे असतांना पैठणांत गांवाबाहेरील शिवालयांत त्यांस असा दृष्टांत झाला कीं "जनार्दनपंत या नांवाचे साधु देवगडावर आहेत; तेथें जाऊन तूं त्यांचा उपदेश घे" असा दृष्टांत झाल्यानें आपल्या आजाचीही अनुज्ञा न घेतां एकनाथ जनार्दनस्वामींकडे गेले. तेथें त्यांनीं आपल्या गुरूची उत्तम सेवा केली, व ज्ञानेश्वरी व अमृतानुभव यांचा उत्तम अभ्यास केला. देवगडाच्या मागें एका डोंगरावर जाऊन सहा वर्षेंपर्यंत त्यांनीं तपश्चर्या केली. एकदां देवगडावर परचक्र आलें असतां जनार्दन स्वामी ध्यानांत गुंतले आहेत असें पाहून एकनाथांनीं स्वतः घोड्यावर स्वार होऊन त्या परचक्राचा पाडाव केला. सहा वर्षें गुरूजवळ अध्ययन व तपश्चर्या केल्यावर गुरूच्या आज्ञेप्रमाणें त्यांनीं पैठणास येऊन विजापुरच्या गिरिजाबाई या नांवाच्या मुलीशीं लग्न केलें. परमार्थ व प्रपंच मिळून चालविण्याची त्यांची हातोटी फार विलक्षण होती. आपल्या वर्तणुकीनें त्यांनीं सर्व जगास परमार्थी मनुष्यानें प्रपंचांत कसें वागावें याबद्दल उत्कृष्ट कित्ता घालून दिला. आपल्या अंगावर थुंकणाऱ्या यवनाशीं शांततेनें व सभ्यपणानें वागणें; आपल्या पितरांच्या श्राद्धाचे वेळीं महारांस जेऊं घालणें; गंगेचें पाणी घरीं आणीत असतां तहानेनें तळमळत असलेल्या एका गाढवास तें पाजणें; वेश्या, चोर, जार, यांचा उद्धार करणें; एका अस्पृश्य मुलाला उचलून कडेवर घेणें; ज्ञानाचा अभिमान चढलेल्या आपल्या मुलाशीं म्हणजे हरिपंडिताशीं शांतरीतीनें वागणें, या व इतर अशा अनेक गोष्टींनीं एकनाथ हे शांतता, दया, अक्रोध, समता वगैरे गुणांचे मूर्तिमंत अवतार होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. एकदां त्यांच्या गळ्यास रोग झाला असतां "ज्ञानदेवांच्या गळ्यास लागलेल्या अजानवृक्षाची मुळी तूं काढ, म्हणजे तुझा रोग बरा

होईल" असा त्यास दृष्टांत झाल्यानें ते आळंदीस आले. या प्रसंगाची हकीकत त्यांनीं स्वतःच पुढील अभंगांत दिली आहेः—

श्रीज्ञानदेवें येऊनी स्वप्नांत । सांगितली मात मजलागीं ॥
दिव्य तेजःपुंज मदनाचा पुतळा । परब्रह्म केवळ बोलतसे ॥
अजानवृक्षाची मुळी कंठास लागली । येऊनि आळंदीं काढ वेगीं ॥
ऐसें स्वप्न होतां आलों अलंकापुरीं । तंव नदीमाझारीं देखिलें द्वार ॥
एकाजनार्दनीं पूर्वपुण्य फळलें । श्रीगुरु भेटले ज्ञानेश्वर ॥ ५ ॥

या अभंगावरून त्यावेळीं ज्ञानदेवाच्या समाधीचें द्वार नदीमध्यें होतें असें दिसतें. हल्लीं जेथें सिद्धेश्वरापुढील नंदी दाखविला जातो तेथें त्यावेळीं नदीचें पात्र असावें असें दिसतें. असो. एकनाथ त्यामार्गानें जाऊन त्यांनीं अजानवृक्षाची मुळी सोडविली असावी असें दिसतें. ही गोष्ट शके १५०६ मध्यें घडली. याच सालीं एकनाथांनीं भाद्रपद मासीं कपिलाषष्ठीस ज्ञानेश्वरीचें संशोधन करून आधुनिक ज्ञानेश्वरी जगास दिली. कांहीं जुन्या रूपांबद्दल नवीं रूपें घालणें वगैरे किरकोळ सुधारणांखेरीज त्यांनीं ज्ञानेश्वरीमध्यें फारशा सुधारणा केल्या असें त्यांच्या शब्दांवरून दिसत नाहीं. ज्ञानेश्वरीच्या पाठांत ओंवी घुसडून देणारा अमृताच्या ताटांत नरोटी ठेविणाऱ्याप्रमाणेंच हास्यास्पद होईल, असें त्यांनीं आपल्या ज्ञानेश्वरीच्या संशोधनपत्रिकेंत म्हटलें आहे. एकनाथ कीर्तन करितां करितांच पैठण येथें शके १५२१ मध्यें समाधिस्थ झाले. त्यांची भागवत एकादशस्कंधावरील टीका, भावार्थ रामायण (४४ अध्याय), रुक्मिणीस्वयंवर, स्वात्मसुख, चतुःश्लोकी भागवतावरील टीका, अभंग, वगैरे पुष्कळ ग्रंथ प्रसिद्ध आहेत. या पुस्तकांत एकनाथांच्या अभंगांखेरीज दुसरीकडून उतारे घेण्याची सवड नव्हती. शिवाय अभंगांतूनच उतारे घेण्याचें हेंही एक कारण आहे कीं, अभंगांत एकनाथांचें अंतःकरण जितकें उघड रीतीनें दृग्गोचर होतें, तितकें तें त्यांच्या इतर ग्रंथांत होत नाहीं. एकनाथांचे इतर ग्रंथ बुद्धिवादाचे आहेत, पण अभंग अनुभवप्रधान आहेत. एकंदरींत ज्ञानेश्वरांप्रमाणें बुद्धीस थरारून सोडणारी अशी ग्रंथरचना जरी एकनाथांनीं केली नाहीं; तुकारामांसारखे अत्यंत हृदयस्पर्शी व कोमल असे अभंग जरी त्यांनीं लिहिले नाहींत; रामदासांप्रमाणें कर्मयोगित्वाचा बाणाही त्यांनीं जरी पत्करला नाहीं; तथापि प्रपंच व परमार्थ यांची विलक्षण सांगड घालून संसारांमध्यें

असतांच परमार्थ कसा करावा हें त्यांनीं जसें आपल्या उदाहरणानें सर्व लोकांस शिकविलें, त्याप्रमाणें दुसऱ्या कोणत्याही संतानें शिकविलें नाहीं असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होईल असें वाटत नाहीं.

२३. आतां आपण प्रथम भानुदास व जनार्दनस्वामी यांच्या अभंगचर्चेकडे वळूं. भानुदासांनीं पंढरपूर ही एक निळांमाणकांची खाणीच आहे असें म्हटलें आहे; जरी हजारों लोकांनीं ती आजपर्यंत लुटली आहे तरी आगरांत जशीच्या तशीच ती शिल्लक आहे असें ते म्हणतात ( क्र. २ ). भानुदासांस ज्यावेळीं विजयानगर येथें राजानें हार चोरला म्हणून सुळीं द्यावयास नेलें त्यावेळीं त्यांनीं केलेला अभंग फार हृदय-द्रावक आहे. जरी आकाश तुटून वर पडलें अगर ब्रह्मगोळ भंगास गेला, अगर त्रिभुवन वडवानळानें खाऊन टाकिलें, तरी मी तुझीच वाट पाहीन असें ते विठोबांस म्हणतात. मी तुझा नामधारक असल्यानें तूं मला दुसऱ्याचा अंकित करूं नकोस; सप्तसागर जरी एकवटले, पृथ्वी जरी त्यांत विरून गेली, पंचमहाभूतें जरी प्रळयांत सांपडलीं, तरी मी तुझी संगति सोडणार नाहीं; कोणतेंही भयंकर विघ्न जरी येऊन वर आदळलें तरी प्रतिव्रता जशी प्राणेश्वरास सोडणार नाहीं, तसें मी तुझें नाम सोडणार नाहीं ( क्र. ६ ); अशी करुणा भाकल्यावर ज्याप्रमाणें कोरड्या काष्ठास अंकुर फुटावे, त्याप्रमाणें त्यांच्यापुढें देवाचें दर्शन होऊन त्यांचें संकट निरसलें असें ते सांगतात ( क्र. ७ ). जनार्दनस्वामींनीं औदुंबरास जाऊन अंकलकोप येथें नृसिंहसरस्वतींचा उपदेश घेतला असें मागें आम्हीं लिहिलेंच आहे ( क्र. २ ). तूं जर आम्हांवर कृपा करणार नाहींस, तर आम्ही कोणत्या देवाचें आराधन करावें, असें ते आपल्या गुरूस विचारतात ( क्र. ३ ). आपल्या गुरूचें नामस्मरण केलें असतां आपण सद्गुरुरूपच होऊन जातों असें ते म्हणतात ( क्र. ६ ). त्यांनीं एकनाथास जो उपदेश केला त्याचें येथें थोडक्यांत सार द्यावयाचें आहे. लटक्या प्रपंचांत न गुंततां तूं पंढरीचा सोपा मार्ग पतकर असें ते एकनाथास सांगतात ( क्र. ७ ). ज्ञातीचा विचार न करतां, अन्न परब्रह्म असल्यानें ( क्र. १० ), सर्व संतांस सरसकट अन्नदान दे ( क्र. ९ ). तुझें मन शुद्ध झाल्यास बसल्या ठायींच तुला देव दिसेल ( क्र. १२ ).एकेक चक्र आकाशा-एवढें दिसून त्यांमध्यें मोत्यांची चौकडी दिसेल; मण्यांच्या ज्योतीचा प्रकाश होऊन तेलावांचून दीप्ति पाजळतील ( क्र. १३ ). प्रथम समाधि निबिड सर्पाकार

होऊन ( क. १४ ), पुढें हंसस्वरूप दिसलें असता, त्यांमध्यें रिघून आपलें स्वरूप पहावें; देहाचा जो स्वामी तो अविनाशरूपानें प्रगटतो ( क. १६ ). यापुढें जो बोलेल त्यास पतन होईल असें जनार्दनस्वामी सांगतात.

२४. एकनाथांची जनार्दनांबद्दलची गुरुभक्ति ज्ञानेश्वरांच्या निवृत्तिनाथांबद्दलच्या गुरुभक्तीइतकीच खडतर आहे. परमार्थ साधावयास मातापिता हीं कोणी उपयोगी पडत नसून केवळ गुरूचेंच साह्य होतें असें एकनाथ म्हणतात ( क. ३ ). साधनाच्या कोणत्याही आटी न करवितां जनार्दनस्वामींनीं माझ्या हृदयसंपुष्टांतच मला देव दाखविला ( क. ६ ); व कामक्रोधादिविकारांचा अंधार पळवून लावून माझ्यापुढें रविबिंबाप्रमाणें प्रकाश केला ( क. ७ ). गुरु हाच परमात्मा परेश असा माझा दृढ विश्वास असल्यानें देव माझा अंकित होऊन राहिला आहे, असें एकनाथांनीं म्हटलें आहे ( क. ९ ). या विषयरोगाचें सामर्थ्य असें चमत्कारिक आहे कीं, परमार्थ हा गोड असूनही त्यामुळें तो कडू वाटतो ( क. १० ). परमार्थाची प्राप्ति होण्यास मुख्य अनुताप झाला पाहिजे; अनुताप झाल्यास देव जवळच असतो ( क. १२ ). गुरूचे ठायीं अगर परमार्थाचे ठायीं अविश्वास उत्पन्न होणें हाच सर्व दोषांचा मुकुटमणि आहे ( क. १४ ). परद्रव्य व परनारी या दोहींचा विटाळ करून न घेणें हींच परमार्थमार्गांतील दोन मुख्य साधनें होत (क.१७). एका स्त्रीमुळेंच परमार्थाचा नाश होतो; त्यांत धनलोभाची भर पडल्यास मग अनर्थ विचारावयासच नको ( क. २४ ). अदृष्टाचें सामर्थ्य कांहीं विलक्षण आहे; देवाची कृपा झाल्याखेरीज अदृष्टाचें वर्चस्व कमी होणार नाहीं; भांडारगृहांत ठेविलेला कापूर उडून जातो, समुद्रांत तारूं बुडतें, ठक एकांतांत येऊन मुलाम्याचें नाणें देऊन जातात, पेवाआंत पाणी भरून धान्याचा नाश होतो, परचक्र येऊन तळघरें फोडून द्रव्य घेऊन जातात, गोठ्यांतच शेळ्या, गाई, म्हशी, यांवर रोग पडून त्यांचा संहार होतो, भूमीमध्यें निक्षेप ठेविला असतां तो धुळीस मिळून जातो, असे अदृष्टाचे नानाप्रकारचे चमत्कार आहेत ( क. २५ ). फूल गेल्यावर फळ उत्पन्न होतें, पण तेंही सवेंच नासतें; प्रेत नेणारे किती ओझें हो म्हणून ओरडतात, पण तेही लौकरच प्रेतावस्थेस जातात; मरण असा शब्द उच्चारला असतां थुंकणारें तोंड लौकरच मसणांत जळून जातें; एका देवास शरण गेल्यावांचून या काळापासून आपली सुटका होणार नाहीं ( क. २९ ). पांथस्थ ज्याप्रमाणें रात्रीं घरास येतो, व प्रातःकाळीं उठून जातो, त्याप्रमाणें आपण या

संसारांत असावें ( क्र. ३० ). मन मागेल तें त्यास देऊं नये ( क्र. ३२ ). मनामागें जाणारास मागें थोर थोर दगे झाले आहेत ( क्र. ३४ ). इंद्रचंद्रांस ज्यानें दरारा लाविला, ज्यानें नारदास धडक मारली, ज्यानें विश्वामित्रासारख्या ऋषीस नाडविलें, अशा एडक्या मदनास ज्याप्रमाणें शुकदेवानें ध्यान करून बांधून टाकिलें, त्याप्रमाणें आपण त्यास गुरूचे चरणीं आणून बांधावें ( क्र. ३५ ). देवाची आठवण ठेवणें हेंच परब्रह्मस्वरूप; देवास विसरणें हाच भवभ्रम आहे; असें एकनाथ म्हणतात ( क्र. ३६ ). ज्याच्या पोटांत भाव नाहीं त्यास नाम ही एक थट्टाच वाटते, पण अनुभव आला असतां मात्र त्याच्या संसाराच्या खेपा चुकतात ( क्र. ४० ). नामरूपांस मेळ न घालतां उगाच वाचेचा गोंधळ करण्यांत काय अर्थ आहे ( क्र. ४१ ) ? जो नामधारक आहे, त्याची योग्यता सहस्र ब्रह्मवेत्त्यांसही येणार नाहीं ( क्र. ४३ ). आपण देवाचें चिंतन केलें असतां देव आपलें व्यंग पडूं देत नाहीं ( क्र. ४६ ). ज्यास प्रेम नाहीं असा ज्ञानी एकाद्या शृंगारलेल्या रांडेप्रमाणें दिसतो ( क्र. ४८ ). भक्ति हें मूळ असून, वैराग्य हें त्याचें फूल, व ज्ञान हें फळ आहे ( क्र. ४९ ). नित्य कीर्तन करीत असतां रोज नवा नवा रंग ओढवतो, व श्रोता व वक्ता हे दोघेही देवरूपच होऊन जातात; वैष्णवांनीं आल्हादानें हरिनाम गर्जलें असतां त्याचा घोष गगनांत मावत नाहीं; हरीचें नाम गाइल्याबरोबर इंद्रियें आपआपला सर्व व्यापार विसरून जातात ( क्र. ५१ ). आपण ज्याचे घरीं कीर्तन करावें त्यांवर कोणतेंही ओझें घालूं नये; पर्णें भक्षूनही राहण्यास हरकत नाहीं ( क्र. ५६ ). संतांचीं परमपवित्र चरित्रें आदरबुद्धीनें वर्णन करावीं; सज्जनवृंदांस मनोभावानें नमन करावें; संतसंगतीमध्यें अंतरंगांत नाम घेत जावें; कीर्तनाचे रंगांत देवाजवळ सुखानें डोलावें; भक्तिज्ञानावांचून दुसऱ्या गोष्टी करूं नयेत;व ज्याच्यायोगें अंतरंगांत श्रीहरीची मूर्ति ठसावेल असें कीर्तन करावें (क्र.५७). श्रवणभक्तीनें परीक्षिति उद्धरून गेला आहे; कीर्तनानें नारद तरून गेला; हरिनामघोष करून प्रल्हाद पावन झाला; पादसेवनभक्ति करून रमा उद्धरून गेली; अक्रूरानें वंदनभक्ति केली; मारुतीनें दास्यत्व करून आपला उद्धार घेतला; अर्जुनानें सख्यभक्तीनें कृष्णास आपला ऋणी केलें; व बळीनें आत्मनिवेदनभक्ति करून देवास आपलें शिर समर्पिलें. या नाना प्रकारच्या भक्तींपैकीं कोणतीही भक्ति केली असतां ती उद्धारगतीस खात्रीनें कारण होईल यांत संशय नाहीं ( क्र. ५८ ).

२५. ज्यांस सर्वगत सदा ब्रह्म प्राप्त झालें अशा साधूंची भेट होणें मोठ्या भाग्याचें होय. वाऱ्यास आवरण घालवेल, रवि अस्तास जात असतां त्यास धरवेल, पण या संतांचें महिमान कळणार नाहीं ( क्र. ५९ ). अशांच्या केवळ दर्शनानेंच प्राण्यांस उद्धार होत असतो ( क्र. ६० ). आपलें धन तस्करानें नेलें असत ज्याचें मन उद्विग्न होत नाहीं, आपल्या पुत्राचा शत्रूनें वध केला असतांही ज्याच्या डोळ्यांस मोहाचा पाझर सुटत नाहीं, आपलें शरीर शत्रूनें गांजलें असतां ज्याच्या शांतीचा ठेवा चुकत नाहीं, त्यासच या जगांत साधु या नांवानें संबोधितां येईल ( क्र. ६१ ). संसारांत आपदा कितीही असोत, असा साधु वाचेनें सदा विठ्ठल नाम गात असतो ( क्र. ६३ ). शिष्यापासून सेवा घेणें हें तो अधमलक्षण समजतो (क्र.६७). अशा संतांची कृपा झाल्यासच हरीचें दर्शन होईल; तुमचे हातीं देव आहे तो मला एकदां दाखवा असें एकनाथ काकुळतीस येऊन संतांस म्हणतात (क्र.६८). संतांचें दर्शन झाल्यानें आज त्रिविधतापांची बोळवण झाली, व अनंतजन्मांचा शीण गेला ( क्र. ७३ ). आज संतसंग घडल्यानें भाग्याचा उदय झाला, व त्यामुळें आनंदाचे पूर लोटले, असें एकनाथ म्हणतात ( क्र. ७४ ). हे संत मेघापरीस उदार असून आपलें सर्व मनोगत पुरवितात; त्यांस शरण गेल्यास ते सर्व भार चालवितात; सर्व लिगाडें व उपाधि सोडवून आपणांमध्यें सरते करतात; व काळाचा घाव अंगास लागणार नाहीं असें करतात ( क्र. ७६ ). हे संत मायबापांपेक्षां श्रेष्ठ होत; कारण मायबाप जन्म देतात, व हे संत जन्म चुकवितात ( क्र. ८१ ). त्यांचे जे सोयरे होतात त्यांस ते यातिकुळाविरहित करितात ( क्र. ८६ ). अशा भक्तांच्या देहांत देव सदा वसून त्यांस धर्म व अर्थ अर्पण करतो ( क्र. ८७ ). देवावर भार घातला असतां तो निर्धारानें योगक्षेम चालवितो, यांत शंका नाहीं ( क्र. ८९ ). आपलें सर्व अंग वोढून तो भक्तपीडा निवारण करितो ( क्र. ९० ). भक्तांच्या अगोदर देव मुळींच नसल्यानें भक्त वडील व देव धाकुटा असें म्हणण्यास हरकत नाहीं (क्र. ९४).जो देवाची निंदा करितो, व संतांस सन्मानतो,त्यांस मुक्ति प्राप्त होते; कंसानें कृष्णाचा द्वेष केला, पण नारदास त्यानें सन्मानिलें, म्हणून तो सायुज्यसदनास गेला ( क्र. १०१ ). भक्त हेच देवाचें आराध्यदैवत होत, असें श्रीकृष्ण उद्धवास खात्रीनें सांगतात ( क्र. १०६ ). माझा शरणागत केविलवाणा दिसल्यास त्याची लाज मलाच आहे असें देव सांगतात ( क्र. १०७ ). धर्माची वाट सोडून अधर्म ज्यावेळेस शिगेस चढतो त्यावेळीं संतांस अवतार घ्यावा लागतो. नाना पाषांडमतांचे

खंडन करून, कर्मठतेचें तोंड ठेंचण्याकरितां, व जडजीवांचा उद्धार करण्याकरितां, संतांचा अवतार आहे. अशा संतांची देवही सर्व प्रकारें सेवा करितो. एकनाथाचे घरीं सडासंमार्जन करून गंध उगाळून देणाऱ्या श्रीखंड्याच्या रूपानेंच देवानें एकनाथाची सेवा केली असें म्हणण्यास हरकत नाहीं ( क्र. ११२ ). अशी संतसंगति धरल्यानें माझें जन्मास आल्याचें कार्य सिद्धीस गेलें असें एकनाथ सांगतात ( क्र. ११३ ).

२६. एकनाथांनीं आपल्यास साक्षात्कार कसा झाला याबद्दल आपल्या अभंगांत फार उत्तम रीतीनें वर्णन केलें आहे. प्रथम अष्टसात्त्विक भाव उत्पन्न झाल्यावांचून देव कृपा करीत नाहीं, असें एकनाथांनीं म्हटलें आहे. अंगावर रोमांच उभे राहणें, शरीरावर स्वेदाच्या कणिका उत्पन्न होणें, सर्वांगास कंप सुटणें, नेत्रांतून अश्रु वाहणें, अंतःकरणांत आनंदातिशय होणें, कंठ प्रेमानें दाटून येणें, वाचेस मौन्य पडणें, व नासिकांवाटें दीर्घ श्वासोच्छास निघणें हे अष्टसात्त्विक भाव व उत्पन्न झाल्यावांचून सत्त्वाची परिशुद्धि होत नाहीं ( क्र. ११४ ). मी कानावाटें नयनास येऊन शेवटीं नयनापुढें नयनरूपानें परिणमलों असें एकनाथ म्हणतात ( क्र. ११५). एकाजनार्दनास सर्वांगींच डोळे झाल्याप्रमाणें त्यांची स्थिति झाली, व तिन्ही अवस्था सोडून ते अर्धचंद्राच्या चांदण्यांत वागूं लागले, असें ते लिहितात ( क्र. ११६ ). हृदयांत चिन्मय प्रकाश उत्पन्न होऊन एकनाथांची भ्रांति निरसली ( क्र. ११८ ). जिकडे तिकडे पहांट होऊन पृथ्वी लखलखाटानें भरून गेली, असें एकनाथांनीं लिहिलें आहे ( क्र. ११९ ). त्या बोधभानूस सायंप्रातर्माध्यान्ह नाहींसे होऊन, सर्वदा उदयच असल्यानें, अस्तवर्ण अस्तास गेलें, व त्यामुळें पूर्वपश्चिमभाव उरला नाहीं ( क्र. १२० ). जळाच्या आंत बुडी दिल्यावर तेथेंही चिन्मात्र दिसल्यानें जळसुद्धां पावन होऊन गेलें, असें एकनाथ म्हणतात ( क्र. १२१ ). स्वयंप्रकाशांत स्नान करून सर्वभूतनमनरूपी संध्या एकाजनार्दनांनीं केल्यावर ( क्र. १२२ ), त्यांचा संदेह नाहींसा होऊन आत्माराम त्यांच्या हृदयाकाशपालखींत विराजमान झाला ( क्र. १२३ ). एकनाथांनीं नामाची घनगर्जना केल्याबरोबर जनार्दनसागरास पूर आला असें ते लिहितात ( क्र. १२४ ). देवाचा चमत्कार असा कीं तो लग्न लागल्याबरोबर विटाळावांचून पोटास आला, व इतर पाहणाऱ्यांस सुद्धां त्यानें पिसें

लावून सोडलें ( क्र. १२५ ). "चतुर्भुज श्याममूर्ति । शंखचक्र ते शोभती । पीतांबर वैजयंती । रुळती गळां" अशा प्रकारचा देव मीं पाहिला, पाहिला, असें एकनाथ द्विवार सांगतात; अशा देवास पाहिल्यावर भक्तही विदेही होऊन त्यास भेटला; दोघांची मिळणी होतांच देवभक्तभाव नाहींसा झाला; नामाचा एकसारखा छंद घेतल्यानें, व कायावाचामनांमध्यें निश्चय पूर्णपणें वागविल्यानें, एकाजनार्दनाचा देव अंकित झाला असें ते म्हणतात ( क्र. १२६ ). आज मी धन्य झालों; कारण मीं हृदयांतच चतुर्भुज देवास पाहिलें, असें एकनाथांनीं म्हटलें आहे ( क्र. १२७ ). आतां मी जिकडे जाईन, तिकडे मला देवच दिसतो; जिकडे पाहीन, तिकडे देव पुढेंच उभा आहे असें वाटतें ( क्र. १२८ ). गुरुरूपांजन डोळ्यांत घातल्यानें आंत राम, बाहेर राम; जागृतींत राम, स्वप्नांत राम, सुषुप्तींत राम; अशी माझी स्थिति होऊन गेली ( क्र. १२९ ). या देवास प्रावर्ण कांहींच नसल्यानें जेथें तेथें देव उघडाच दिसून देव निलाजरासा वाटतो; देवानें पांढऱ्या डुकराचेंही रूप घेतलें आहे, अशी माझी खात्री पटली ( क्र. १३२ ). या देवास बाहेर नेऊन घातलें तरी घरीं आल्याबरोबर तो पुनः घरांतच दिसतो ( क्र. १३३ ). घर सोडून परदेशास गेलों असतां देव माझ्या समागमेंच असतो; कड्यांकपाटांवर पहावें तिकडे देवाचेंच रूप दिसतें ( क्र. १३४ ). सगळें मनच रामांत रंगून गेल्यानें तें राममय होऊन गेलें, व पाहतां पाहतां विश्व मावळून गेलें अशी स्थिति झाली आहे, असें एकनाथ म्हणतात ( क्र. १३६ ). दोराचा सर्प जसा जिवंतही राहत नाहीं, व मरतही नाहीं, तसा देह असो वा नसो, त्याची आम्हांस किंमत नाहीं ( क्र. १३८ ). जगन्नाथाच्या चरणीं चित्त लागल्यानें आतां सर्व त्रैलोक्यच आनंदाचें होऊन गेलें आहे (क्र. १३९). देवास मी पाहूं गेलों तों मी देवरूपच होऊन ठेलों ( क्र. १४२ ). आतां मी देवाची पूजा करूं गेलों असतां माझचि मी पूजा केल्याप्रमाणें होणार आहे; पूजनाचीं सर्व उपकरणें म्हणजे अन्न, गंध, दीप वगैरे हीं सर्व देवमयच होऊन गेलीं आहेत (क्र. १४३). आपली आपण पूजा करण्याची राहटी जोंपर्यंत जगांत नाहीं, तोंपर्यंत आपली आपण पूजा करणाऱ्या ज्ञान्यापेक्षां अज्ञानच बरा असें म्हणण्यास हरकत नाहीं ( क्र. १४४ ). आतां मींच आत्माराम झाल्यानें मी परब्रह्मरूप बनलों आहे; मी एकट एकला असून आतां मला, आधिव्याधि, अगर उपाधि कांहींच उरल्या नाहींत ( क्र. १४५ ). जें जें माझ्या दृष्टीस दिसतें, तें तें परब्रह्मरूपच झालें आहे ( क्र. १४७ ). आठही दिशांस देव संपूर्ण

भरल्यानें आतां पूर्वपश्चिमभाव राहिला नाहीं, व देवावांचून कोठें रिता ठावही उरला नाहीं ( क्र. १४९ ). उत्तमभूमि शोधून हें मी गुरुवचनबीज पेरिलें आहे; प्रेमाचें पीक ज्या वेळीं येईल त्या वेळीं तें सांठविण्यास गगनही पुरणार नाहीं; चार वेद व सहा शास्त्रें यांनीं माप घातलें, तरी देव अद्याप अमेयरूपच राहिला आहे; अंतः-करणांतल्या निकट भावावांचून देहांत पिकलेल्या देवाचें माप घेणें अशक्य आहे असें एकनाथ म्हणतात ( क्र. १५० ).

२७. या ग्रंथाचे कामीं प्रो. कृष्णाजी वेंकटेश गजद्रगडकर, प्रो. शंकर वामन दांडेकर, रा. सा. वासुदेवराव दामले, रा. शंकर केशव धर्माधिकारी, व रा. जगन्नाथ रघुनाथ लेले या सर्वांची निरनिराळ्या प्रकारची जी मदत झाली आहे तिजबद्दल मी त्या सर्वांचा फार आभारी आहें. गणेश प्रिंटिंग वर्क्सच्या मालकांनीं व आर्यभूषण छापखान्याच्या मालकांनीं फार मेहनतीनें व काळजीपूर्वक हें पुस्तक छापून दिलें त्याबद्दल मी त्यांचाही फार आभारी आहें.

**रा. द. रानडे.**

# संतवचनामृत

## अनुक्रमणिका

### भाग पहिला: ज्ञानदेवादि संत



### भाग दुसरा: नामदेवादि संत.

## भाग तिसरा: एकनाथादि संत

# निवृत्तिनाथ.

## १ गुरुपरंपरा व समकालीन संत.

### १. निवृत्तिनाथांची गुरुपरंपरा.

आदिनाथ[1] उमा बीज प्रकटलें । मच्छिंद्रा लाधलें सहजस्थिती ॥
तेचि प्रेममुद्रा गोरक्षा दिधली । पूर्ण कृपा केली गयनीनाथा ॥
वैराग्यें तापला सप्रेमें निवाला । ठेवा जो लाधला शांतिसुख ॥
निर्द्वंद्व निःसंग विचरतां मही । सुखानंद हृदयीं स्थिर जाला ॥
विरक्तीचें पात्र अन्वयाचें[2] मुख । देऊनि सम्यक् अनन्यता ॥
निवृत्ति गयनी कृपा केली पूर्ण । कुळ हें पावन कृष्णनामें ॥

### २. गुरुकृपेनें संसारवृक्षाचें छेदन.

सुमनाची लता वृक्षीं निपजली । ते कोणें घातली भोगावया ॥
तैसा हा पसारा जगडंबर खरा । माजि येरझारा शून्य खेपा ॥
नाहीं यासी छाया नाहीं यासी माया । तो हा वृक्ष वाया विंदान[3] करी ॥
निवृत्तिराज म्हणे तो गुरुविण न तुटे । प्रपंच सपाटे ब्रह्मीं नेतुं[4] ॥

### ३. गहिनीप्रसादानें सर्वगत आत्मा आम्हांस प्रत्यक्ष दिसतो.

सर्वांघटीं[5] वसे तो आत्मा प्रकाशे । प्रत्यक्ष आम्हां दिसे गुरुकृपा ॥
विरालें तें ध्येय ध्यान गेलें मनीं । मनाची उन्मनी[6] एक जाली ॥

---

१ शंकर. २ संयोग. ३ काशल्य. ४ नेणारा. ५ शरीर. ६ मनराहितस्थिति.

ठेलो[१] अहंभाव सर्व दिसे देव । निःसंदेह भव[२] नाहीं आम्हां ॥
निवृत्तिसाधन गयनीप्रसाद । सर्व हा गोविंद सांगतुसे ॥

४. जो प्रत्यक्ष हरि डोळ्यांस दाखवील असाच सद्गुरु करावा.

सप्तपाताळें एकवीस स्वर्गें पुरोनि उरला हरि ।
काया माया छाया विवर्जित दिसे तो आहे दुरी ना जवळी गे बाईये॥
प्रत्यक्ष हरि तो दाविपां डोळां ऐसा सद्गुरु कीजे पाहोनि ।
तनु मन धन त्यासी देऊनि ते वस्तु घ्यावी मागोनि गे बाईये ॥
पावाडां पाव आणी करी परवस्तुसी भेटी ऐसा तोचि ।
तो सद्गुरुविण मूढासि दर्शन कैचें ऐसा तोचि चमत्कारु गे बाईये ॥
एक मंत्र एक उपदेशिती गुरु ते जाणावे भूमिभारु ।
निवृत्ति म्हणे तत्त्वं[३] साक्षित्वें दावी ऐसा तोचि चमत्कारु गे बाईये॥

५. समकालीन संतांचा उल्लेख.

सोपान संवगडा[४] स्वानंद ज्ञानदेव । मुक्ताईचा भाव विठ्ठलराज ॥
दिंडी[५] टाळ घोळ गाती विठ्ठलनाम । खेचरासी प्रेम विठ्ठलाचें ॥
नरहरि विठा[६] नारा[७] ते गोणाई[८] । प्रेमभरित डोहीं वोसंडती ॥
निवृत्ति प्रगट ज्ञानदेवा सांगे । पुंडलिकासंगें हरि खेळे ॥

६. खेचर व सोपान हे जणूं कांहीं परब्रह्माचे अंकुरच होत.

धन्य हा खेचर धन्य हा सोपान । भक्तीचें जीवन जनक हेतु ॥
धन्य याचें कुळ पवित्र कुशळ । नित्य या गोपाळ जवळी असे ॥
याचेनि स्मरणें नाशती दारुणें । कैवल्य पावणें ब्रह्मामाजी ॥
निवृत्ति म्हणे परब्रह्म हे साकार । तेथील अंकुर उमटले ॥

---

१ नाहींसा झाला. २ संसार. ३ आत्मवस्तु. ४ सोबती. ५ वीणा. ६–७ नामदेवांच्या मुलांचीं नांवें. ८ नामदेवाची आई.

## २ निवृत्तिनाथांचा उपदेश.

७. अनुभवाच्या गांवांत ज्ञान हें फळ असून विज्ञान हा वृक्ष आहे.

अनुभवाच्या गांवीं ज्ञान हेंचि फळ। विज्ञान केवळ वृक्ष तया ॥
साधनीं स्वानुभव अनुभवीं अनुभव। ब्रह्माची राणीव आम्हां घरीं॥
रिकामा बरळु नस खेळेमेळे। ब्रह्माची कल्लोळे भोगितुसे ॥
निवृत्ति सरळ निरसलें अज्ञान। सर्वत्र संपन्न आत्माराम ॥

८. जेथें शुद्ध वासना आहे तेथेंच वैकुंठ आहे.

देहीं देव आहे हें बोलती वेद। परि वासनेचे भेद न दवडिती ॥
वासना पैं चोख तेथेंचि वैकुंठ। भावेंचि प्रगट होये जना ॥
न लगती सायास करणें उपवास। नाममात्रें पाश तुटे जना ॥
निवृत्ति पहातु देहामाजी प्रांतु। देवचि दिसतु सर्वांघटीं ॥

९. दया, शांति, करुणा हींच योग्याचीं चिन्हें होत.

सर्वभूतीं दया शांति पैं निर्धारी। तो योगी पैं साचार जनीं इये॥
नलगे मुंडणें काया हे दंडणें। अखंड कीर्तनें स्मरे हरी ॥
शिव जाणे जीवीं क्षरला चैतन्य। हें जीवीं कारुण्य सदा भावी ॥
गगनीं सूर्य तपे अनंत तारा लोपे। एकुचि स्वरूपें आत्मा तैसा॥
उगवला कळीं उल्हासु कमळीं। तैसा तो मंडळीं चंद्र देखा ॥
निवृत्तिमंडळ अमृत सकळ। घेतलें रसाळ हरिनाम ॥

---

१ विशेष प्रकारचें, अनुभवाचें, ज्ञान. २ राज्य. ३ बडबड. ४ लाट. ५ प्रकार. ६ देव. ७ शरीर. ८ खरोखर. ९ कष्टवणें, त्रास देणें. १० कलांनीं, किरणांनीं.

**१०. परापवाद व परनिंदा ऐकतांच निजमौन्यानें कृष्णजप करावा.**

परापवाद[1] कानीं परनिंदा झणी[2] । ऐकतां निजमौनीं कृष्ण जप ॥
हरि हरि म्हणे नायके ते मातु[3] । द्वैत तया आंतु नेघे बापा ॥
दुजियाची निंदा अपवाद सदा । वाचेसी गोविंदा जप करी ॥
निवृत्ति तत्पर नाइके ते शब्द । नित्यता गोविंद जपतसे ॥

**११. "विष्णुपणें लोपों भान तुझें."**

अपशब्द कानीं पडतांचि द्वैत । नाम हें अच्युत नये रयां[4] ॥
परनिंदा पीडा करितांचि मूढा । पडिलासी वेढा योनिमाळें[5] ॥
आपस्तुति नको आपपर ऐकों । विष्णुपणें लोपों भान तुझें ॥
निवृत्ति सत्वर द्वैत हें निरसी । अद्वैतसमरसीं दिधला असे ॥

**१२. देहांत आत्मा निरंतर नांदत असतां इकडे तिकडे कां धांवतोस ?**

देहाच्या दीपकीं[6] एकी वस्तु चोख । असोनियां शोक कां करितोसि ॥
देहभरी आत्मा नांदे निरंतर । असतां हा विचार कां धांवतोसी ॥
तुझें तूं पाहीं आहे तें घेईं । एकरूप होईं गुरुखूणें ॥
निवृत्तीचें सार हरिरूप सदा । नित्य परमानंदा रातलांसे[7] ॥

**१३. जंव काळ पाहुणा आला नाहीं तंववरच नामस्मरणाचा वेग करा.**

संसारभ्रमें भ्रमले हे जीव । नेणती हे मांव[8] रोहिणीची[9] ॥
जाईल हा देह सरेल आयुष्य । आपेंआप भविष्य उभें राहे ॥
वेगु करा आधीं रामनामचिंतना । जंव नाहीं पाहुणा काळ आला ॥

---

१ दुसऱ्याचे दोष. २ कदाचित्. ३ गोष्ट. ४ बापा. ५ जन्माची परंपरा. ६ ज्योत. ७ रंगणें, रमणें. ८ माया, भास. ९ मृगजळ.

सर्वत्र श्रीराम ऐसा करा वाचे । सुटतील मोहाचे मोहपाश ॥
तिमिरपडळ[1] निमाली पैं दृष्टी । प्रपंच हे सृष्टि[2] दिसतुसे ॥
निवृत्तीचें सार रामकृष्णनाम । वैकुंठ परम सर्वकाळ ॥

## १४. समर्थाचे घरीं कांहीं उणें नसल्यानें आम्हांस नामप्रेम द्यावें इतकेंच आम्हीं मागतों.

न जाणती कळाकुसरी[3] गोपाळा । नाम हें मंगळा अच्युताचें ॥
हेंचि मज द्यावें सप्रेम आपुलें । ध्यातुसे पाउलें एवढ्यासाठीं ॥
न मागे नेणें कांहीं यावीण आणिक । सप्रेमाची भूक तृष्णा करी ॥
सामर्थ्याचे घरीं कांहीं नाहीं उणें । अखंड प्रेम देणें कृष्णनामीं ॥
इतुकेंचि दातारा पुरवीं माझें कोड । यावीण काबाड भार नेघे ॥
निवृत्ति सप्रेम संजीवनी मूळ । स्मरतां काळवेळ नाहीं नामीं ॥

## १५. ज्याच्या मुखांत नाम वसतें तेथेंच हरि असतो.

नाम मुखीं सदा तोचि पैं भाग्याचा । तयासी यमाचा धाक नाहीं ॥
रामराम हरि सर्वकाळ वसे । तेथेंचि वसे बसे हरि ॥
हरिध्यान वसे अखंड पैं सर्वदा । न पवे तो आपदा[4] इये जनीं ।
निवृत्ति समता हरिभजन करी । सर्वत्र कामारी[5] ऋद्धिसिद्धि ॥

## १६. ज्याच्या मुखांत नामाची सरिता आहे तो एकच पुरा घट आहे असें समजावें.

ज्याचे मुखीं नाम अमृतसरिता[6] । तोचि येकु पुरता घटु जाणा ।
नामाचेनि बळें कळिकाळ आपणां । ब्रह्मांडायेसणा[7] तोचि होय ॥
न पाहे यम काळ तयाकडे अवचितां[8] । नामाची सरिता ज्याचे मुखीं ॥
निवृत्ति नामामृत उच्चारी रामनाम । नित्यता परब्रह्म याचे घरीं ॥

---

१ अंधाराचें पडळ. २ सृष्ट, अर्थात् विनाशी, खोटें. ३ कलाकौशल्य. ४ दुःख. ५ दासी. ६ अमृताची नदी. ७ एवढा. ८ चुकून.

## ३. श्रीकृष्णाचें सगुणनिर्गुण वर्णन.

### १७. कृष्ण हाच देव आम्हीं हृदयांत पूजितों.

कल्पना कोंडूनि मन हें मारिलें। जीवन चोरिलें सत्त्वाचें[1] ॥
साजीव सोलीव निवृत्तीची ठेव। कृष्ण हाचि देव हृदयीं पूजीं ॥
विलास विकृति[2] नाहीं पैं अवाप्ति[3]। साधनाची युक्ति हारपली ॥
निवृत्ति कारण योगियांचें हृदयीं। सर्व हरि पाहीं दिसे आम्हां ॥

### १८ श्रीकृष्णाचें सगुणरूपानें वर्णन.

परेसि[4] परता पश्यंती वरुता। मध्यमे[5] तत्वतां न कळे हरि ॥
तें हें कृष्णरूप गौळियांचें तप। यशोदेसमीप नंदाघरीं ॥
चोखट चोखाळ मनाचें मवाळ। कांसवीचा ढाळ जया नेत्रीं ॥
निवृत्ति सर्वज्ञ गुरूची धारणा। ब्रह्म सनातना माजी मन ॥

### १९. श्रीकृष्णरूपामध्यें हें सकळ होत जातें.

भरतें ना रितें आपण वसतें। सकळ हें होतें तयामाजी ॥
तें रूप पैं ब्रह्म चोखाळ सर्वदा। नित्यता आनंदा नंदाघरीं ॥
आशापाश नाहीं अशिजे पूर्णपणें। सकळ जग होणें एकरूप ॥
निवृत्ति तटाक रूपें ब्रह्म एक। जेथ ब्रह्मादिक हारपती ॥

### २०. शून्य गगनामध्यें उगवलेल्या चंद्राप्रमाणें श्रीकृष्णाचें तेज.

निरशून्य[7] गगनीं अर्क उगवला। कृष्णरूपें भला कोंभ[8] सरळु ॥
तें रूप सुंदर गौळियांचे दृष्टि। आनंदाची सृष्टि नंदाघरीं ॥

---

१ जीवनकला. २ विकार. ३ प्राप्ति. ४ चौथी, तुर्यावस्थेंतील वाणी. ५ स्वसंवेद्य वाणी. ६ आकार, तेज. ७ अत्यंत शून्य. ८ अंकुर.

रजतम गाळी दृश्याकार होळी। तदाकारजळीं कृष्ण बिंबे ॥
निवृत्ति साकार शून्य परात्पर। ब्रह्म हें आकार आकारलें ॥

२१. ईश्वरानें प्रेमळांचीं घोंडीं धुतलीं आहेत.

म्हणवितो नंदाचा बाळ यशोदेचा। आपण चौंवोचातीत[1] कृष्ण ॥
शब्दासी नांतुडे[2] बुद्धिसी सांकडें[3]। तो सप्रेमें आतुडे स्मरतां नाम ॥
उपचाराच्या कोडी न पाहे परवडी[4]। तो प्रेमळाची घोंडीं धुये अंग ॥
निवृत्तीचें तप फळलें अमूप। गयनिराजें दीप उजळिला ॥

२२. कृष्ण हा अंधाऱ्या रात्रीं प्रकाशमान होणारा सूर्यच आहे.

अंधारिये रातीं उगवे हा गभस्ति[5]। मालवेना दीप्ति गुरुकृपा ॥
तो हा कृष्ण हरि गोकुळामाझारीं। हाचि चराचरीं प्रकाशला ॥
आदि मध्य अंत तिन्हीं जालीं शून्य। तो कृष्णनिधान गोपवेषें ॥
निवृत्ति निकट कृष्णनामपाठ। आवडी वैकुंठ वासिन्नलें ॥

२३. हरि हा आमच्या माजघरांत नांदत आहे.

नाहीं जनीं विजनीं विज्ञानीं[6]। निर्गुणकाहाणी आम्हां घरीं ॥
सुलभ हरि दुर्लभ हरि। नांदे माजघरीं आमुचिये ॥
आनंदसोहळा उन्मनीची कळा। नामाचि जिव्हाळा जिव्हे सदा ॥
निवृत्तिदेवां साधनीं राणीव। हारपला भाव इंद्रियांचा ॥

२४. हरि नित्य सोंवळा असून अखंड निर्मळ आहे.

सजीव सांजिरी[7] तिर्गुण[8] गोजिरी[9]। नांदे माजघरीं आत्मराजु ॥
सदाचार आम्हां नित्य हरिप्रेमा। नेणों मनोधर्मा प्रपंचाचिया ॥

१ चारीवाणीच्या पलीकडचा. २ सांपडत नाहीं. ३ संकट. ४ प्रकार. ५ सूर्य. ६ अनुभवाचें ज्ञान. ७ सुंदर. ८ त्रिगुणात्मक, साकार. ९ गोंडस.

नित्य पैं सोंविळा अखंड पै निर्मळा। झणीं बारा सोळा म्हणाल तया।
निवृत्तिदेवी कलिका पैं अमूप। विश्वीं विश्वरूप दावीतसे ॥

२५. श्रीकृष्णाचें रूप आम्हांस उन्मनींत भोगावयास सांपडतें.

विकट[2] विकास विनट[3] रूपस। सर्व हृषीकेश दिसे आम्हां ॥
तें रूप साजिरें नंदाचें गोजिरें। उन्मनीं निर्धारें भोगूं आम्हीं ॥
विलास भक्तीचा उन्मेष नामाचा। लेशु त्या पापाचा नाहीं तेथें ॥
निवृत्ति म्हणे ते सुखरूप कृष्ण। दिननिशीं प्रश्न हरि हरि ॥

---

## ४. साक्षात्कार.

२६. देह हेंच आत्म्याचें मंदिर आहे.

दिनानिशीं[4] नाहीं अवघा दीपक। एकरूपें त्रैलोक्य बिंबलेंसें ॥
तें रूप सांगतां नये पैं भावितां। गुरुगम्य हाता एकतत्त्वें ॥
सांडावें पैं कोहं धरावें पैं सोहं। अनेकत्वें ओहं एकतत्त्वीं ॥
निवृत्ति साकार वैकुंठींचें घर। देह हें मंदिर आतमयाचें ॥

२७. चंदनाचा सुवास, जाईजुईचा परिमळ, व कल्पतरूच्या आगरुवापेक्षां हरि आम्हांस प्रिय आहे.

चंदनाचें झाड परिमळें वाड[5]। त्याहूनि कथा गोड विठ्ठलाची ॥
परिमळु सुमनीं जाई जुई मोगरे। त्याहूनि साजिरे हरि आम्हां ॥

---

१ ज्योत. २ मोठें, अपरंपार. ३ सुशोभित. ४ अहोरात्रीं. ५ मोठें.

आम्हां धर्म हरि आम्हां कर्म हरि । मुक्ति मार्ग चान्ही हरि आम्हां ॥
कल्पतरु इच्छेसी सागरु । त्याहूनि आगरु हरि माझा ॥
निवृत्ति सुवासु ब्रह्माचा प्रकाशु । विठ्ठलरहिवासु आम्हां पुरे ॥

### २८. सुमनाच्या वासास जसे भ्रमर भुलतात तसें संत विठ्ठलांत लीन होतात.

कमळाच्या स्कंधीं गुणीं गुढारलें । वरि आकारलें फूल तया ॥
सुमनाचेनि वासें भ्रमर भुलले । मार्ग पैं विसरले इंद्रियांचा ॥
तैसे हे संत विठ्ठलीं तृप्त । नित्य पैं निवांत हरिचरणीं ॥
नाठवे हे दिन नाठवे निशी । अखंड आम्हांसी हरिराज ॥
तल्लीन प्रेमाचे कल्लोळ अमृतांचे । डिंगर[3] हरीचे राजहंस ॥
टाहो करूं थोरु विठ्ठलकीर्तनें । मनाच्या सुमनें हरी पुजूं ॥
निवृत्ति निवांत तल्लीन पैं जाला । प्रपंच अबोला हरिसंगें ॥

### २९. तंत आणि वितंतामध्यें उमटलेल्या अनाहतनादानें गुरुनामस्मरण.

तंतें[4] आणि वितंतें[4] त्यामाजि मथित । नाद उमटत स्वानंदाचा ॥
सोहं बीजतत्त्व गुरुनाम मंत्र । ज्ञानी उपासित हरिराज ॥
भेदुनी कुंडलिनी गोल्हाट[5] निकट । आत्माराम पेठ पांडुरंग ॥
निवृत्ति म्हणे मी सर्वस्व होईन । हरि हा भरीन पूर्ण देहीं ॥

### ३०. सर्वव्यापक ईश्वराची अखंड वाजणारी नौबत.

जेथें पाहे तेथें व्यापिलें अनंतें । तयाविण रितें[6] कोण ठाये ॥
गगनेविण ठावो नाहीं जैसा रिता । तैसा या अच्युताविण कांहीं ॥

---

१ सुगंध. २ गुप्त असणें. ३ लाडके लेक. ४ आडवे उभे तंतु; श्वास-निःश्वास. ५ एक चक्र. ६ रिकामें.

तेथें माझ्या चित्ता करी रहिवासु । न करी उदासु पेसियातें ॥
निवृत्तीनें मन ठेविलें चरणीं । नामाची निशाणी अखंडित ॥

## ३१. "असें तें न दिसे, नसें तें आभासे."

गगनीं अभ्र[2] चाले चंद्र असे निश्चळ। पृथ्वीतळीं बाळ चाले म्हणे॥
भ्रमाच भुलीव आलेंसें पडळ । प्रत्यक्ष केवळ डोळियांसी ॥
असे तें न दिसे नसें तें आभासे । विषयांच्या विषें घोरलेंसे[3] ॥
निवृत्ति कवळ[4] भ्रमाचा सांडिला । अखंड ध्यायिला हृषीकेश ॥

## ३२ निवृत्तिचातक हरीस्तव वरतीं पाहात आहे.

आम्ही चकोर हरि चंद्रमा । आम्हीं कळा तो पूर्णिमा ॥
कैसा बाहिजु[5] भीतरी हरि । बिंबे बिंबला एकसूत्रीं ॥
आम्ही देही तो आत्मा । आम्ही विदेही तो परमात्मा ॥
ऐक्यपणें सकळ वसे । द्वैतबुद्धि कांहीं न दिसे ॥
निवृत्तिचातक इच्छिताहे । हरिलागीं वरतें पाहे ॥

## ३३. दीपाची कळिका दीपांतच सामावते.

दीपाची कळिका[6] दीपींचि समावे। तैसा जिवशिव वोळखिवो जी॥
दीप आहे देहीं तयाचे हे प्रकाश। त्याचेनि सावकाश हरि भजे रया॥
न मिळे आयुष्य न मिळे घटिका। देह क्षण एका जाईल रया ॥
निवृत्तीचा दीप दीपाचिये मुसे[7] । आटोनि सौरसें[8] एक जाला ॥

## ३४. कैसा देव देहांत दिवटीप्रमाणें प्रकाशमान होत आहे !

आम्ही किरण तूं सुर्यो । आम्हीं अस्तु तूं उदयो ॥
कैसा देहीं देवो दिवटा । परा पश्यंती चारी वाटा ॥

---

१ नौबत. २ ढग. ३ व्यापणें. ४ ग्रास, पडळ. ५ बाहेर. ६ ज्योत. ७ सोनें वगैरे धातु आटवण्याचें पात्र. ८ समरसपणानें.

आम्ही कळा तूं चंद्रमा। तूं अमृत आम्ही गरिमा ॥
आम्ही निधि तूं निधान। आम्हीं ध्येय तूं साधन ॥
निवृत्ति उपरति वाहे। हृदयीं कृष्णनाथ ध्याये ॥

३६. आम्हांस काळवेळ नसून, अखंड ज्योतिरूप हरि दिसत आहे.

त्रैलोक्य पावन जनीं जनार्दन। त्यामाजि परिपूर्ण आत्मज्योति ॥
नाहीं आम्हां काळ नाहीं आम्हां वेळ। अखंड सोज्वळ हरि दिसे ॥
ब्रह्म सनातन ब्रह्मींचे अंकुर। भक्तिपुरःसर भूतदया ॥
निवृत्ति म्हणे दीन दुर्बळ मी एक। मनोमय चोख आम्हां गोड ॥

३६. आत्मोदयांत ताराग्रहमेदिनीचा लोप.

गोविलो[1] चरणीं टाकिली सांडणी[2]। विषयपोखणी[3] दुरी ठेली ॥
पाहांट पाहाली ब्रह्में उगवली। दिननिशीं जाली एकरूप ॥
नाहीं तारा ग्रह नाहीं हे मेदिनी। सर्व जनार्दनीं बिंबलेंसे ॥
निवृत्ति निकट ब्रह्म सर्व घोट। अवघा निघोट[4] राम आम्हां ॥

३७. हरीच्या तेजामुळें चंद्र, सूर्य, तारा दिसत नाहींत.

हरीविण न दिसे जनवन आम्हां। नित्य हे पौर्णिमा सोळाकळी ॥
चंद्रसूर्यरश्मि न देखों तारांगणें। अवघा हरि होणें हेंचि घेवों ॥
न देखों हे पृथ्वी आकाश पोकळी। भरलासे गोपाळीं दुमदुमित ॥
निवृत्ति निष्काम सर्व आत्माराम। नयनी हे धाम गुरुगम्य ॥

३८. आत्मबोधामध्यें निवृत्तिनाथ दर्पण विसरतात.

गगनीं वोळलें[5] येतें तें देखिलें। दर्पणीं बिंबलें आपणपें ॥
तें रूप रूपस रूपाचा विलास। नामरूपीं वेष कृष्ण ऐसे ॥

---

१ गुंतली. २ ओंवाळून टाकलेला पदार्थ. ३ पोसणें, पुष्टी. ४ सकट, सर्व.
५ वळणें, प्राप्त होणें.

सांडुनी दिठीवें जालासे राजीवें । सर्वत्र अवेव ब्रह्म येणें ॥
निवृत्ति घडुला सर्वत्र बिंबला । दर्पण विसरला आत्मबोधीं ॥

३९. उन्मन्यवस्थेंत सर्व हरिमय होऊन जातें.

उन्मनी अवस्था लागली निशाणी । तन्मयता ध्यानीं मुनिजनां ॥
मन तेथें नाहीं पहासीरे कांहीं । सर्वहरिडोहीं बुडी दे कां ॥
मनाची कल्पना देहाची भावना । शून्य ते वासना हरीमाजी ॥
निवृत्ति म्हणे सर्व हरिपिक पिकलें । ज्ञानासी लाधलें गुरुकृपा ॥

४०. मन शून्यांत, ध्यान उन्मनींत, चित्त नारायणांत लागून गेलें आहे.

अनंत ब्रह्मांडें अनंत रचना । शून्य हे वासना तेथें जाली ॥
मन गेलें शून्यीं ध्यान तें उन्मनीं । चित्त नारायणीं दृढ माझें ॥
जेथें नाहीं ठावो वेदासि आश्रयो । लोपले चंद्रसूर्यो नाहीं सृष्टि ॥
निवृत्ति म्हणे तो ठाव मज पैठा । नेतसे वैकुंठा गुरु माझा ॥

४१. आम्हांस सर्वत्र गोंसावी दिसतो.

दिहाची दिवटी अखंड पैं सतेज । चंद्रसूर्य भोज नाहीं तेथें ॥
नाहीं तेथें रवि नाहीं तेथें चंद्र । अवघाचि महेंद्र एकतत्वें ॥
दीपकेंचि दीपक विस्तार अनेक । अवघाचि त्रैलोक्य एकतत्त्वें ॥
निवृत्ति संपन्न एकतत्त्व सेवी । सर्वत्र गोंसावी दिसे आम्हां ॥

४२. निवृत्तिनाथ आत्मालिंगाच्या चरणरजांवर लोळण घेतात.

हरिदाससंगें हरिरूप खेळे । ब्रह्मादिक सोहळे भोगितातीं ॥
संत मुनिदेव सनकादिक सर्व । तीहीं मनोभाव अर्पियेला ॥

---

१ दृष्टि. २ सुंदर. ३ घडलेला घट ४ निशाण, नौबत. ५ प्राप्त. ६ दिवस. ७ कौतुक.

पुंडारिका फळ वोळलें सकळ । शंकर सोज्वळ प्रेमें डुले ॥
निवृत्ति लांळत चरणरजीं लाठा । माजी त्या वैकुंठा आत्मालिंगीं ॥

४३. आत्मा हाच विश्वरूपानें विनटतो.

सर्व परिपूर्ण भरलेंसे अखंड । त्यामाजि ब्रह्मांड अनंत कोटि ॥
आपणाचि देव आपणाचि भक्त । आपण विरक्त सर्व जाला ॥
अनंत संकेत जीवाशिवरत । मागुतें भरत सिंधु तोयें ॥
निवृत्ति म्हणती तेथींचे हे अंश । साधक विश्वास गयनिराजें ॥

---

१ बलाढ्य, बळकट. २ पाणी.

# ज्ञानदेव.

## १ विठ्ठलभक्ति.

### १. सकळमंगळनिधि विठ्ठलाचें नाम घ्या.

सकळमंगळनिधी । श्रीविठ्ठलाचें नाम आधीं ॥
म्हण कां रे म्हण कां रे जना । श्रीविठ्ठलाचें नाम वाचें ॥
पतीतपावन सांचें[१] । श्रीविठ्ठलाचें नाम वाचें ॥
बाप रखुमादेवीवरु साचें । श्री विठ्ठलाचें नाम वाचें ॥

### २. एकटया विठ्ठलास जाणणें हीच भक्ति व हेंच ज्ञान.

सकळ नेणोनियां आन । एकला विठ्ठलुचि जाण ॥
पुढती पुढती मन । एकला विठ्ठलुचि जाण ॥
गुरुगम्य ही तयाची खूण । एकला विठ्ठलुचि जाण ॥
बुझसी[२] तरि तूंचि निर्वाणें[३] । एकला विठ्ठलुचि जाण ॥
हेचि भक्ति हेंचि ज्ञान । एकला विठ्ठलुचि जाण ॥
बाप रखुमादेवीवरा विठ्ठलाचि आण[४] । एकला विठ्ठलुचि जाण ॥

### ३. पूर्वसुकृताच्या जोडीमुळें विठ्ठलावर आवड उत्पन्न होते.

रूप पाहतां लोचनीं । सुख जाले हो साजणी[५] ॥
तो हा विठ्ठल बरवा । तो हा माधव बरवा ॥
बहुतां सुकृतांची[६] जोडी । म्हणुनी विठ्ठलीं आवडी ॥
सर्व सुखाचें आगरु[७] । बाप रखुमादेवीवरु ॥

---

१ खरोखर. २ समजणें. ३ शेवट. ४ शपथ. ५ गडे. ६ पुण्य.
७ पिकण्याची जमीन.

### ४. माझें सर्व गोत पंढरीसच आहे.

देखिले तुमचे चरण निवांत राहिलें मन।
कासया त्यजीन प्राण आपुले गे माये॥
असेन धणीवरि आपुले माहेरीं।
मग तो श्रीहरि गीतीं गाईन गे माये॥
सकळही गोत माझें पंढरीसीं जाण।
बाप रखुमादेवीवरा विठ्ठलाची आण॥

---

## २. उपदेश.

### ५. प्राणी संसारांतच मरमरून जातात.

उपजोनि संसारीं आपुला आपण वैरी।
मी माझे शरीरीं घेऊनि ठेलें।
या देहातें म्हणे मी पुत्रदाराधन माझें।
परि काळाचें हें खाजें ऐसें नेणतु गेला॥
कामक्रोधमत्सराचेनि गुणें।
बांधला आपण नेणें भ्रमितु जैसा।
मिथ्या मोहफांसां शुक नळिके जैसा।
मुक्त परि आपैसा पळों नेणें॥
जळचर आमिषें गिळी जैसा कां लागलासे गळीं।
आप आपणापें तळमळी सुटिका नाहीं।
तैसें आरंभीं विषयसुख गोड वाटे इंद्रियां।
फळपाकीं पापिया दुःख भोगी॥

---

१ तृप्ति होई पर्यंत. २ राहिला. ३ खाऊ, भोज्य. ४ मांसाचा तुकडा.

राखोंडी फुंकितां दीप नलगे जयापरी ।
तैसा शब्दब्रह्म कुसरी ज्ञान न पवे ।
व्रत तप दानें वेंचिलें पोटा ।
दंभाच्या खटपटा सिणतु गेला ॥
मृगजळाची नदी दुरूनि देखोनि ।
धांवे परि गंगोदक न पवे तान्हेला जैसा ।
तैसें विषयसुख नव्हेचि हित ।
दुःख भोगितो बहुत परि सावधान नव्हे ॥
परतोनि न पाहे धांवतो सैरा ।
करितो येरझारा संसारींच्या ।
ज्ञानदेव म्हणे बहुता जन्मांचा अभ्यासु ।
तरीच होय सौरसु[1] परब्रह्मीं ॥

### ६. सुवस्तु सांडून कुवस्तूचें सेवन कां करावें ?

संसारयात्रा भरली थोर । अहंभावें चळे हाटबाजार[2] ।
काम क्रोध विवेक मद मत्सर । धर्म लोपे अधर्म वेव्हार ॥
यात्रा भरली जनीं । देवीं विन्मुख प्राणी ।
विषयांचा दाटणीं । भ्रांति आड रे ॥
एकीं मीपणाच्या मांडिल्या मोटा[3] । अहंभावाच्या गोणिया सांडिल्या चोहटीं[4] ।
एकीं गाढवावरी भरिली प्रतिष्ठा । तऱ्हि तृप्ति नव्हे दुर्भरा पोटा ॥
एक पंडितपण मिरविती श्रेष्ठ । एक ज्ञान विकून भरिती पोट ।
हिंसेलागीं वेद करिताती पाठ । चौऱ्यांशी जिवां भोंवतसे आटें[5] ॥
अज्ञानभ्रांतीचीं भरलीं पोतीं । सुवस्तु सांडूनि कुवस्तु घेती ।

---

१ गोडी. २ बाजार. ३ गांठोडीं. ४ चव्हाट्यावर. ५ त्रास, श्रम.

सुखाचेनि चाडें सुखाची प्रीति। अमृत सांडूनियां विष सेविती ॥
शांति क्षमा दया न धरवे चित्तीं। विषयावरी थोर वाढविली भक्ति।
जवळीं देवो आणि दाहीं दिशा धांवती। स्वधर्म सांडूनि परधर्मी रति
ऐसे जन विगुंतले ठाईं। आत्महिताची शुद्धीचि नाहीं।
नाशिवंत देह मानिला जिहीं। तयां तृप्ति जाली मृगजळडोहीं रया ॥
श्रीगुरुनिवृत्तीनें नवल केलें। देखणेंचि अदेखणें करूनि दाविलें।
मीमाजीं देवो यानें विश्व व्यापिलें। बाप रखुमादेवीवरें विठ्ठलें रया ॥

## ७. मनास साक्ष ठेवून भक्ति कर.

शरीर वरिवरि कां दंडिसी जंव वोरिलें[1] न करी तुझें मन।
जळीं नेत्र लाऊनि टौकिती[2] आंविसा[3]लागोनि तैसें नको नको बकध्यान करूं रया ॥
चित्त सुचित करीं मन सुचित करीं न धरीं तूं विषयाची सोय।
वनीं असोनि वनिता चिंतिसी तरि तपचि वाउगें जाय रया ॥
त्रिकाळ स्नान करिसी तीर्थजळीं परि नवजती मनींचे मळ।
तुझियानि दोषें तीर्थ कश्मित जालें जैशी त्या रजकाची[4] शीळ रया ॥
आतां करिसी तरि चोखटाचि करीं त्यासि साक्ष तुझें तुज मन।
लटिकेंन झकविसी[5] तऱ्ही देवदुऱ्हा होसी बाप रखुमादेवीवरा विठ्ठलाची आण ॥

## ८. देवाचें ध्यान करणें हेंच सुखप्राप्तीचें साधन.

श्रवण घ्राण रसना त्वचा आणि लोचन हें तों दैन्याचीं द्वारें।
वोळंगसी[6] यांचें यांसींचि न पुरे तुज पुरविती काये।
यालागीं धरिजेसु आपुली सोयं[7] रे बापा।

---

१ दूर, परतें. २ आशाळभूतपणानें पाहणें. ३ आमिष. ४ परीट. ५ फसवणें. ६ आश्रय करणें. ७ मार्ग.

अरे मना रे अरे मना रे न संडी हरिचरणकमळा रे ॥ ध्रु०॥
स्वप्नींचें धन तें धन नव्हे । मृगजळींचें जळ तें जळचि नव्हे ।
अभ्रींची छाया ते साउली नव्हे ।
ऐसें जाणोनियां वेगीं धरिजेसु आपुली सोय रे रया ॥
तूं जयाचा तेथोनि जिवें जितासी । त्या श्रीहरीतें रे नोळखिसी ।
बाप रखुमादेवीवरा विठ्ठला चिंतिसी ।
तेणें पावसी तूं सुखाचिया राशी रया ॥

९. मन अनिवार असल्यानें गुरूस शरण जाण्याची आवश्यकता.

अरे मना तूं पापिष्ठा । किती हिंडसी रे तूं नष्टा ।
सैरा शिणसी रे फुकटा । विठ्ठलीं विनटा[1] स्थिर होईं ॥
तूं अनिवार नावरसी । तुझेनि संगें नाडले ऋषी ।
तूं तंव अपभ्रंशीं पाडिशी । म्हणोनि गेले गुरुसी शरण ॥
न सोडी हरिचरण । नाहीं नाहीं जन्ममरण ।
अविटा[2] सेवी नारायण । तेणें मीतूंपण एकसिद्ध ॥
ज्ञानदेव शरण हरी । मन हिंडे चराचरीं ।
न सोडी चरण अभ्यंतरीं । नित्य श्रीहरी हृदयीं वसो ॥

---

## ३. गुरूची आवश्यकता.

### १०. गुरूवांचून अनुभव कसा प्राप्त होईल ?

योगयागविधि येणें नव्हे सिद्धि । वायांचि उपाधि दंभ धर्म ॥
भावेंवीण देव न कळे निःसंदेह । गुरुवीण अनुभव कैसा कळे ॥

१ सुशोभित, चांगला. २ वीटरहित, कंटाळारहित.

तपेंवीण दैवत दिधल्यावीण प्राप्त । गुजें[1]वीण हित कोण सांगे ॥
ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात[3] । साधूचे संगतीं तरणोपाय ॥

## ११. " आहे तें वर्म वेगळेंचि. "

कां सांडिसी गृहाश्रम । कां सांडिसी क्रियाकर्म ।
कासया सांडिसी कुळींचे धर्म । आहे तें वर्म वेगळेंचि ॥
भस्म उधळण[4] जटाभारु । अथवा उदासी दिगंबरु[5] ।
न धरी लोकांचा आधारु । आहे तो विचारु वेगळाचि ॥
जप तप अनुष्ठान । क्रियाकर्म यज्ञदान ।
कासया इंद्रियां बंधन । आहे तें निधान वेगळेंचि ॥
वेदशास्त्र जाणितलें । आगमीं[6] पूर्ण ज्ञान जालें ।
पुराणमात्र धांडोळिलें । आहे तें राहिलें वेगळेंचि ॥
शब्दब्रह्में[7] होसी आगळा । म्हणसी न भियें कळिकाळा ।
बोधेंवीण सुखसोहळा । आहे तो जिह्वाळा वेगळाचि ॥
याकारणें श्रीगुरुनाथु । जंव मस्तकीं न ठेवीं हातु ।
निवृत्तिदास असे विनवितु । तंव निवांतु कैंवि होय ॥

## १२. गुरु हा संतकुळींचा राजा आहे.

गुरु हा संतकुळींचा राजा । गुरु हा प्राणविसांवा माझा ।
गुरुवीण देव दुजा । पाहतां नाहीं त्रैलोकीं ॥
गुरु हा सुखाचा सागरु । गुरु हा प्रेमाचा आगरु ।
गुरु हा धैर्याचा डोंगरु । कदाकाळीं डळमळीना ॥
गुरु हा वैराग्याचें मूळ । गुरु हा परब्रह्म केवळ ।
गुरु हा सोडवी तात्काळ । गांठ लिंगदेहाची ॥

---

१ गुह्य. २ अनुभव. ३ गोष्ट. ४ भस्म लावणें. ५ नग्न. ६ शास्त्र. ७ वेद.

गुरु हा साधकासी साह्य। गुरु हा भक्तालागीं माय।
गुरु हा कामधेनु गाय। भक्ताघरीं दुभतसे॥
गुरु हा घाली ज्ञानांजन। गुरु हा दाखवी निजधन।
गुरु हा सौभाग्य देऊन। साधुबोध नांदवी॥
गुरु हा भक्तीचें मंडण। गुरु हा दुष्टांचें दंडण।
गुरु हा पापाचें खंडण। नानापरी वारितसे॥
कायाकाशी गुरुउपदेशी। तार[1]कमंत्र दिला आम्हांसी।
बाप रखुमादेवीवरासी। ध्यान मानसीं लागलें॥

## १३. मदालसेचा पुत्रास गुरूपदेश.

श्रीगुरु देवराया प्रणिपातु जो माझा।
मनादि मूळ तूंचि विश्वव्यापका बीजा।
समाधी येई पुत्रा स्वानंदाचिया भोजा[2]।
पालखीं पहुडे[3]लिया नाशिवंत रे माया॥
जागरे पुत्रराया जाई श्रीगुरु शरण।
देह तूं व्यापिलासी चुकवीं जन्ममरण।
गर्भवासु वोखटा[4] रे तेथें दुःख दारुण।
सावध होईं कां रे गुरुपुत्र तूं सुजाण[5]॥
मदालसा म्हणे पुत्रा ऐक बोलणें माझें।
चौऱ्यांशीं घरांमाजीं मन व्याकुळ तुझें।
बहुत शिणतोसी पाहतां या विषयासी।
जाण हें स्वप्नरूप येथें नाहीं बा दुजें॥
सांडिरे सांडि बाळा सांडि संसारछंदु।
माशिया मोहळ रे रचियेला रे कंदु।

---

१ तारणारा. २ उपभोग, अनुभव. ३ निजणें. ४ वाईट. ५ शहाणा.

झाडूनि आणिकीं नेला तयां फुकटाचि वेधु ।
तैसी परी होईल तुज उपदेशें आनंदु ॥
सत्व हे रजतम तुज लाविती चाळा ।
काम क्रोध मद मत्सर तुज गोंविती खेळा ।
या सर्वं झणें जासी सुकुमार रे बाळा ।
अपभ्रंशीं घालितील मुकशील सर्वस्वाला ॥
कोसलियांनें[2] घर सुदृढ पैं केलें ।
निर्गमु[3] न विचारितां तेणें सुख मानिलें ।
जालें रे तुज तैसें यातायाती भोगविलें ।
मोक्षद्वार चुकलासि दृढ कर्म जोडिलें ॥
सर्पें पैं दर्दुर[4] धरियेला रे मुखीं ।
तेणेंहि रे माशी धरियेली पक्षीं ।
तैसा नव्हे ज्ञानयोगु आप आपणांतें भक्षी ।
इंद्रियां घाली पाणी संसारीं होई रे सखी ॥
पक्षिया पक्षिणी रे निरंजनीं ये वनीं ।
पिलिया कारणें रे गेलीं चाराया दोन्हीं ।
मोहोजाळें गुंतलीं रे प्राण दिधले टाकुनि ।
संसार दुर्घट हा विचारु पाहे परतुनी ॥
जाणत्या उपदेशु नेणें तो भ्रांति पडिला ।
तैसा नव्हे ज्ञानप्रकाशु ज्ञानदेवो अनुवादला ।
अनुभवी गुरुपुत्र तोचि स्वयें बुझाला[5] ।
ऐकें त्या उद्धरणा गायक सहज उद्धरला ॥

---

१ चुकून. २ कोळी. ३ बाहेर येण्याचें द्वार. ४ बेडुक. ५ समजला.

## ४. नामाचें महत्त्व.

### १४. विठोबा, नाम तुझें सार.

सार सार सार विठोबा नाम तुझें सार।
म्हणोनि शूळपाणि[1] जपताहे वारंवार ॥
आदि मध्यअंतीं निजबीज ओंकार।
ध्रुवप्रल्हादअंबऋषीं मानिला निर्धार ॥
भुक्ति मुक्ति सुखदायक साचार।
पतीत अज्ञान जीव तरले अपार ॥
दिवसेंदिवस व्यर्थ जात संसार।
बाप रखुमादेवीवरा विठ्ठलाचा आधार ॥

### १५. नाम हें गगनाहून वाड आहे.

नित्य नेम नामीं ते प्राणी दुर्लभ। लक्ष्मीवल्लभ तयांजवळी ॥
नारायण हरि नारायण हरि। भुक्ति मुक्ति चारी घरीं त्यांच्या ॥
हरिवीण जन्म तो नर्कची पैं जाणा। यमाचा पाहुणा प्राणी होय॥
ज्ञानदेव पुसे निवृत्तीसी चाड[2]। गगनाहूनि वाड[3] नाम आहे ॥

### १६. भगवंतांमध्यें जाणीव नेणीव कांहीं नसून केवळ नामोच्चारानेंच मोक्ष मिळतो.

जाणीव[4] नेणीव[5] भगवंतीं नाहीं। उच्चारणीं पाही मोक्ष सदा ॥
नारायण हरि उच्चार नामाचा। तेथें कळिकाळाचा रीघ[6] नाहीं ॥

---

१ शंकर. २ इच्छा. ३ मोठें. ४ ज्ञान. ५ अज्ञान. ६ प्रवेश.

तेथील प्रमाण नेणवे वेदांसी। तें जीवजंतूंसी केंवि कळे ॥
ज्ञानदेवा फळ नारायण पाठ। सर्वत्र वैकुंठ[1] केलें असे ॥

## १७. संपत्ति आटे, नाम नाटे.

अंडज जारज[2] स्वेदज उद्भिज[3]। आटे, हरिनाम नाटे[4] तें बरवें ॥
जें नाटे तें नाम चित्तीं। रखुमादेवीपति श्रीविठ्ठलाचें ॥
शरीर आटे संपत्ति आटे। हरिनाम न आटे तें बरवें ॥
बापरखुमादेवीवराचें नाम नाटे। युगें गेलीं परि उभा विटे ॥

## १८. नामस्मरणानें अनेक संतांचा उध्दार झाला आहे.

नाम प्रल्हाद उच्चारी। तया सोडवी नरहरी।
उचलूनि घेतला कडियेवरी। भक्त सुखें निवाला ॥
नाम बरवयां[5] बरवंट[6]। नाम पवित्र चोखट।
नाम स्मरे नीलकंठ। निजसुखें निवाला ॥
जें धुरूसी[7] आठवलें। तेंचि उपमन्यें घोकिलें।
तेंचि गजेंद्रा लाधलें। हित जालें तयाचें ॥
नाम स्मरे अजामेळ। महापातकी चांडाळ।
नामें जाला सोज्वळ। आपण्यासहित निवाला ॥
वाटपाडा[8] कोळिकु। नाम स्मरे वाल्मीकु।
नामें उद्धरिले तिन्ही लोकु। आपण्यासहित निवाला ॥
ऐसें अनंत अपार। नामें तरले चराचर।
नाम पवित्र आणि परिकर[9]। रखुमादेवीवराचें ॥

---

१ देव, परमात्मा. २ जरायुज. ३ वृक्षादिक. ४ आटत नाहीं. ५–६ उत्तमांत उत्तम. ७ ध्रुव. ८ वाटमाऱ्या. ९ समर्थ, बलवान्.

१९. जन्मजन्मांतरींची पुण्यसामुग्री असेल तरच हरिनाम वाचेस येईल.

जन्मजन्मांतरीं । असेल पुण्यसामुग्री ।
तरिच नाम जिव्हाग्रीं । येईल श्रीरामाचें ॥
धन्य कुळ तयाचें । रामनाम हेंचि वाचे ।
दोष जातील जन्माचे । श्रीराम म्हणतांचि ॥
कोटि कुळांचें उद्धरण । मुखीं नाम नारायण ।
रामकृष्ण स्मरण । धन्य जन्म तयाचें ॥
नाम तारक सांगडी[1] । नाम न विसंबों अर्धघडी ।
तप केलें असेल कोडी । तरिच नाम येईल ॥
ज्ञानदेवीं अभ्यास मोठा । नामस्मरण मुखावाटां ।
कुळ गेलें वैकुंठा । हरि हरि स्मरत ॥

२०. पापराशि, भूतबाधा, सर्व नामस्मरणानें लय पावतील.

हरिउच्चारणीं अनंत पापराशी । जातील लयासी क्षणमात्रें ॥
तृण[2] अग्निमेळें समरस झालें । तैसें नामें केलें जपतां हरि ॥
हरि उच्चारण मंत्र हा अगाध । पळे भूतबाध भेणें[3] तेथें ॥
ज्ञानदेव म्हणे हरि माझा समर्थ । न करवे अर्थ उपनिषदां ॥

२१. रामकृष्णनामाचीच माळा गळ्यांत घाला.

कर्माचिया रेखा[4] नुल्लंघती अशेखा । म्हणोनि विशेखा[5] केशवसेवा ॥
रामकृष्ण माळा घाला रे पां गळां । अखंड जीवनकळा राम जपा ॥
करावा विचार धरावा आचार । करावा परिकर[6] रामनामीं ॥

१ भोंपळ्याची सांगड. २ गवत. ३ भीतीनें. ४ मर्यादा. ५ विशेष महत्त्वाची. ६ निश्चय.

सकळांचा सकळीं त्यातें तूं आकळीं। जिव्हा हे वाचाळीं रामरतीं॥
रिघें रे शरण तुज नाहीं मरण। ठाकिसी चरण श्रीविठ्ठलाचे॥
निवृत्तिप्रसादें जोडे विठ्ठलनामें घडे। ज्ञानदेव बागडे पंढरीये॥

## २२. प्राणास उलट मार्ग लावून अजपाजप करा.

सात पांच तीन दशकांचा मेळा। एकतत्त्वीं कळा दावी हरी॥
तैसें नव्हे नाम सर्वमार्गां वरिष्ठ। येथें कांहीं कष्ट न लगती॥
अजेपा[2] जपणें उलट प्राणाचा। तेथेंही मनाचा निर्धारु असे॥
ज्ञानदेवा जिणें नामेंविण व्यर्थ। रामकृष्णीं पंथ क्रमियेला॥

## २३. केवळ हरिजपानेंच प्रपंचाचें धरणें सुटेल.

भावेंवीण भक्ति भक्तीवीण मुक्ति। बळेंवीण शक्ति बोलूं नये॥
कैसेंनि दैवत प्रसन्न त्वरित। उगा राहे निवांत शिणसी वायां॥
सायास करिसी प्रपंच दिननिशीं। हरिसी न भजसी कोण्या गुणें॥
ज्ञानदेव म्हणे हरिजप करणें। तुटेल धरणें प्रपंचाचें॥

## २४. नामाकडे जिव्हा दिली असतां भाग्यास सीमाच नाहीं.

काळ वेळ नाम उच्चारितां नाहीं। दोन्ही[3] पक्ष पाहीं उद्धरती॥
रामकृष्णनाम सर्वदोषहरण। जडजीवां तारण हरि एक॥
हरिनाम सार जिव्हा या नामाची। उपमा त्या दैवाची कोण वानी॥
ज्ञानदेवा सांग झाला नामपाठ। पूर्वजां वैकुंठमार्ग सोपा॥

---

१ नाचणें. २ जप न करतां झालेला जप. ३ आईकडील व बापाकडील.

२५. नामामृतगोडी मिळाल्यास जीवनकळा प्राप्त होईल.

संतांचे संगती मनोमार्गे गति। आकळावा श्रीपति येणें पंथें ॥
रामकृष्ण वाचा भाव हा जीवाचा। आत्मा जो शिवाचा राम जप॥
एकतत्त्वनाम साधिती साधन। द्वैताचें बंधन न बाधिजे ॥
नामामृतगोडी वैष्णवां लाधली। योगियां साधली जीवनकळा[1] ॥
सत्वर उच्चार प्रल्हादीं बिंबला। उद्धवा लाधला कृष्णदाता॥
ज्ञानदेव म्हणे नाम हें सुलभ। सर्वत्र दुर्लभ विरळा जाणे ॥

२६. हरिपाठ हीच समाधि, व हरिपाठ हीच संजीवनी.

सर्वसुखगोडी सर्वशास्त्र निवडी। रिकामा अर्धघडी राहूं नको ॥
लटिका व्यवहार सर्व हा संसार। वायां येरझार हरिवीण ॥
नाममंत्र जप कोटी जाईल पाप। कृष्णनामीं संकल्प धरुनी राहे ॥
निजवृत्ति काढी सर्वमाया तोडी। इंद्रियां सवडी लपों नको॥
तीर्थव्रतीं भाव धरी रे करुणा। शांतिदया पाहुणा हरि करी ॥
ज्ञानदेवा प्रमाण[2] निवृत्तिदेवीं ज्ञान। समाधि संजीवन हरिपाठ ॥

२७. सगद्गद वाचेनें नामस्मरण केलें असतां हरीस करुणा येईल.

एकतत्त्व नाम दृढ धरी मना। हरिसी करुणा येईल तुझी ॥
तें नाम सोपारें रामकृष्णगोविंद। वाचेसी सद्गद[3] जपे आधीं ॥
नामापरतें तत्त्व नाहींरे अन्यथा। वायां आणिका पंथा जासी झणी ॥
ज्ञानदेव मौन जपमाळ अंतरीं। धरोनि श्रीहरी जपे सदां ॥

२८. नवनीताप्रमाणें निवडून देवाचें स्मरण केल्यास हरि हा घनदाट भरलेला दिसेल.

चहूं वेदीं जाण साही शास्त्रीं कारण। अठराही पुराणें हरिसी गाती॥
मंथुनि नवनीत। तैसें घे अनंता। वायां व्यर्थ कथा सांडी मार्गु ॥

---

१ सतरावी कळा. २ आधारानें, पाठीमागें. ३ सद्गदित होऊन.

एक हरि आत्मा जीवशीवसमा[1] । वायां तूं दुर्गमा न घाली मन ॥
ज्ञानदेवा पाठ हरि हा वैकुंठ । भरला घनदाट[2] हरि दिसे ॥

२९. रामकृष्णटाहो फोडिला असतां वैकुंठभुवनांत घर होईल.

जप तप कर्म क्रिया नेम धर्म । सर्वांघटीं राम भावशुद्ध ॥
न सोडी रे भावो टाकी रे संदेहो । रामकृष्णीं टाहो[3] नित्य फोडी ॥
जात वित्त गोत कुळ शीळ मात । भजे कां त्वरित भावनायुक्त ॥
ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनीं । तेणें वैकुंठभुवनीं घर केलें ॥

---

## ५. संतांची योग्यता.

३०. साधूंची भानुबिंबाप्रमाणें अलिप्तता.

शर्करेची गोडी निवडावया भले । साधु निवडिले सत्संगती ॥
सत्संगें प्रमाण जाणावया हरी । येर ते निर्धारीं प्रपंचजात ॥
भानुबिंब पहा निर्मळ निराळें[4] । अलिप्त सकळ तैसे साधु ॥
ज्ञानदेव हरि जपोनि निर्मळ । सदां असे सोज्वळ निवृत्तिसंगें ॥

३१. संतांच्या अगाध देण्यापुढें चिंतामणि ठेंगणा वाटतो.

संत भेटती आजि मज । तेणें जालों चतुर्भुज ।
दोनी भुजा स्थूळीं सहज । दोनी सूक्ष्मीं वाढल्या ॥
आलिंगनें सुख वाटे । प्रेमें चिदानंद गोठे[5] ।

---

१ ऐक्य. २ पूर्ण. ३ हांक मारणें, ओरडणें. ४ आकाशाप्रमाणें. ५ दाटतो.

हर्षें ब्रह्मांड उतटे । समूळ उठे मीपण ॥
या संतांसि भेटतां । हरे संसाराची व्यथा ।
पुढतीं पुढतीं माथां । अखंडित ठेवीन ॥
या संतांचें देणें । कल्पतरूहूनि दुणें[२] ।
परिसापरिसें[३] अगाध देणें । चिंतामणि ठेंगणा ॥
या संतांपरिस उदार । त्रिभुवनीं नाहीं थोर ।
मायबाप सहोदर । इष्टमित्र सोयरे ॥
कृपाकटाक्षें न्याहाळिलें । आपुल्या पदीं बैसविलें ।
बाप रखुमादेवीवरें विठ्ठलें । भक्तां दिधलें वरदान ॥

३२. व्यासांच्या खुणेनें ज्ञानदेव सांगतात कीं भक्तांचे घरीं देव आहे.

देवाचिये द्वारीं उभा क्षणभरीं । तेणें मुक्ति चारी साधियेल्या ॥
हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ॥
असोनि संसारीं जिव्हे वेगु करी । वेदशास्त्र उभारी बाह्या[४] सदा ॥
ज्ञानदेव म्हणे व्यासाचिये खुणें[५] । द्वारकेचे राणे पांडवां घरीं ॥

३३. आज संतांच्या भेटीमुळें मनांत परमानंदाचा उदय झाला आहे.

पूर्वजन्मीं सुकृतें थोर केलीं । तीं मज आजि फळासि आलीं ॥
परमानंदु आजि मानसीं । भेटी जाली या संतांसी ॥
मायबाप बंधु सखे सोयरे । यांतें भेटावया मन न धरे ॥
एक एका तीर्थाहुनि आगळें । तयामाजीं परब्रह्म सांवळें ॥
निर्धनासि धनलाभ जाला । जैसा अचेतनीं प्राण प्रगटला ॥

१ भरून वाहणें. २ दुप्पट. ३ पेक्षां. ४ हात. ५ खुणेनें.

वत्स विघडेलियां[१] धेनु भेटली। जैसी कुरंगिणी[२] पाडसा[३] मीनली॥
तैं पीयूषापरतें[४] गोड वाटत। पंढरीरायाचे भक्त भेटत॥
बाप रखुमादेवीवर विठ्ठलें। संत भेटतां भवदुःख फिटलें॥

### ३४. हरि भक्तांच्या धांव्यास पावतो.

त्रिवेणिसंगमीं नाना तीर्थें भ्रमी। चित्त नाहीं नामीं तरि तें व्यर्थ॥
नामासी विन्मुख तो नर पापिया। हरिवीण धांवया[५] नपवे कोणी॥
पुराणप्रसिद्ध बोलिले वाल्मीक। नाम तिन्ही लोक उद्धरती॥
ज्ञानदेव म्हणे नाम जपा हरीचें। परंपरा त्याचें कुळ शुद्ध॥

### ३५. "राजयाची कांता काय भीक मागे?"

श्रीगुरुसारिखा असतां पाठिराखा। इतरांचा लेखा[६] कोण करी॥
राजयाची कांता काय भीक मागे। मनाचिया जोगें सिद्धि पावे॥
कल्पतरुतळवटीं जो कोणी बैसला। काय वाणी[७] त्याला सांगिजो जी॥
ज्ञानदेव म्हणे तरलों तरलों। आतां उद्धरलों गुरुकृपें॥

### ३६. ध्वजेचें चिरगुट जतन करण्यास राजास कष्ट पडतात काय?

पाहें पां ध्वजेचें चिरगुट[८]। राया जतन करितां कष्ट॥
तैसा मी एक पतित। परि तुझा मुद्रांकित॥
मषीपत्र[९] तें केवढें। रावो चालवी आपुल्या पाडें॥
बाप रखुमादेवीवरदा। सांभाळी आपुल्या ब्रीदा॥

---

१ वियोग झालेल्यास. २ हरिणी. ३ हरणाचें पोर. ४ अमृत. ५ धांव्यास. ६ गणना, किंमत. ७ तोटा. ८ वस्त्र. ९ दौत, व लेखणी.

## ६. ज्ञानदेवांचे वैराग्ययुक्त बोल.

### ३७. जवळ असून देवाची भेट नाहीं.

परिमळाची धांव भ्रमर ओढी। तैसी तुझी गोडी लागो मज ॥
आविट गे माय विटेना। जवळी आहे परि भेटेना ॥
तृषा लागलीया जीवनातें वोढी। तैसी तुझी गोडी लागो या जीवा ॥
बापरखुमादेवीवरा विठ्ठलीं आवडी।गोडियेसी गोडी मिळोन गेली॥

### ३८. उघडया पाठीवर हींव वाजत असल्यनें देव मला केव्हां घोंगडें देईल ?

रात्रींदिवस वाहातसे चिंता। केधवां धडौता होईन मी ॥
खिरजटे घोंगडें फाटकें तें कैसें। वेंचिलें तैसें भोगिजे गा।
वित्त नाहीं गांठीं जीवित्वा आटी। उघडी पाठी हींव वाजे ॥
घोंगडें देईल तो एक दाता। बापरखुमादेवीवरा मागों रे आतां॥

### ३९. मी दूरदेशीं पडलें असल्यानें देवाची भेट मला केव्हां होईल ?

पडिलें दूरदेशीं मज आठवे मानसीं।
नको नको हा वियोग कष्ट होताती जिवासी ॥
दिनु तैसी रजनी मज जाली गे माये।
अवस्था लावुनि गेला अझुनी कां न ये ॥
गरुडवाहना गंभीरा येईंगा दातारा।
बाप रखुमादेवीवरा श्रीविठ्ठला ॥

---

१ पाणी. २ सवस्त्र. ३ झिजविलेलें. ४ श्रम. ५ थंडी.

### ४०. चंदनाच्या चोळीनें माझें सर्वांग पोळत आहे.

घनु वाजे घुणघुणा वारा वाजे रुणझुणा ।
भवतारकु हा कान्हा[1] वेगीं भेटावा कां ॥
चांदें[2] वो चांदणें चौंपे[3] वो चंदन ।
देवकीनंदनेंवीण नावडे वो ॥
चंदनाची चोळी माझें सर्व अंग पोळी ।
कान्हो वनमाळीं वेगीं भेटावा कां ॥
सुमनाची सेज सीतळ वो निकी ।
पोळे[4] आगीसारिखी वेगीं विझवा कां ॥
तुम्हीं गातसां सुस्वरें ऐकों नेदावीं उत्तरें ।
कोकिळें वर्जावें तुम्हीं बाईयांनो ॥
दर्पणीं पाहतां रूप न दिसे वो आपुलें ।
बाप रखुमादेवीवर विठ्ठलें मज ऐसें केलें ॥

### ४१. ज्ञानदेवास जिणें जड होतें.

तुजपासाव जन्मलों हरि पुढतीं सामावलों तुझ्या उदरीं।
तुझिया व्यापकपणें चाले सत्कर्माची दोरी ।
सायखेडियाचें[5] बाहुलें कैसें हावभाव धरी ।
सूर्यकांतवेधें अग्निच प्रसवे सहज समंधु ऐसा धरी रया ॥
जेथें पाहे तेथें तूंचि दिससी लपोनियां अबोला कासया धरिसी ।
रसना रस सेवावे हे तों जीवआत्मयाची स्थिति ।
श्रवणीं ऐकणें कीं नेत्रीं देखणें हे तों तुझीच नादश्रुति ।
घ्राणासि परिमळ घेणें कीं हस्तपादादिकां चळगति ।

---

१ कृष्ण. २ चंद्र. ३ चांफा. ४ भाजणें. ५ कळसूत्री.

हे तों तुझींच पांचैं तत्त्वें तरि तूं मज कां भोगावितोसि यातायाती
रया॥

लाजेसी ना देवा माझें म्हणतां संन्याशासवें कैंची रे कांता ।
इंद्रियें दारुण जीवआत्मयासी हे तों सुखदुःखप्राप्ति ।
तेणें हें कारण कीं आत्मा पावे यातायाती ।
इंद्रियें दंडून तप जें करावें ऐसें बोलती वेदश्रुति ।
साही जणांसी वेवाद लाविला हे तो तुझीच करणी सांगती रया॥
मिथ्या हा प्रपंच कीं दर्पणाचें दुजे जवळीं बिंब प्रकाशे ।
एक साचें दुजें दिसे तैसेंचि दुसरें कां प्रतिभासे ।
लटिकें म्हणों जाय तंव तेथें मन कां विश्वासे ।
सगुण निर्गुण हे तों तुझीच माया तुझी तुजमाजीं दिसे रया ॥
पुरे पुरे आतां जड जालें जिणें उरी नाहीं देवा लाजिरवाणें ।
ऐसीं इंद्रियें वासनेसी आणिजती ते तुझी तुजमाजीं सामावती।
समस्त जीव हे तों तुझे आकारले येरी ते लटिकीच भ्रांति ।
जाणसी तें करी देवा तेंचि तें मागों किती ।
दग्धबीज तरु बीजीं सामावला तैसा तुजमाजीं श्रीगुरु निवृत्ति रया॥

४२. बापा विठ्ठला, त्वां मजशीं अबोला कां धरिला ?

नभ नभाचेनि [3]सळे । क्षोभु वाहिजे काळिंदजिळें ।
[4]सासिनले जगाचे डोळे । तें रूप पाहावया ॥
भलतैसी हांव । मना न पुरे तेथींची थाव ।
लावण्यसिंधु सिंव[5]। सोडूनि जातो गे माये ॥
कटावरी ठेवुनी हात। जना दावी संकेत ।
भवजळाब्धीचा अंत । इतुलाची ॥

१ तंटा. २ मावणें. ३ उसळणें. ४ भरास येणें, उत्सुक होणें. ५ मर्यादा.

समचरणींच्या खुणा। उभा पंढरीचा राणा।
तो आवडे जना मनां। दुर्लभ गे माये ॥
नेतिनेतीचेनि विरारें। उभऊनियां श्रीकरा करें।
शृंगाराचेनि पैंडिभरें। चराचरें ॥
मेखळेचा मध्यमणी। उदो गेला ग्रहगणीं।
मध्यनायकु तरणी किरणीं। विराजितु गे माये ॥
आमुची हृदयींची श्रीमूर्ति। घेऊनि विठ्ठलवेषाची बुंथी।
आतां चाळविसी किती। बापा पालट नेघे ॥
बाप रखुमादेवीवरा विठ्ठला। त्वां मजशीं अबोला कां धरिला।
जंव जीव आहे उरला। तों निघों पाहे ॥

---

## ७. निवृत्तिप्रसाद.

### ४३. निवृत्तिनाथगुरूनें माझें अंधत्व नाहींसें केलें.

अंध पंगु दृढ[1] जालों माया पडळ[3] भ्रांति।
कर चरण विव्हळ गेले तंव भेटले निवृत्ति।
ज्ञान मज उपदेशिलें नेलें अज्ञान क्षिती।
वृक्ष एक तेथें होता त्या तळीं बैसविलें रीती ॥
धर्म जागो[4] निवृत्तीचा हरिनामें उत्सावो।
कर्म धर्म लोपले माझे फिटला संदेहो।

---

१ अतिशय. २ खोल. ३ पडदा. ४ उदय पावो, भरभराटीस येवो.

धर्म अर्थ काम पूर्ण दान मान संदेहो।
नेघे मी इंद्रियवृत्ति रामकृष्णनामीं ढाहो॥
कल्पना मावळली कल्पवृक्षाचे तळवटीं।
चिंता हे हारपली माझी नित्य अमृताची वाटी।
मन हें निमग्न जालें नित्य वसे वैकुंठीं।
तापत्रय ताप गेले नाना दोषांचे थाटीं[1]॥
आत्माराम निर्गमलें[2] वेदशास्त्र गुह्यज्ञानें।
वासनाचि मोहोजाळीं ते विराली नाना स्थानें।
फुटले नाना घट तुटलीं नाना बंधनें।
सुटल्या जीवग्रंथि ऐसें केलें त्या गुरुज्ञानें॥
बुद्धिबोध संवगडे[3] सजीव करचरण।
नयनीं नयन जाले चक्षु मी समाधान।
दिव्यदेह अमृतकळा दशदिशा परिघन।
सर्व हें ब्रह्म जालें फळद फळलें विज्ञान॥
निवृत्तिगुरु माझा अंधपणा फेडिलों।
सर्वत्र दृष्टि जाली एकतत्त्वें राहिलों।
निरसली[4] माया मोहो श्रीराम अंजन लेईलों[5]।
ज्ञानदेव ज्ञानगंगे निवृत्तीनें बुडविलों॥

४४. ज्ञानदेव ह्मणतात कीं निवृत्तीनें संपूर्ण वर्म माझें हातीं दिलें.

तीर्थ व्रत नेम भावेंविण सिध्दी। वायांचि उपाधी करिसी जना॥
भावबळें आकळे येऱ्हवीं नाकळे। करतळीं आंवळे[6] तैसा हरी॥

---

१ समुदाय. २ प्राप्त होणें. ३ मिथुन. ४ नाहींशी होणें. ५ घालणें. ६ आंवळा, एक प्रकारचें फळ.

पारियाचा रवा घेता भूमिवरी । यत्न परोपरीं साधन तैसें ॥
ज्ञानदेव म्हणे निवृत्ति निर्गुण । दिधलें संपूर्ण माझ्या हातीं ॥

---

## ८. प्रातिभश्रावणादर्श.

४५. रक्त, शुभ्र, नील, पीत अर्थ समजून तुम्हीं मौन्य धरा.

सहस्रदळ ब्रह्मरंध्र ज्याचें घर । सत्रावी निरंतर वसे जेथें ॥
रक्त शुभ्रवर्ण निळा पीत दिसे । दृष्टि शुद्ध असे तयामध्यें ॥
फार किती सांगों सज्ञान तुम्हीं जन । अर्थ हा समजोन मौन्य धरा ॥
गुह्याचेंही गुह्य निवृत्तीनें दाविलें । मीच याचां हो बोलें बोलतसे ॥

४६. नाना वर्णांचा अखंड तमाशा.

अखंड तमासा डोळां देख निका । काळा निळा पारवा बाईयांनो ॥
सदोदित नयनीं नयन हारपे । निळयाचें स्वरूपें मनीं वसो ॥
अकरा वेगळें नाहीं बा आणीक । माझे नेत्रीं देख शुद्ध ज्योती ॥
ज्ञानोबाची वाणी पूर्णरूपीं घ्यावी । देहींच पाहावी आत्मज्योती ॥

४७. "बरवें रूप काळें अमोलिक."

मन मुरडोनि डोळां लेईलें । काळेपणें मिरविलें रूप त्याचें ॥
बरवें रूप काळें अमोलिक । म्हणोनियां सांगतसे शुद्धभावें ॥
रखुमादेवीवरु अगाध काळें । म्हणोनि सर्वत्र अर्पियलें ॥

---

१ पारा. २ जीवनकळा, अमृतकळा. ३ तमाशा, चमत्कार. ४ मागें वळणें. ५ घालणें.

### ४८. "काळा दादुला मज पाचारी गे माये."

सुखाचा निधि सुखसागर जोडला।
म्हणोनि काळा दादुला[1] मज पाचारी[2] गे माये॥
प्रेम नव्हाळी[3] मज झाली दिवाळी।
काळे वनमाळी आले घरा गे माये॥
बाप रखुमादेवीवर पुरोनि उरला।
सबाह्यजू[4] भरला माझे हृदयीं गे माये॥

### ४९. काळ्या जगजेठीचें दर्शन.

आठवितां न पुरे मोवितां[5] न मोववे।
सांगतां न सांगवे गुण त्याचे॥
परतली दृष्टि काळा देखिला जगजेठी।
वेणीभागीं[6] पृष्ठीं कैसा दिसतु असे॥
त्या गुणाच्या संगें कैसें अद्वैत जालें।
मन म्हणौनि काळेपण बहु झालें गे माये॥
पुरे पुरे बुद्धि निमाली वेदवाणी।
आतां केविं वर्णूं चक्रपाणी बहु काळें गे माये॥
द्वादश मंडळें वोवाळुनी आलिये।
तंव तंव काळें देखिलें रूपडें त्याचें॥
अनुमाना नये अनुमाना नये।
परतल्या श्रुती चोजवेना[7]॥
बुडी दिधली दाही हारपलीं।

---

१ नवरा. २ बोलावणें. ३ नवाई, कोमलपणा. ४ आंतबाहेर. ५ मोजणें. ६ डोक्यावर. ७ समजणें.

चोवीस मावलीं अगाधपंथीं ॥
प्रीतीचें पांघरूण काळें घोंगडें ।
रखुमादेवीवरें विठ्ठलें मज केलें उघडें ॥

## ५०. कृष्णवर्ण आत्मरूपाचें दर्शन.

काळा पुरुष तो हा गगनांत जो नांदे । अनुभवाच्या भेदें भेदला जो॥
भेदून अभेद अभेदून भेद । सच्चिदानंद जेथ नाहीं ॥
ज्ञानदेव म्हणे तेथें अक्षय राहिला। आत्मा म्यां पाहिला या दृष्टीसी॥

## ५१. माझ्या दृष्टीनें सांवळ्या रूपाचा आश्रय केला आहे.

काळा लपंडाई[1] काळे रात्रीं खेळे ।
मी स्वैसवें[2] वेधली जाय काळया छंदें ॥
काळें निळें हें अभ्र भासलें ।
ऐसें रूप देखिलें निर्गुणाचें ॥
ऐसा हा सांवळा माझिये दृष्टी मोल्हाथिला[3] ।
उजरूनि[4] गेला हा विठ्ठलु गे माये ॥
ऐसें भुलविलें जाण काळेपणें आपणें ।
रखुमादेवीवरु जाणे येर कांहीं नेणे ॥

## ५२. नीळरूपाचें वर्णन.

निळें हें व्योम निळें हें सप्रेम । निळेपणें सम आकारलें ॥
नीळवर्ण ब्रह्म नीळवर्ण कर्म । नीळवर्ण आश्रम गुरु देखे ॥
नीळपण वर्त्तों[5] नीळपणें खातों । निळेपण पाहातों निळेपणें ॥
ज्ञानदेव आला नीळवर्ण शाळा । निळेपण गोंवळा[6] रातलीये[7] ॥

---

१ लपंडाव. २ आपोआप, आपणच. ३ आश्रय पावणें. ४ चकाकणें. ५ राहणें. ६ कृष्ण. ७ रमणें.

## ५३. नीळवर्णानें आकाश खाऊन टाकिलें.

नीळवर्णरजें नीळवर्ण बुझे । नीळिमा सहजें आकारली ॥
नीळप्रभा दिसे नीळपणें वसे । नीळिये आकाश हारपलें ॥
निळेपण ठेलें निळिये गोंविलें । निळेपण सौंविळें आम्हां जालें ॥
ज्ञानदेव निळा परब्रह्मीं गोंविला । कृष्णमूर्ति सांवळा हृदयीं वसे ॥

## ५४. ज्ञानदेवांनीं सांगितलेली अनुभवाची खूण.

कैसें बोटानें दाखवूं तुला । घेईं अनुभव गुरुच्या मुला ॥ ध्रु० ॥
ज्या ठायीं चळे ना ढळे[२] । आकळितां कोणा नाकळे[१] ।
विश्व तयाचे सत्तेनें चाले । कैसें बोटानें दाखवूं तुला ॥
मागें पुढें सर्व आसतें । तुझ्या पायाखालीं तुडवितें ।
तुझ्या दृष्टीपुढें दिसतें गा । कैसें बोटानें दाखवूं तुला ॥
ही खुण त्वां ओळखुनि घ्यावी । गुरुपुत्राला जाउनी पुसावी ।
ही खुण सांगितली ज्ञानदेवें । कैसें बोटानें दाखवूं तुला ॥

## ५५. पाहणें पाहतांच अनुभवियांस बोलणें पारुषतें.

पाहाणेंचि पाहासी काय पाहाणें तेथें नाहीं ।
पाहाणेंचि पाहीं पाहाणें रया ॥
खुंटलें बोलणें बोलीं बोला ।
बोलुचि मौन्यें ठेलों मौन्यामाजीं ॥
बाप रखुमादेवीवरा विठ्ठलाचिये खुणें ।
अनुभविया बोलणें पारुषलें[३] ॥

१ समजणें. २ हलणें. ३ खुंटणें.

### ५६. अमोलिक रत्नाची जोड.

अमोलिक रत्न जोडलें रे तुज। कां रे ब्रह्मबीज नोळखसी ॥
न बुडे न कळे न भिये चोरा। ते वस्तु चतुरा सेविजेसु[1] ॥
ज्ञानदेवो म्हणे अविनाश जोडलें। आणुनि ठेविलें गुरुमुखीं ॥

### ५७. सुढाळ ढाळाचें अष्टपैलू मोतीं.

सुढाळ[2] ढाळाचें[3] मोतीं। अष्टे अंगे लवे ज्योती।
जया होय प्राप्ति। तोचि लाभे ॥
हातींचें निधान जाय। मग तूं करिसी काय।
पोळलियावरि हाय। निवऊं पाहे ॥
अमृतें भोजन घडे। कांजियानें चूळ[4] जोडे।
मग तये चरफडे। मिती[5] नाहीं ॥
अंगा आला नाहीं घावो। तंव ठाकी येक ठावो।
बाप रखुमादेवीवर। विठ्ठलु नाहो[6] ॥

### ५८. लक्ष मोलानें मोत्यांच्या लेण्याची प्राप्ति.

सुखसोज्वळ मोतियाचें लेणें। दिधलें जाँईजणें[7] बाईये वो ॥
देशीं नाहीं देशा उरी नाहीं। हाटणीं[8] नाहीं तें पाटणीं[9] नाहीं ॥
लक्षाचेनि लाभें जोडलें निधान। बाप रखुमादेवीवरा श्रीविठ्ठलु जाण ॥

### ५९. ज्यानें शून्य शोधिलें नाहीं त्याचें जिणें केवळ पशूचें होय.

शून्य शोधिलें नाहीं जेणें। काय विवरण केलें तेणें।
अज्ञानपणें फुगणें। गाढव जिणें पशूचें ॥

---

१ सेवन कर. २ सतेज. ३ स्वरूप, आकार. ४ भरणें. ५ गणना. ६ नवरा. ७ जाणारें. ८ बाजार. ९ शहर.

वर्णाकृति शून्याचार । हा नाहीं ज्या विचार ।
न घडे न घडे साक्षात्कार । जाण सर्वथा तया नरा ॥
आधीं शून्याची शोधणी केली । मग सद्वस्तु प्राप्ति झाली ।
अमृतवेळाची बोली । बोलतां नये ॥
आधीं शून्य तें शुभ्रवर्ण । मध्यें श्वेत रचिलें जाण ।
अर्ध्यें[1] शून्य तें ताम्रवर्ण । प्रत्यक्ष जाण दिसतसे ॥
महाशून्याचा वर्ण निळा । अव्यक्त तेजाचा ओतिला गोळा।
ग्रासुनी ठेला भूगोळा । योगी डोळां पाहती ॥
ऐसें शून्याचें नाहीं ज्ञान । तंववरी अवघेंच अज्ञान ।
जनीं अवघा जनार्दन । अज्ञान सज्ञान काय बोलूं ॥
ब्रह्मज्ञानाची किल्ली । सांगितली एकाचि बोली ।
निवृत्तिराजें बोलविली बोली । तेचि बोलीं बोलिलों ॥

६०. शून्याच्या भुवनांत अविनाशस्वरूपाचें दर्शन.

शून्याचे भुवनीं स्वरूप अविनाश । प्रणवी[2] पुरुष दिसतसे ॥
निळा रंग देखे सर्वांचे देखणीं । चैतन्यभुवनीं समरस ॥
ज्ञानदेवा ध्यान सच्चिदानंदाचें । सर्व ब्रह्म साचें येणें येथें ॥

६१. शून्य निरशून्य दोन्ही गेल्यावर निजवस्तूची प्राप्ति.

चहूं शून्या औरुतें[3] महाशून्या परुतें[4] । सर्वांसी पहातें तेंचि तें गा ॥
दिसे तेंही शून्य पहा तेंचि शून्य । देहामाजी निरंतर भिन्न रूप ॥
शून्य निरशून्य[5] दोन्ही हारपलीं । तेथूनि पाहिली निजवस्तु ॥
ध्येय ध्यान ध्याता निरसूनि तीन्ही । झालों निरंजनीं आतिलीन ॥
ज्ञानदेव म्हणे अनुभवी तो जाणे । गुरुमुखें खूण सांगितली ॥

१ शेवटचें. २ ओंकार. ३ अलीकडचें. ४ पलीकडचें. ५ शून्याचा अभाव.

### ६२. "डोळांचि पहा डोळां."

डोळांची पहा डोळां शून्याचा शेवट। निळाबिंदु नीट लखलखीत ॥
विसावों आलें पातलें चैतन्य तेथें। पाहे पां निरुतें[१] अनुभवें ॥
पार्वतीलागीं आदिनाथें दाविलें। ज्ञानदेवा फावलें[२] निवृत्तिकृपा ॥

### ६३. "ज्ञानदेवा नयन निवृत्तीनें दाविला."

स्वरूपाचें ध्यानीं निरंजन पाहिलें। डोळयानें दाविलें चराचर ॥
आतां माझे नयन नयनीं रिघों पाहे। नयना नयनीं राहे नयनाचि ॥
ज्ञानदेवा नयन निवृत्तीनें दाविला। सर्वांठायीं झाला डोळां एक॥

### ६४. ज्योतीपलीकडील ज्योतिचें दर्शन.

डोळियांत डोळा काळियांत काळा। देखण्या निराळा निळारूप॥
ब्रह्मतत्त्व जाणें ज्योतिरूपें सगळा। ज्योतीही वेगळा ज्योती वसे ॥
ज्ञानदेव म्हणे देवा ऐसी ज्योती। अर्धमात्रा उत्पत्ति सर्वा जीवां॥

### ६५. "माझ्या शरीरीं ज्योतिर्लिंग उगवलें."

अगाधपण माझे अंगीं बाणलें। वरपेंडें देखिलें मृत्तिकालिंग ॥
त्यासी चैतन्य नाहीं गुण नाहीं। चळण नाहीं गुण रूप नाहीं ॥
माझ्या शरीरीं ज्योतिर्लिंग उगवलें। अगाध कवळिलें[३] हस्तेंवीण ॥
बाप रखुमादेविवरु ज्योतिर्लिंग विश्वनाथ। तेणें माझा मनोरथ
पुरविला गे माये ॥

---

१ चांगलें, खरोखर. २ स्वाधीन झालेलें. ३ कवटाळणें.

### ६६. त्रिभुवन व्यापणाऱ्या लिंगाचा साक्षात्कार.

स्वर्ग जयाची साळोखा । समुद्रपाळी पिंड देखा ।
शेषासारिखी बैसका । जो आंधार तिही लोकां ॥
लिंग देखिलें देखिलें । त्रिभुवनीं तिहीं लोकीं विस्तारलें ॥
मेघधारीं तपन केलें । तारापुष्पीं वरि पूजिलें ।
चंद्रफळ ज्या वाहिलें । वोवाळिलें रविदीपें ॥
आत्मनैवेद्य समर्पिलें । ब्रह्मानंदीं मग वंदिलें ।
ज्योतिर्लिंग मग ध्याइलें । ज्ञानदेवीं हृदयीं ॥

### ६७. शीत उष्ण प्रभा हेंच निराकाराचें आकारणें.

महावाक्यार्थ तें कैसें बापा । सत्वर नयनीं पहा आत्मप्रभा ॥
प्रभा शीत उष्ण दोहींचेंही सार । प्रणव हा सारासार आरुता रया॥
ज्ञानदेव म्हणे सोपानातें ऐसें । निराकार असे आकारेसीं ॥

### ६८. सहस्रदळरंध्रांमधील तेज काइसयासारिखें ह्मणून सांगावें ?

सहस्रदळ बिंदु त्यांत तेज दिसे । तें हो काय ऐसें सांगा मज ॥
जेथ नाम रूप वर्ण नाहीं बा रे । तें हें रूप बारे चैतन्य बा ॥
ज्ञानदेव म्हणे अनुभवाची खूण । जाणे तो सुजाण अनुभविया ॥

### ६९. चंद्रसूर्याहून आगळ्या तेजाचा साक्षात्कार.

उन्मनीसंयोगें गोसावी विराजे । चहूं देहाचें ओझें निवारूनि ॥
सोऽहमस्मिचे छंदें परिपूर्ण । विज्ञान हे खूण जेथें नाहीं ॥

---

१ शाळुंका. २ वलय. ३ बैठक. ४ अलीकडचा. ५ शहाणा.

चंद्रसूर्याहुनी तेज तें आगळें। अव्यक्तें व्यापिलें अनुभवें ॥
अनुभवाची खूण गुरुगम्य जाणती। ज्ञानदेवें विनंति हेचि केली ॥

७०. प्रकाशास दिनमणि उणा वाटतो.

धांवत धांवत आलों नयनांजनीं। प्रकाशा दिनमणी उणा वाटे ॥
निशि दिवस दोनी नाहीं जेथ बारे। अर्धमात्रेवरी लक्ष ठेवीं ॥
अक्षय अक्षर क्षराविरहित साजे। ज्ञानाचें जें ओझें चालेचि ना ॥
ज्ञानदेव चक्षु झाला परेवरी। यापरती बरोबरी नाहीं बापा ॥

७१ चंद्रावांचून चांदणें व सूर्यावांचून तेज.

चंचळ चांदिणें सोमेंविण भासलें। तेज निमालें रविबिंबेविणें ॥
जगत्रैजीवनु म्हणे जगासि कारण। तें अणुप्रमाण तेथें दिसे ॥
बापरखुमादेवीवरु अणुप्रमाण भासला। सगुण निर्गुण जाला बाईये वो ॥

७२. रात्रीस सूर्याचा व दिवसास चंद्राचा प्रकाश.

निशियेचे भरीं भानु प्रतिबिंबीं बिंबला।
बिंबचि गिळुनी ठेला बिंबामाजीं ॥
रात्रि सूर्य वोहे दिनु चंद्र जाये।
विपरीत गे माये देखियेलें ॥
उदय ना अस्तु तेथें कैंचेनि त्रिगुण।
आपणचि दर्पण होऊनि ठेला ॥
ज्ञानदेव म्हणे अनुभवी तोचि जाणे।
संत तये खुणें संतोषले ॥

१ सूर्य. २ चौथी अवस्था. ३ चंद्रावांचून. ४ स्वर्ग, मृत्यु, पाताळ या तिन्ही लोकांचें जीवन. ५ मार्ग आक्रमणें.

### ७३ अनुपम्य तेजानें ब्रह्मांड धवळून जातें.

अनुपम्य तेजें धवळलें ब्रह्मांड । विश्वरूपीं अखंड तदाकार ॥
रसीं रस मुरे प्रेमाचें स्फुंदन । एकरूपीं घन[1] हरि माझा ॥
नाद आणि ज्योति परिपूर्ण आत्मा । परेसि महात्मा उजेडला ॥
झाला अरुणोदयो उजळलें सूर्यतेज । त्याहूनि सतेज तेज आलें ॥
हारपल्या रश्मि देहभाव हरि । सिद्धि बुद्धि कामारी[2] जाल्या कैशा ॥
निवृत्तिउपदेश ज्ञानियां लाधला । तत्त्वीं तत्त्व बोलला ज्ञानदेव ॥

### ७४. अनाहतनादानें योगी आपल्या ध्येयास जातो.

नासिकेचा प्राण कोणे मार्गीं येत । नाद दुमदुमित अनुहातीं ॥
ईडे[3] पिंगळेचा[4] ओघ सैरा दिसे । त्यावरी प्रकाशे आत्मतेज ॥
ज्ञानदेव म्हणे अष्टांगयोगिया । साधितो उपाया याचि मार्गें ॥

### ७५. साधु आपलें अंतकाळचें लक्षण कसें ओळखतो ?

कानीं घालूनियां बोटें नाद जे पहावे । न दिसतां जाणावें नऊ दिवस ॥
भोंवया पहातां न दिसे जाणा । आयुष्याची गणना सात दिवस ॥
डोळां घालोनियां बोट चक्र जें पहावें। न दिसतां जाणावें पांच दिवस
नासाग्राचें अग्र न दिसे नयनीं । तरि तेचि दिनीं म्हणा रामकृष्ण ॥
ज्ञानदेव म्हणे हें साधुचें लक्षण । अंतकाळीं आपण पहा वेगीं ॥

---

१ दाट, पूर्ण भरलेला. २ दासी. ३–४ डावी व उजवी नाडी.

## ९. स्वरूपसाक्षात्कार.

७६. निवृत्तिनाथांनीं नीच नवा विठ्ठल माझ्या देहीं दाखविला.

रूप सामावलें दर्शन ठांकलें[1] । अंग हारपलें तोंचि भावीं ॥
पाहों जाय तंव पाहाणया वेगळें। ते सुखसोहळे कोण बोले ॥
जेथ जाय तेथें मौनाचि पडिलें । बोलवेना पुढें काय करूं ॥
सरिता ना संगम ओघ ना भ्रम । नाहीं क्रियाकर्म तैसें झालें ॥
जाणों जाय तंव जाणणया सारिखें। नवल विस्मय देखे कवणा सांगों
बाप रखुमादेवीवरु विठ्ठलुची अंगीं । निवृत्तिरायें वेगीं दाखविला ॥
आदिअंतीं तोचि सबरां[2]भरितु । रूपनामरहितु नीच[3]नवा ॥

७७. देवाच्या देवास मी अनंतवेषानें अनंतरूपानें पाहिलें.

योगियां दुर्लभ तो म्यां देखिला साजणी[4] ।
पाहतां पाहतां मना न पुरे धणी ॥
देखिला देखिला माये देवाचा देवो ।
फिटला संदेहो निमालें दुजेंपण ।
अनंतवेषें अनंतरूपें देखिलें म्यां त्यासी ॥
रखुमादेवीवरीं खूण बाणली कैसी ॥

७८. आज आत्मारामास देखिल्यानें दिन सोनियाचा झाला आहे.

आजि देखिलें रे । आजि देखिलें रे ॥
सबाह्य अभ्यंतरीं । अवघा व्यापकु मुरारी ॥

---

१ राहिलें. २ संपूर्ण भरलेला. ३ नित्य नवीन. ४ गडे.

दृढ विटे मन मुळीं । विराजित वनमाळी ॥
आजि सोनियाचा दिनु । वरि अमृतातें वरुषे घंनु[1] ॥
बरवा संतसमागमु । प्रगटला आत्मारामु ॥
बाप रखुमादेविवरु । कृपासिंधु करुणाकरु ॥

## ७९. "मुकियाचे परी आनंदु भीतरीं."

जाणों गेलें तंव जाणणें राहिलें ।
पाहों गेलिये तंव तेंचि जालें गे माये ॥
इंद्रियांसहित चित्त ठेंकलेंचि[2] ठेलें ।
मी माझें विसरलें स्वयें भाव ॥
ऐकोनि देखोनि मन होये आंधळें ।
परतोनि मावळे नाहीं तेथें ॥
अविद्या निरसली माया तुटली ।
त्रिगुण साउली तेथें रूप कैंचें ॥
चांग[3] विचारिलें विवेकें उगवलें ।
ज्ञान हारपलें तयामाजीं ॥
मुकियाचे परी आनंदु भीतरीं ।
अमृत जिव्हारीं गोड लागे ॥
बाप रखुमादेवीवरु विठ्ठलु जागे ।
संत ये खुणे संतोषले ॥

## ८०. आनंदमयस्वरूपाचें सर्वत्र दर्शन.

गुंजगुंजित रूप सांवळें सगुण । अनुभवितां मन वेडें होय ॥
भ्रमरगुंफा ब्रह्मरंध्र तें सुरेख । पहातां कौतुक त्रैलोकीं ॥

---

१ ढग. २ विस्मित होणें. ३ चांगलें.

आनंद स्वरूप प्रसिद्ध देखिलें । निजरूप संचलें सर्वां ठायीं ॥
ज्ञानदेव म्हणे या सुखाची गोडी। अनुभवाची आवडी सेवीं रया॥

८१. विठ्ठलांमध्यें मुरून राहण्याचा आनंद संतजनांच्या माहितीचाच आहे.

दुधावरिली साय निवडूनि दिधली। तैसी परी जाली आम्हां तुम्हां॥
घालों मी ब्रह्में उद्धारसंभ्रमें । अनुदिनीं प्रेमें डुल्लतसें ॥
नाठवे आशा देहावरि उदास । मीतूंपण भास चोंजवेना[3] ॥
रखुमादेवीवरा विठ्ठलीं मुरोनि राहिला ।तो आनंदु देखिला संतजनीं ॥

८२. साधुबोधानें कापुराच्या ज्योतीप्रमाणें साधक आपल्यांतच मुरून जातो.

साधुबोध झाला तो नुरोनियां ठेला। ठायींच मुराला अनुभव ॥
कापुराची वाती उजळली ज्योती । ठायींच समाप्ति झाली जैसी॥
मोक्षरेखे आला भाग्यें विनटला[4] । साधूंचा अंकिला हरिभक्त ॥
ज्ञानदेवा गोडी संगति सज्जनीं । हरि दिसे जनीं वनीं आत्मतत्त्वीं॥

८३. जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति या अवस्थांचा विसर.

माझे जीवींची आवडी । पंढरपुरा नेइन गुढी[5] ॥
पांडुरंगीं मन रंगलें । गोविंदाचे गुणीं वेधलें ॥
जागृति स्वप्न सुषुप्ति नाठवे । पाहतां रूप आनंदीं आनंद सांठवे ॥
बाप रखुमादेवीवर सगुण निर्गुण । रूपें विटेवरी दाविली खूण ॥

१ भरलें. २ तृप्त होणें. ३ आवडत नाहीं, विचारांत येत नाहीं. ४ शोभला. ५ पताका.

८४. जाग्रत्, स्वप्न, सुषुप्तींत उन्मनींतल्याप्रमाणेंच साक्षात्कार.

जागृति पुसे साजणी । कवण बोलिलें अंगणीं ।
निरखितां वो नयनीं । वृंदावनीं देखियेला ॥
मनिं वेधु तयाचा । पंढरिरायाचा ॥ ध्रु. ॥
स्वप्न सांगे सुषुप्ति । असे ममता हे चित्तीं ।
विठ्ठल होईल प्रतीति । मग गर्जती तुर्ये ॥
मज बोलों नये ऐसें केलें । मन उन्मनीं बोधलें ।
बाप रखुमादेवीवर विठ्ठलें । थितें[2] नेलें मी माझें ॥

८५. निरंजनवेषांत अर्धनारीपुरुषाचें दर्शन.

औटपीठावरी निरंजन देश । तेथ मी जगदीश असें बाई ॥
त्रिकुटाचा फेरा टाकिला माघारा । अर्धमात्रेवरावरी गेलों ॥
अर्धनारीपुरुष एकरूप दिसे । सर्वत्रीं संचलें शून्य एक ॥

८६. जेथें नारीपुरुष एकरूपानें दिसतात तेथें देखणें पारुषतें.

निशीदिवस दोघे लोपले ते ठायीं । निरंजन ते ठायीं लक्षुनी पहा ॥
रविशशि ज्याचे तेजें प्रकाशले । नवल म्यां देखिलें एक तेथें ॥
नारीपुरुष दोघे एकरूपें दिसती । देखणें पारुखे[3] तया ठायीं ॥
ज्ञानदेव म्हणे शिव तेचि शक्ति । पाहातां व्यक्तीं व्यक्त नाहीं ॥

८७. ज्ञानदेवांस विश्वरूपाचें दर्शन.

विश्वरूप पाहे तंव सभोंवतें रूपडें । पाहे चहूंकडे तेंचि दिसे ॥
काय करूं सये[4] कैसा हा देव । माझा मज भाव एकतत्त्वीं ॥

---

१ गडे. २ स्थिर असलेलें. ३ खुंटणें, नाहींसें होणें. ४ गडे.

सम तेज पाहे तंव एकचि वो तेज। ओंकार सहज निमाला तेथें॥
मूळचि मूळखूण न सांपडे सर्वथा। व्यांपिलें गे चित्ता तेजें येणें॥
स्वानुभव ते दिवटी उजळूनि जंव पाहें। तंव एक बिंब[1] दाहे दिशा दिसे॥
ज्ञानदेव निवृत्ति हे खूण पुसत। सांगावें त्वरित गुरुराजें॥

## ८८. रूप पहात असतां पात्यास पातें सुद्धां लागत नाहीं.

तुझी गुणकीर्ति ऐकोनि आर्तें मन उचललें।
आलिंगना धाविन्नलें उतावीळ॥
तनु मनु विगुंतलें मन वाचा गुंतलें।
मी माझें विसरलें दर्शन गे माये॥
उतावळेपणें भुजा दंड उचलले।
नेणोनि ठकले ठेले रूप पाहतांचि बाईये॥
पातिया पातें नलगे पाहाणें तेंचि ठेलें।
तैसें बाप रखुमादेवीवरविठ्ठलें केलें गे माये॥

## ८९. पाहतां पाहतां तन्मयावस्था.

चैतन्य चोरुनी नेलें चित्त माझें सर्व गेलें।
पाहे तंव तंव तन्मय जालें गे माये॥
देवें नवल केलें मन माझें मोहिलें।
विसरूं तो आठवूं जाला गे माये॥
यासि जाणावयालागीं अनुउतें पाहे।
तंव त्रिभुवन तन्मय जालें गे माये॥

---

१ रूप. २ उत्कट इच्छा. ३ तटस्थ.

बाप रखुमादेवीवरें विठ्ठलरायें ।
माझें सबाह्याभ्यांतर व्यापिलें गे माये ॥

### ९०. देवाच्या दर्शनानें दृष्टीचा नाश.

पावलों जी म्हणे देखिलें देखणें । गेली आधीं तेणें दृष्टि माझी ॥
उचललिया बाह्या क्षेम देईन तया । गेली माझी माया देहत्यागें ॥
आनंदें स्फुंदत येती अश्रुपात । अगा गुरुनाथ देवराया ॥
निवृत्तिदास म्हणे तूतें जीवें वोवाळिलें । शिर निरोपिलें तुझ्या चरणीं ॥

### ९१. रूपाचा दर्पण पहात असतां द्रष्टाही नाहींसा होतो.

स्वरूपाचेनि भानें बिंब हें ग्रासिलें ।
परि खूण न बोलें काय करूं ।
रूपाचा दर्पण रूपेंविण पाहिला ।
द्रष्टाही निमाला नवल कायि ॥
जिकडे जाये तिकडे दर्शन सांगाती ।
उदो ना अस्तु हे नाहीं द्वैतास्थिती ॥ ध्रु. ॥
पूर्वबिंब शून्य हे शब्दाचि निमाले ।
अनाम्याचेनि भलें होतें सुखें ।
त्यासि रूप नांव ठाव संकल्पें आणिला ।
अरूपाच्या बोला नाम ठेला ॥
बाप रखुमादेवीवरु विठ्ठलुचि एक ।
भोगी समसुख ऐक्यपणें ।
अदृश्य अंबुलो जागतां निविजे ।
परि सेजेंस्वभावीं दुजें नाहीं रया ॥

---

१ नवरा. २ शय्या.

९२. ज्याच्या भेटीस गेलें तोच मी होऊन ठेलें.

भेटिसी गेलीये तंव तैंचि जालीये ।
भुलली ठेलीये मज न कळे कांहीं ॥
परतलिया दृष्टी जंव मागुता न्याहाळीं ।
तंव काळी ना सांवळी मूर्ति चोजवेना ॥
काय सांगों माये न कळे तयाची [१]सोये ।
येणें मनाचे मोडुनि पाये वेधियेलें ॥
आंतु बाहेरीं कैसी भरलें [२]निरंगें ।
क्षेम देऊं गेलें अंगें तंव तो जडूनि ठेला ॥
वारितां नावरे काये सांगों माय गोठी ।
करूनि ठेला [३]सौठी जीवित्वेंसीं ॥
आशेचिये हांवे तंव तो परताचि धांवे ।
निराशेसि पावे वेळु न लागतां ॥
बाप रखुमादेवीवरु विठ्ठलीं उपावो ।
ज्ञानदेवा भावो निवृत्तिपायीं ॥

९३. सर्वेश्वराच्या स्वरूपाचा निर्धार कोणास करितां येईल ?

मलयानिळ शीतळु [४]पोंलवी नये गाळूं ।
सुमनाचा परिमळु गुंफितां नये ॥
तैसा जाणा सर्वेश्वरु म्हणों नये सान थोरु ।
याच्या स्वरूपाचा निर्धारु कवण जाणे ॥
मोतियाचें पाणी भरूं नये वो रांजणीं ।
गगनासी [५]गैवसणी घालितां नये ॥

---

१ मार्ग. २ रंगरहित. ३ अदलाबदल. ४ पदर. ५ खोळ.

डोळियांतील बाहुली करूं नये वेगळी ।
धांवोनि अचंळीं[1] धरितां नये ॥
विठ्ठलरखुमाईचे भांडणीं कोण करी बुझावणी[2] ।
तया विठ्ठलचरणीं ज्ञानदेवो ॥

९४. प्रपंच पाहणें आतां पुरें; स्वरूपाच्या आनंदांत राहणें हेंच श्रेष्ठ होय.

अधिक देखणें तरी निरंजन पाहणें ।
योगराज विनवणें मना आलें वो माये ॥
देह बळी देउनी साधिलें म्यां साधनीं ।
यानें समाधान मज जोडलें वो माये ॥
अनंगपण फिटलें मायाछंदा सांठवलें ।
सकळ देखिलें आत्मस्वरूप वो माये ॥
चंदन जेवीं भरला अश्वत्थ फुलला ।
तैसा म्यां देखिला निराकार वो माये ॥
पुरे पुरे आतां प्रपंच पाहणें ।
निजानंदीं राहणें स्वरूपीं वो माये ॥
ऐसा ज्ञानसागरु रखुमादेवीवरु ।
विठ्ठलु निर्धारु म्यां देखिला वो माये ॥

९५. आंत विठ्ठल, बाहेर विठ्ठल, मीच विठ्ठल असें मला वाटत आहे.

मजमाजीं पाहतां मीपण हारपलें । ठकलेंचि ठेलें सये मन माझें ॥
आंत विठ्ठलु बाहेर विठ्ठलु । मीचि विठ्ठलु मज भासतसे ॥
मीपण माझें नुरेचि कांहीं दुजें। ऐसें केलें निवृत्तिराजें म्हणे ज्ञानदेवो॥

---

१ अंचल, पदर. २ समजूत.

### ९६. देवा, तूं व मी आतां एकच घोंगडें पांघरूं.

तूं माझा स्वामी मी तुझा रंक[१] । पाहतां न दिसे वेगळीक ॥
मीतूंपण जाऊं दे दुरी । येकाचि घोंगडें पांघरों हरी ॥
रखुमादेवीवर विठ्ठलुराया । लागेन मी पायां वेळोवेळां ॥

### ९७. मीच प्रत्यक्ष निवृत्तिरूप बनलों.

निरंजनवना गेलिये साजणी । तेथें निर्गुणें माझा मनीं वेधियेलें ॥
सुखाची अतिप्रीति जाहली गे ब्रह्मीं । श्रीगुरु निवृत्तिमुनि मी जाहलों गे माये ॥
बापरखुमादेवीवरु विठ्ठलु सहजावला । निर्गुण दाविला विसुरा[२] गे माये ॥

### ९८. तत्वमसिचा साक्षात्कार.

तूं तो माझें मी तो तुझें । ऐक्य जालें तेथें कैंचें दुजें ॥
तूं तो मी गा मी तो तूं गा । अज्ञानें बापुडीं नेणती पैं गा ॥
निर्गुण होतें तें गुणासि आलें । अज्ञान निरसूनि एकचि जालें ॥
ज्ञानदेव म्हणे परतूनि पाहीं । जीवाचा जीवनु[३] कवणे ठायीं ॥

### ९९. निजब्रह्माचें चक्षुवीण पाहणें, व हातेंवीण स्पर्श करणें.

चातकेंविण लक्ष अंतरींच ठसलें । तेथें एक वोळलें[४] ब्रह्ममेघ ॥
तें जीवन अमृत जीवासि आलें । त्याहूनि एक आगळें गे माये ॥
रखुमादेवीवरु हातेंविण स्पर्शलें । चक्षुवीण देखियलें निजब्रह्म गे माये ॥

---

१ दीन. २ आश्चर्यरूप. ३ प्राण. ४ वळणें, प्राप्त होणें.

### १००. तें दिसतें पण हातीं धरवत नाहीं.

मन मुरे मग जें उरे । तें तूं कां रे सेवीसि ना ॥
दिसतें परी न धरवे हातें । तें संतांतें पुसावें ॥
तेथींची खूण विरळा जाणे । निवृत्तिप्रसादें ज्ञानदेवो म्हणे॥

### १०१. देहावांचून देवाचें आलिंगन.

कोठिची भरोवरी[१] सरोनि गेली शरीरीं ।
संसाराची उरी[२] कांहीं नुरेचि गे माये ॥
लक्षाचा लाभ मज घडला गे माये ।
कवणे उपायें चरण जोडिले वो ॥
चिंतनीं चिंतितां काय चिंतावें ।
तें अवघेंचि मनीं रूप गिळावें गे माये ॥
बाप रखुमादेवीवरु देहेंविण आलिंगिला ।
तो समर्थ मोल्हाथिला[३] बाईये वो ॥

### १०२. " तें रूप देखें परी बोलवेना. "

देऊनियां भेटी मजसी न करी गोठी ।
लांचावला जीऊ पाठीं न राहे वो ॥
निष्ठुर म्हणों तरी आपंगितो[४] मातें ।
व्यापूनि जिवातें उरी उरवितो ॥
तो दाखवा वो माये धरिन त्याचे पाये ।
तयालागीं जीऊ आहे उतावेळु ॥

---

१ सामुग्री. २ बाकी. ३ आश्रय करणें. ४ आपलासा म्हणणें, स्वीकार करणें.

भेटीचेनि सुखें मनचि होय मुकें ।
तें रूप देखें परी बोलवेना ॥
अगुणगुणाचा म्हणौनि घातली मिठी ।
तंव तो आपणया समसाठी करुनि ठेला ॥
काय नेणों कांमाण कैसें वो जालें ।
चित्त चोरुनी नेलें गोवळेनें ॥
बाप रखुमादेवीवर विठ्ठलें अंग लपवूनि ।
चैतन्य चोरूनि नेलें गे माये ॥

## १०३. "घडिये घडिये गुज बोल कां रे."

तुझीये निडळीं[2] कोटि चंद्र प्रकाशे । कमळनयन हास्यवदन हांसे॥
कृष्णा हाल कां रे कृष्णा डोल कां रे । घडिये घडिये गुज
बोल कां रे ॥
उभा राहोनियां कैसा हालवितो बाहो । बाप रखुमादेवीवरु
विठ्ठलु नाहो[3] ॥

## १०४. ज्यास आत्मज्ञान दृष्टीस दिसत नाहीं त्यासी गोष्टी करूं नये.

आत्मज्ञान जया न देखे निजदृष्टीं । तया नरा गोष्टी करूं नये ॥
तुर्यारूपें जाण प्रभा हे निःसीम । तया परता राम असे बापा ॥
ज्ञानदेवा गुज दाविलें गुरूनें । मनें अनन्यें काल्पितांचि ॥

---

१ कार्य. २ कपाळ. ३ नवरा.

## १०५. हा बोध मूर्खास सांगूं नये.

ऐका हा शेवट अभंगमाळा झाली । तुर्या हेच आली प्रत्यया गा ॥
तुर्या तेंचि उन्मनी क्षर तें अक्षर । निर्गुण साकार ऐसें देखा ॥
देह तें विदेह महाकारण ब्रह्म । हें निश्चयाचें वर्म ऐसें जाणा ॥
कनक तेंचि नगं समुद्र तरंगीं । देह हा सर्वांगीं ब्रह्म जाणा ॥
अभंगा शेवट जाणे निवृत्ति एक । त्याणें मज देख कृपा केली ॥
मूर्खासी हा बोध सांगों नये बापा। अभंगकृत्याचा लेश नसो हातीं ॥
ज्ञानदेव ह्मणे हें कृत्य हातां नये। माय देऊं नये कोणासही ॥

---

१ अनुभव. २ दागिना.

# सोपानदेव.

### १. हरीचें ध्यान करणारे नाना योनिरूप आपदा पावत नाहींत.

मनाचे मवाळ[1] हरिरूप चिंतिती । रामकृष्णमूर्ति नित्यकथा ॥
रामकृष्णध्यान सदा पैं सर्वदा । न पवेल आपदा[2] नाना योनी[3] ॥
हरिध्यान जप मुक्त पैं अनंत । जीव शिवीं रत सर्वकाळ ॥
सोपान प्रेमा आनंद हरीचा । तुटला मोहाचा मोहपाश ॥

### २. सर्व कांहीं सोंवळें आहे; अभक्तांचें मनच फक्त ओंवळें होय.

पृथ्वी सोंवळी आकाश सोंवळें । मन हें वोवळें अभक्तांचें ॥
ब्रह्म हें सोंवळें न देखों वोवळ । असों खेळेमेळें इये जनीं ॥
ब्रह्मांड पंढरी सोंवळी हे खरी । तरसी निर्धारीं एकया नामें ॥
सोपान अखंड सोंवळा प्रचंड । न बोलें वितंडें[4] हरिविण ॥

### ३. नाम हेंच परब्रह्म आहे.

आवडीचें मागे प्रवृत्तीचें नेघे । नाममार्गें वेळगे[5] निघे रया ॥
नाम परब्रह्म नाम परब्रह्म । नित्य रामनाम जपिजेसु ॥
अंतरींच्या सुखें बाहिरिलीया वेखें[6] । परब्रह्म सुखें जपतुसे ॥
सोपान निवांत रामनाम मुखांत । नेणे दुजी मात हरीविण ॥

---

१ मृदु. २ कष्ट, त्रास. ३ जन्म. ४ बडबड, वितंडा. ५ चाल, जा. ६ वेषानें.

### ४. आम्हीं तुझ्यामध्यें विरून सुखदुःख विसरतों.

सागरींचें तोय[1] जगा निवारीत। मागुतें भरत पूर्णपणें ॥
तैसें आम्हीं दास तुजमाजी उदास। तूं आमुचा निवास सर्व देवा॥
तुजमाजि विरों सुखदुःख विसरों। तुझ्या नामें तरों येचि जन्मीं ॥
सोपान निकट बोलोनि सरळ। तुष्टला गोपाळ अभय देत ॥

### ५. वैष्णवांनीं पंढरीस जाऊन गजर केल्याबरोबर विठ्ठल सामोरा येतो.

चलारे वैष्णवहो जाऊं पंढरीसी।
प्रेमामृतखूण मागों त्या विठ्ठलासी ॥
चालिलें गोपाळ वाताती[2] वांकुलिया।
भरले प्रेमरसें मग ते वाताती[3] टाळिया ॥
दिंड्या[4] गरुडटके[5] मृदंगाचे नाद।
गाताती विठ्ठलनाम करिताती आल्हाद ॥
पावले पंढरी भीमा देखियेली दृष्टि।
वैष्णवाचा गजरु आनंदें हेलावली[6] सृष्टि ॥
गजरु गोपाळांचा श्रवणिं पडियेला।
शंखचक्र करीं विठ्ठल सामोरा आला ॥
कांसवदृष्टी न्याहाळितु रंगीं नाचतु पैं उगलौ[7]।
सोपान म्हणे आम्हीं वाळुवंटीं केला काला ॥

---

१ पाणी. २ दाखवणें. ३ वाजवणें. ४ वीणा. ५ गरुडाचें चिन्ह असलेली ध्वजा. ६ डोलणें, हलणें. ७ निवांत.

# मुक्ताबाई.

## १. मुक्ताबाईचा अनुभव.

### १. मी अंध वायां जात असतां निवृत्तिराजानें मजला सावध केलें.

ऊर्णा[1]चियां गळां बांधिली दोरी । पाहों जाय घरीं तंव तंतु नाहीं॥
तैसें जालें बाई जंव एकतत्त्व नाहीं । दुजी जंव सोंई[2] तंव हें अंध॥
ऐसी मी हो अंध जात होतें वायां । प्रकृति सावैया[3] पावली तेथें॥
मुक्ताई सावध करी निवृत्तिराज । हरिप्रेमें उमंज[4] एकतत्त्वें ॥

### २. निवृत्तीच्या तटाकानें आम्हीं मूळच्या स्थानास जाऊन प्रपंचाशीं अबोला धरिला.

प्रारब्ध संचित आचरण गोमटें । निवृत्तितटाकें निघालों आम्ही ॥
मुळींचा पदार्थ मुळींच पैं गेला । परतोनि अबोला संसारासी ॥
सत्यमिथ्याभाव सत्वर फळला । हृदयीं सामावलों[5] हरिराज ॥
अव्यक्त आकार साकार हे स्फूर्ति । जिवेंशिवें प्राप्ति ऐसें केलें ॥
सकाम निष्काम वृत्तीचा निजफेर । वैकुंठाकार दाखविलें ॥
मुक्तलगें[6] मुक्त मुक्ताईचें तट । अवघेंचि वैकुंठ निघोटें[7] रया ॥

### ३. नामस्मरणामुळें देव निजानंदवैकुंठ उघडें करितों.

नाममंत्रें हरि निजदासां पावे । ऐकोनियां धांवे झडकरी ॥
सुदर्शन करीं पावे लवकरी । पांडवां साहाकारी[8] श्रीकृष्ण रया ॥

---

१ ऊर्णनाभि, कोळी. २ कृपा. ३ मदतीला. ४ समज. ५ भरणें, मावणें. ६ मुक्तीच्या जवळचें. ७ संपूर्ण. ८ साह्यकारी.

निजानंद दावी उघड पैं वैकुंठ। नामेंची प्रगट आम्हांलागीं ॥
मुक्ताई जीवन मुक्त हा संसार। हरि पारावार केला आम्हीं ॥

### ४. मुंगी आकाशांत उडून तिनें सूर्यास गिळिलें.

मुंगी उडाली आकाशीं। तिणें गिळिलें सूर्यासीं ॥
थोर नवलाव जाला। वांझे पुत्र प्रसवला ॥
विंचू पाताळासी जाय। शेष माथां वंदी पाय ॥
माशी व्याली घार झाली। देखोन मुक्ताई हांसली ॥

### ५. दिवसां चांदणें व रात्रीं उष्ण तेज तुम्हीं पाहिलें आहे काय ?

देउळाच्या कळशीं नांदे एक ऋषी। तया घातली पुशी योगेश्वरीं ॥
दिवसां चांदिणें रात्रीं पडे उष्ण। कैसेंनि कठिण तत्त्व जालें ॥
ऋषि म्हणे चांपे कळिकाळ पैं कापे। प्रकाश पिपे निघोन जाय ॥
ठायींच्या ठायीं असें पाहतां न दिसे। मनाच्या धारेसें एक होय ॥
एकट एकलें वायांचि पैं गुंफलें। मुक्त पैं वरिलें सहज असे ॥
वैकुंठ अविट असोनि प्रकट। वायांचि अडवाट मुक्ताई म्हणे ॥

### ६. चंदनानें वनस्पतीस वास लागतो त्याप्रमाणें हरिपाठानें तुम्हीं हरिरूपच व्हाल.

सहस्रदळीं हरि आत्मा हा कुसरी। नांदे देहाभीतरीं अलिप्त सदा ॥
रविबिंब बिंबे घटमठीं सदा। तें नातळे पैं कदा तैसा आम्हां ॥
अलिप्त श्रीहरी सेवी कां झडकरी। सेवितां झडकरी हरिच होआल ॥
चंदनाच्या हेतीं वेधल्या वनस्पती। तैसी आहे संगती या हरिपाठें ॥
मुक्ताई चिंतित चिंतामणि चित्तीं। इच्छिलें पावती भक्त सदा ॥

---

१ प्रश्न. २ प्रवाह. ३ चातुर्यानें. ४ सुवास.

# २. मुक्ताबाईचा चांगदेवास उपदेश.

## ७. मायेच्या पुराचें वर्णन.

उलट उलट माघारा प्राण्या फिर[1]गोते खाशी।
भरला पुर मायेचा लोंढा वाहुनियां जाशी॥
भवनदीचें पाणी सखया मोठें ओढितें।
भल्यांभल्यां पोहणारां उचलुन खालीं पाडीतें॥
क्षणभंगुर संसार याचा भरंवसा नाहीं।
दुर्लभ नरतनु गेल्या मग तूं पडशिल पस्तोई[2]॥
म्हणे मुक्ताबाई चांग्या अंतरिंची खूण।
धरि सद्गुरुचे पाय तुजला नेतिल उद्धरून॥

## ८. अहंकाररूप घोंगडें सांडून वटेश्वराचें ध्यान कर.

अहंकार अविद्या हेंचि पै घोंगडी। पांघुरतां गोडी नाहीं मज॥
घोंगडें नेलें नारायणा। अछिप होतो बोल कोणा॥
आशा तृष्णा दोघी बहिणी। लोळती धरणीं घोंगडीया॥
हिंसा निंदा चिंता या तिघीजणी। घोंगडीया आटणी[3] होतसे॥
घोंगडें माझें फाडलें पोरीं। कामक्रोध दोघीं सहोदरीं॥
मुक्ताई म्हणे घोंगडें सांडीं। वटेश्वरीं मांडीं ठाण[4] आतां॥

१ धक्का. २ पश्चाताप. ३ दाटणी. ४ ठिकाण.

## ९. बोलणें झाल्यास अबोलण्यानें बोल.

वेदश्रुति ठंक[1] पडियेली वाचा । तेथें कवणपाड तुझिया बोलाचा॥
कांहीं बोलसी तरी अबोलणें बोल। बोलणें बोलसी तरी तितुकें खोल
अनिर्वाच्य ब्रह्म न वर्णवे वाणी । बोलों म्हणती ते न लजती मनीं॥
बोलणें अबोलणें वटेश्वरीं गुज । मुक्ताई म्हणे चांगया बुझे[2] ॥

## १०. उन्मनीरुप निद्रेच वर्णन.

गुणातीत डाहाळीं[3] पाळणा लाविला । तेथें सुत पहुडला मुक्ताईचा॥
निजीं निज बाळा न करीं पैं आळी[4] । अनुहात टाळी वाजवितें ॥
निद्रा ना जागृति भोगी पैं उन्मनीं । लक्ष तें भेदूनि निज पाटीं ॥
निभ्रांत आतां पाळणा विणवुनी । मन हें बोधोनि पवनदोरा ॥
एकविससहस्र श्वास वेळोवेळां । बाळा तोही डोळा स्थिर करी॥
निद्रा ना जागृति निजसील काई । परियेसी[5] चांगया बोले मुक्ताई॥

## ११. अद्वैतानुभवांत निद्रा.

आपुलिया मारूनि येई कां भेटी । मग गोल्हाटीं सांठवीन ॥
शांति धाया[6] मेळवीन तुज । मग तूं बूझ[7] सोहंकारीं ॥
सोहं सोहं सोहं हाचि धरीं छंदु । सुखें निद्रा करीं अद्वैतीं रे॥
तेथें जाग पां जाग नीज पां नीज । मग तुज चेंवो[8] कैचा ॥
तेथें ओळखी नाहीं विसरु नाहीं। चिदानंदीं पाहीं रूप तुझें ॥
द्वैताद्वैत भासलें पाहीं । वटेश्वरसुता[9] बोले मुक्ताई ॥

## १२. नोवरीच्या पोटास नोवरा येतो.

नोवरीचे पोटीं नोवरा जन्मला । सोहळा जाला काय सांगों ॥
नोवऱ्यानें नोवरी देखिलीच नाहीं । सोहळा होतो सांगों काई ॥
तो नोवरा नातुंडे[10] कोणा । मुक्ताई चांगया सांगतसे खुणा ॥

---

१ भूल. २ समज. ३ फांदी. ४ छंद. ५ ऐक. ६ दाई. ७ समज. ८ जागृति. ९ चांगदेव. १० स्वाधीन न होणें.

# चांगदेव

## १. चांगदेवास मुक्ताईनें पोसणा घेतलें.

चांगा जन्मला मध्यान्हकाळीं । मायबापें दोन्हीं नाहींशीं झालीं ॥
मुळींच चांगा नाहींसा झाला । मुक्ताई म्हणे चांगया भलाभला ॥
वटेश्वर चांगा मुळीं लागला । पोसणा[१] घेतला मुक्ताईनें ॥

## २. चांगदेव सत्रावीचें दूध पितो.

सत्रावी दोहतां[२] कांहींच नाहीं । दोहन तें पाहीं ब्रह्मस्थानीं ॥
दोस्तनीं पान्हाइली[३] तिसरेनि दोहिली । दोहन ते उरली विश्वंभरा ॥
चांगा वटेश्वर विश्वंभर जाला । प्रेमें तो लाधला क्षीर देखा ॥

## ३. चांगदेवाचें शांतीशीं लग्न लागतांना मुक्ताई करवली हळद वांटते.

वऱ्हाडी आले संसारनगरा । चांगा नोवरा केळवला[४] ॥
हातीं कांकण उभा वटेश्वरीं । शांति हे नोवरी पर्णावया[५] ॥
पर्णिली शांति बैसली पाटीं । मुक्ताई करवली हळदुली वाटी ॥

## ४. कुडी ही नोवरी, आत्मा हा नोवरा.

कुडी हे नोवरी आत्मा हा नोवरा । दोघे पर्णू[६] जातीं निरंतरा ॥
पांचही प्राण सर्वही वऱ्हाडी । आशा तृष्णा दोन्ही देशधडी ॥
शांति निवृत्ति दोघी सुवासिनी । भक्ति करवली सखी बहिणी ॥
वटेश्वर चांगा वरधंवा[७] । तुम्हीं नेऊनि मध्यें बैसवा ॥

---

१ दत्तक, पोसण्याकरितां घेतलेला. २ दूध काढणें. ३ पान्हा फुटणें, दूध देणें. ४ केळवण झालेला. ५ लग्न लावणें, वरणें. ६ लग्न लावणें. ७ वर, नवरा.

५. जातो ममायं विशदः प्रकामं प्रत्यर्पितन्यास इवांतरात्मा.

आत्मा हा नोवरा कुडी हे नोवरी।
लिंबलोण करी वोहरांसी[1] ॥
सोहळा जाला नोवरा गांवा गेला।
वेगीं आइती करा नोवरी बोलावा ॥
न्हाणिली धुणिली गजस्कंधीं मिरविली।
बोळवीत गेलीं चौघे जणें ॥
ज्याची नोवरी त्या हातीं लाविली।
चांगा म्हणे आतां निश्चित झाली ॥

६. जळांतील सूर्याप्रमाणें देहांत परमात्म्याचा प्रकाश.

प्रकृतीचें पूजन प्रकृतीच्या ठायीं। असतां तोही परि चोजवेना ॥
जळामाजी भानु बिंबला दिसे। तैसा देहीं दिसे परमात्मा ॥
पुष्पामाजीं परिमळ राहिला निश्चळ। तैसा तो अकळ लक्षा नये ॥
हें बोलणें सिद्धांतींचें शेवटीं। चांगया वेदांतीं कथन केलें ॥

७. आकाशास मुंगीनें गवसणी घातली.

आकाश कवळिलें मुंगीनें बाहीं। तेथें एक नवल वितलें[3] पाहीं ॥
नवल झालें नवल झालें। विश्व व्यापिलें मुर्कुटानें[4] ॥
वटेश्वरीं चांगा सूक्ष्म स्थूळ। जाति ना कुळ बाईयांनो ॥

८. डोळ्यांवांचून स्वस्वरूपाचें देखणें.

डोळे पैं दोंदीलें[5] जाले माझे। आपुलें सहजें रूप देखे ॥
सुखाची माउली भेटावया आली। स्तनपान जाली याचकासी ॥

१ दांपत्य, जोडपें. २ समजणें. ३ उत्पन्न झालें. ४ धुंगुरटें. ५ दोंद निघालेले, निडारलेले.

माझें सुख सुखेंचि भोगावें। डोळया पाडावें डोळेवीण ॥
वटेश्वर चांगा शून्यीं बुडाला। डोळ्ळ[1] जाला परब्रम्हीं ॥

### ९. स्वरूपदर्शनानें वृत्तीचें ताटस्थ्य.

पाहूं गेलें तंव मी माझी हारपलें। ठकचि ठेलें काय सांगों ॥
मन ब्रह्मीं वेडावलें सोहंशब्दीं हारपलें। इंद्रियासहित बुडालें काय सांगों ॥
पारुषली मति अतिज्ञान ज्योति। वटेश्वरीं निवृत्ति चांगा म्हणे ॥

### १०. बोल बोले पण डोळां न दिसे.

यंत्राची युक्ति शब्द प्रकाशे। बोल बोले तव डोळां न दिसे ॥
रुणझुण रुणझुण किनरी वाजे। येणेंचि आनंदें त्रिभुवन गाजे ॥
चांगा वटेश्वर नादीं निमाला। ब्रह्म पाहतां ब्रह्मचि जाला ॥

---

१ नाहींशी होणें. २ पांवा.

# नामदेव.

## १. नामदेवचरित्र.

### १. बाबाजी ब्राह्मणानें लिहिलेलें नामदेवाचें जन्मपत्र.

माझें जन्मपत्र बाबाजीब्राह्मणें । लिहिलें त्याची खूण सारु ऐका॥
अधिक ब्याण्णव गणित अकराशतें । उगवतां आदित्य रोहिणीसीं
शुक्ल एकादशी कार्तिकी रविवार । प्रभव संवत्सर शालिवाहन॥
प्रसवली माता मज मळसूत्रीं । तेव्हां जिव्हेवरी लिहिलें देवें ॥
शतकोटी अभंग करील प्रतिज्ञा । नाममंत्र खुणा वाचुनी पाहे ॥
ऐंशीं वर्षें आयुष्य पत्रिका प्रमाण । नामसंकीर्तन नामया वृद्धि ॥

### २. तुळस कुश्चळ भूमीवर उगवली तरी तिला अमंगल ह्मणतां येणार नाहीं.

कुश्चळ भूमिवरी उगवली तुळसी। अपवित्र तयेसी म्हणों नये॥
काकविष्ठेमाजी जन्मे तो पिंपळ। तया अमंगळ म्हणों नये ॥
दासीचिया पुत्रा राज्यपद आलें । उपमा मागील देऊं नये ॥
नामा म्हणे तैसा जातीचा मी शिंपी। उपमा जातीची देऊं नये॥

### ३. मुक्ताबाईच्या मतें नामदेव कोरा राहतो.

चौदाशें वरुषें शरीर केलें जतन । बोधाविण शीण वाढविला ॥
नाहीं गुरुमंत्र नाहीं उपदेश । परमार्थासी दोष लावियेला ॥
स्वहिताचें कारण पाडियेलें जेव्हां । शरण आला तेव्हां अलंकापुरीं

१ अपवित्र, माळिण. २ कावळ्याची विष्ठा.

गैनीनाथें गुज दिलें निवृत्तीला । निवृत्तीचा झाला ज्ञानदेव ॥
ज्ञानदेवीं बीज वाढलेंसे जनीं । तेंचि आम्हीं तुम्हीं संपादिलें ॥
म्हणे मुक्ताबाई तिहीं लोकीं ठसा[1] । नामदेव ऐसा राहिला कां ॥

### ४. गोऱ्याकुंभारास बोलावणें.

गोरा बोलाविला जुनाट पैं जुना । हातीं थापटणें अनुभवाचें ॥
परब्रह्म म्हातारा निवाला अंतरीं । वैराग्याचें वरी पाल्हाळला[2] ॥
सोहंशब्दें विरक्ति उरली अंतरीं । पातीं अणुभरी पाहिलें पण ॥
म्हणे मुक्ताबाई घालूं द्या लोटांगण । जाऊं द्या शरण अव्यक्तासी ॥

### ५. नामदेव हें केवळ कच्चें मडकें.

जव्हारियापुढें मांडियेलें रत्न । आतां मोला उणें येईल कैसें ॥
तैसें थापटणें पारखियांचा[3] हात । वाफ झालया घात वायां जाती ॥
प्रथम थापटणें हाणिलें निवृत्तीच्या माथां । डेरा झाला निकां[4] परब्रह्म ॥
तेंचि थापटणें ज्ञानेश्वरावर । आतां कैचें कोरें उरें येथें ॥
तेंचि थापटणें सोपानाचें डोईं । यांत लेश नाहीं कोरें कोठें ॥
तेंचि थापटणें मुक्ताईला हाणी । अमृत संजीवनी उतों आली ॥
तेंचि थापटणें नामदेवावर । डोई चोळूं मोहरें[5] रडों लागे ॥
गोरा म्हणे कोरा राहिलागे बाई । शून्यभर नाहीं भाजिलें कोठें ॥

### ६. संतमंडळी ही एक कैकाड्यांची सभाच आहे.

संतसमागम फळलारे बा मला । सन्मानाचा झाला लाभ मोठा ॥
अतिथि आदर केला मुक्ताबाई । लांकडानें डोई फोडिली माझी ॥

---

१ प्रसिद्धि. २ विस्तारणें, ओलावणें. ३ परीक्षक, मर्मज्ञ. ४ योग्य, खरोखर. ५ प्यादें.

देवानें गोंधळ घातला गरुडपारीं । भिजली पितांबरी अश्रुपातीं ॥
माझें माझें म्हणोनि गाइलें गाऱ्हाणें । कळलें संतपण हेंचि तुमचें॥
भरीं भरोनियां आलों तुमचे जवळीं। कैकाड[१] मंडळी ठावी नोहे ॥
नामा म्हणे सन्मान पावलों भरून । करितां गमन भलें दिसे ॥

७. नामदेव इंद्रायणीच्या पार जाऊन त्वरेनें पंढरपुरास जातो.

न पुसतां संतां निघाला तेथुनि । पैलपार इंद्रायणी प्राप्त झाला ॥
मागें पुढें पाहे पळतो तांतडीं[२] । आला उडाउडी पंढरीसी ॥
कवळोनि[३] कंठीं विठ्ठल हे मूर्ति । नको देऊं हातीं निवृत्तीच्या ॥
ज्ञानदेव सोपान पाठविले कोरे । जुनाट म्हातारा जाळूं आला ॥
मुक्ताबाईनें तेथें माजविली कळी[४] । हे संतमंडळी कपटी तुझी ॥
नामा म्हणे देवा आणिलों पूर्वदैवें । गेलों असतों जिवें सगळाचि ॥

८. पंढरपुराहून विसोबा खेचराच्या दर्शनास प्रयाण.

देवावरी पाय ठेवूनि खेचर । निजेला परिकर[५] निवांतचि ॥
देखोनियां नामा पावला विस्मया । कैसा हा प्राणिया देवो नेणे ॥
उठीं उठीं प्राण्या आंधळा तूं काय । देवावरी पाय ठेवियेले ॥
विसोबा खेचर बोले नामदेवा । उठविलें जीवा कां रे माझ्या ॥
देवावीण ठाव रिता कोठें आहे । विचारोनि पाहें नामदेवा ॥
जेथें देव नसे तेथें माझे पाय । ठेवीं पां अन्वयें[६] विचारूनी ॥
नामा पाहे जिकडे तिकडे देव । कोठें रिता ठाव न देखेचि ॥

९. दगडाच्या मूर्तीमुळें जर इच्छा पुरेल तर ती आघातानें कां भंगते?

पाषाणाचा देव बोलेचि ना कधीं । हरी[७] भवव्याधि केविं घडे ॥
दगडाची मूर्ति मानिला ईश्वर । परि तो साचार देव भिन्न ॥

---

१ टोपल्या वगैरे विणणारी एक जात. २ घाईनें. ३ आलिंगन देणें. ४ तंटा. ५ समर्थ, तयार. ६ संगति. ७ दूर करणें.

दगडाचा देव इच्छा पुरवित । तरी कां भंगत आघातानें ॥
पाषाण देवाची करिती जे भक्ति । सर्वस्वा मुकती मूढपणें ॥
प्रस्तराचा[1] देव बोलत भक्तांतें । सांगते ऐकते मूर्ख दोघे ॥
ऐशांचें महात्म्य जे कां वर्णिताती । आणि म्हणविती तेणें भक्त ॥
परंतु ते नर पामर जाणावे । त्यांचे नायकावे बोल कानीं ॥
धोंडा घडोनियां[2] देव त्याचा केला । आदरें पूजिला वर्षें बहु ॥
तरी तो उतराई होय केव्हां काई । बरवें हृदयीं विचारा हें ॥
धोंडापाण्याविण नाहीं देव कोठें । होतां सानमोठें तीर्थ क्षेत्र ॥
द्वादशीचे[3] गांवीं जाहला उपदेश । देवावीण ओस स्थळ नाहीं ॥
तो देव नामया हृदयीं दाविला । खेचरानें केला उपकारु हा ॥

## १०. विसोबा खेचरानें डोळियाचा डोळा उघडला.

सद्गुरुसारिखा सोइरा जिवलग । तोडिला उद्वेग[4] संसारींचा ।
काय उतराई होऊं कवण्या गुणें । जन्मा नाहीं येणें ऐसें केलें ॥
माझें सुख मज दाखविलें डोळा । दिधली प्रेमकळा नाममुद्रा ॥
डोळियाचा डोळा उघाडिला जेणें । लेवविलें लेणें[5] आनंदाचें ॥
नामा म्हणे निकी[6] सांपडली सोय[7] । न विसंबें[8] पाय खेचराचे ॥

---

१ दगड. २ ठोकून तयार करणें. ३ बार्शी ? ४ दुःख. ५ दागिना. ६ चांगली, खरोखर. ७ मार्ग. ८ विसरणें.

## २. नामदेवांच्या अंतःकरणांतील तळमळ.

११. सुवासावर भ्रमर, अगर मधावर माशी, याप्रमाणें देवावर माझें चित्त आहे.

जन्मोजन्मीं आम्हीं बहु पुण्य केलें । तेव्हां या विठ्ठलें कृपा केली॥
जन्मोनि संसारीं झालों त्याचा दास। माझा तो विश्वास पांडुरंगीं॥
अनेक दैवतां नेघें माझें चित्त । गोड गातां गीत विठोबाचें ॥
भ्रमर[1] सुवासीं मधावरी माशी । तैसें या देवासी माझें मन ॥
नामा म्हणे मज पंढरीस न्यारे । हडसोनि[2] द्यारे विठोबासी ॥

१२. माझे मनोरथ तुवांजचून कोण पुरविणार ?

माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा। केशवा माधवा नारायणा ॥
नाहीं नाहीं मज आणिक सोयरा। न करीं अव्हेरा पांडुरंगा ॥
अनाथाचा नाथ होसी तूं दयाळा। किती वेळोवेळां प्रार्थूं आतां॥
नामा म्हणे जीव होतो कासाविस । केली तुझी आस आतां बरी॥

१३. मी अनाथानाथ असलों तर तूं अनाथनाथ आहेस.

अनाथ अनाथ म्हणती मातें । अनाथनाथ[3] म्हणती तूतें ॥
आपुलें ब्रीद साच करी। भेट मज एक वेळ मुरारी ॥
पतित पतित म्हणती मातें । पतितपावन म्हणती तूतें ॥
दीन दीन म्हणती मातें । दीननाथ म्हणती तूतें ॥

---

१ भुंगा. २ बजावणें. ३ अनाथांचा वाली.

आर्त आर्त म्हणती मातें । आर्तपरायण म्हणती तूतें ॥
नामा म्हणे ऐकें सुजाणा । नाइकसी तरी लाज कवणा ॥

### १४. मला येथें तुजवांचून कोणी नाहीं.

तुवां येथें यावें कीं मज तेथें न्यावें । खंती माझ्या जीवें मांडियेली॥
माझें तुजविण येथें नाहीं कोणी । विचारावें मनीं पांडुरंगा ॥
नामा म्हणे वेगीं यावें करुणाघना । जातो माझा प्राण तुजलागीं॥

### १५. तुझें अमृताहून गोड नाम माझे वाचेस कां येत नाहीं?

अमृताहूनि गोड नाम तुझें देवा । मन माझें केशवा कां बा नेघे ॥
सांग पंढरिराया काय करूं यासी । कां रूप ध्यानासी नये तुझें ॥
कीर्तनीं बैसतां निद्रें नागविलें । मन माझें गुंतलें विषयसुखा ॥
हरिदास गर्जती हरिनामाच्या कीर्ती । नये माझ्या चित्तीं नामा म्हणे

### १६. मजकडून प्रपंचास मिठी घालवून तूं स्वामिद्रोह करवितोस.

उलिसा प्रपंच परि हा लटिका । तेणें तुज व्यापका झांकियेलें ॥
तैसियाच्या मज घालोनियां खेवां । स्वामिद्रोही देवा करिसी कैसा॥
मेरूचिया गळां बांधोनि मशक । पाहासी कवतुक अनाथनाथा ॥
नामा म्हणे देवा कळली तुझी मावि । माझा मी उपाव करीन आतां॥

### १७. जरी वेडें मुकें झालें तरी मुलाचें हित जनकास करावेंच लागतें.

अपत्याचें हित कीजे त्या जनकें । जरी वेडें मुकें झालें देवा ॥
तैसें मी पोसणें तुझें जिवलगं । अंतरींचें सांग गुज कांहीं ॥

---

१ सुज्ञाना. २ खेद, उत्कंठा. ३ आरंभणें. ४ येवढासा. ५ खोटा. ६ मिठी, आलिंगन. ७ चिलट. ८ माया. ९ पोसावयाचें मूल. १० आवडतें.

राखीन मी नांव तुझें सर्वभावें । चित्त वित्त जीव देईन पायीं ॥
जरी देवा हीन म्हणशील मज । नामा म्हणे लाज येइल कोणा ॥

### १८. चंद्रानें चकोराचा सोहळा पुरविला असतां त्याच्या कळा न्यून होतील काय ?

तुझें प्रेम माझे हृदया आवडी । चरण मी न सोडीं पांडुरंगा ॥
कशासाठीं शीण थोडक्याकारणें । काय तुज उणें होय देवा ॥
चंद्र चकोराचा पुरवी सोहळा । काय त्याच्या कळा न्यून होती॥
नामा म्हणे मज अनाथा सांभाळी । हृदयकमळीं स्थिर राहें ॥

### १९. चातकाची तहान जळधारानें पुरविली असतां तो रिता होईल काय ?

तुझें रूप माझ्या दाखवीं मनातें । मग तुझ्या चरणातें न विसंबें ॥[1]
कां मज शिणविशी थोडियाकारणें। काय तुझें उणें होईल देवा॥
चातकाची तहान पुरवी जळधरें[2]। काय त्याचें सरें थोरपण॥
चंद्र चकोराचा पुरवी सोहळा। काय त्याच्या कळा न्यून होती॥
कूर्मी[3] अवलोकी आपुलिया बाळा। काय तिच्या डोळां दृष्टि नासे॥
नामा म्हणे देवा तुझाचि भरंवसा। अनाथा कोंवसा[4] होसी तूंचि॥

### २०. तूं माझी कुरंगी असून मी तुझें पाडस आहे.

डोळे शिणले पाहतां वाटुली[5] । अवस्था दाटली हृदयामाजी ॥
तूं माझी जननी सरसीये सांगातिणी । विठ्ठले धांवोनि देईं क्षेम ॥
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज[6] । क्षुधें पीडलों मज विसरलीसी॥

---

१ विसरणें. २ मेघ. ३ कांसवी. ४ आश्रय, आधार. ५ वाट. ६ पिल्लूं.

तूं माझी कुरंगी[1] मी तुझें पाडस । गुंता भवपाश तोडीं माझा ॥
तूं माझी माउली मी तुझी तान्हुली । वोरसें[2] वो घालीं प्रेमपान्हा ॥
नामा म्हणे आस पुरवावी माझी । तान्हुलया पाजी प्रेमपान्हा ॥

२१. मी चकोर, तूं चंद्र; मी सरिता, तूं सागर; मी याचक, तूं दाता आहेस.

येईं वो कृपावंते अनाथांचे नाथे ।
निवारी भवव्यथे पांडुरंगे ॥
मी बाळक भुकाळु तूं माउली कृपाळु ।
करी माझा सांभाळु पंढरिनाथा ॥
माझें माहेर पैं नित्य आठवे अंतरीं ।
सखा विटेवरी पांडुरंग ॥
मी देह तूं चैतन्य मी क्षुधार्थी तूं अन्न ।
तृषार्थी तूं जीवन पांडुरंगा ॥
मी चकोर तूं चंद्र मी सरिता तूं सागर ।
मी याचक तूं दातार पांडुरंगा ॥
मी धनलोभी शुद्ध तूं पूर्ण कनककुंभ[3] ।
मी मगर तूं अंभ[4] पांडुरंगा ॥
मी चातक तूं मेघ मी प्रवृत्ति तूं बोध ।
मी शुष्कनदी तूं ओघ पांडुरंगे ॥
मी दोषी तूं तारक मी भृत्य[5] तूं नायक ।
मी प्रजा तूं पाळक पांडुरंगा ॥
मी पाडस तूं कुरंगिणी मी अंडज तूं पक्षिणी ।

१ हरिणी. २ स्नेहभरित पान्हा. ३ सोन्याचा घडा. ४ पाणी. ५ सेवक.

मी अपत्य तूं जननी पांडुरंगा ॥
मी भक्ति तूं निजसोय मी ध्यान तूं ध्येय ।
मी आडळ[१] तूं साह्य पांडुरंगा ॥
ऐसी जे जे माझी विनंति ते तुजचि लक्ष्मीपति ।
नित्य सुखसांगाती पांडुरंगा ॥
शीघ्र येई वो श्रीरंगे भक्तमानसरंगें ।
प्रेमपान्हा दे गे नामदेवा ॥

२२. पक्षिणी चाऱ्यास गेली असतां उपवाशी पिलाप्रमाणें माझी स्थिती झाली आहे.

पक्षिणी प्रभातीं चारियासी जाये । पिलूं वाट पाहे उपवासी ॥
तैसें माझें मन करी वो तुझी आस । चरण रात्रंदिवस चिंतीतसें ॥
तान्हें वत्स घरीं बांधलेसें देवा । तया हृदयीं धांवा माउलीचा ॥
नामा म्हणे केशवा तूं माझा सोईरा । झणी[२] मज अव्हेरा अनाथनाथा ॥

२३. अग्नीमध्यें पडलेल्या बालकाच्या कळवळ्यानें मातेप्रमाणें तूं धांव.

अग्निमाजी पडे बाळु । माता धांवे कनवाळु ॥
तैसा धांवे माझिया काजा[३] । अंकिला मी दास तुझा ॥
सवेंचि झेंपावे पक्षिणी । पिलीं पडतांचि धरणीं ॥
भुकेलें वत्सरावें[४] । धेनु हुंबरत धांवे ॥
वणवा लागलासे वनीं । पाडस चिंतीत हरणी ॥
नामा म्हणे मेघ जैसा । विनावितो चातक तैसा ॥

२४. मी स्मशानीं जळत असतां मला सर्व टाकून सर्व पळून जातील.

अंतकाळीं मी परदेशी । ऐसें जाणोनि मानसीं ।
म्हणोनियां हृषीकेशी । शरण तुजसी मी आलों ॥

१ अडचण. २ कदाचित्. ३ कार्य. ४ वांसरूं.

नवमास गर्भवासीं। कष्ट झाले त्या मातेसी।
ते निष्ठुर झाली कैसी। अंतीं दूर राहिली॥
जीवीं बापासी आवड। मुखीं घालोनि करी कोड[१]।
जेव्हां लागली यमओढ। तेव्हां दूर टाकिलें॥
बहिणीबंधूचा कळवळा। तें तूं जाणसी रे दयाळा।
जेव्हां लागली यमशृंखळा। तेव्हां दूर राहिलीं॥
कन्यापुत्रादिक बाळें। हीं तव स्नेहाचीं स्नेहाळें।
तुझ्या दर्शनाहूनि व्याकुळें। अंतीं दूर राहिलीं॥
देहगृहाची कामिनी[२]। ते तंव राहिली भवनीं।
मी तंव जळतसें स्मशानीं। आग्निसवें येकला॥
मित्र आले गोत्रज आले। तेही स्मशानीं परतले।
शेवटीं टाकूनियां गेले। मजलागीं स्मशानीं॥
ऐसा जाणोनि निर्धार। मज मग आला गहिंवर।
तंव दाही दिशा अंधःकार। मज कांहीं न सुचे॥
ऐसें जाणोनि निर्वाण पाहीं। मनुष्यजन्म मागुता नाहीं।
नामा म्हणे तुझे पायीं। ठाव देई विठोबा॥

२५. माझी कींव कर, नाहीं तर माझा जीव घे.

तुझा माझा देवा कां रे वैराकार[३]। दुःखाचे डोंगर दाखविसी॥
बळें बांधोनियां देसी काळाहातीं। ऐसें काय चित्तीं आलें तुझ्या॥
आम्हीं देवा तुझी केली होती आशा। बरवें हृषीकेशा कळों आलें॥
नामा म्हणे देवा करा माझी कींव। नाहीं तरी जीव घ्यावा माझा॥

---

१ आवड. २ स्त्री. ३ शत्रुत्व.

२६. आतां आम्हीं आमच्या गांवास जातों, तुम्हीं आम्हांवर कृपा असों द्यावी.

बहुत दिवस तुमचे गांवीं । आतां कृपा असों द्यावी ॥
आम्हीं जातों आपुल्या गांवा । विठोबा लोभ असों द्यावा ॥
तुझे पायीं माझें मन । माझे ठायीं तुझा प्राण ॥
लिखित पत्र पाठवावें । माझें स्मरण असों द्यावें ॥
नामा म्हणे जी केशवा । अखंड प्रेमभाव द्यावा ॥

२७. मला नामाची सांगड देऊन वैकुंठावर नेऊन घाल.

संसारसागरीं पडलों महापुरीं । सोडवण करी देवराया ॥
नामाची सांगडी[1] देऊनियां मातें । वैकुंठावरुतें नेउनी घालीं ॥
कामक्रोधमगर[2] करिती माझा ग्रास । झणीं[3] तूं उदास होसी देवा ॥
नामा म्हणे झणीं मोकलिसी मातें । नाम तुझें सरतें[4] धरलें एक ॥

२८. दुसऱ्या पोहणाऱ्यांकडून मी बाहेर निघत नसल्यानें तूं पीतांबरासकट उडी घाल.

माझे मनीं ऐसें होतसे गा देवा ।
देह समर्पावा तुझे पायीं ॥
तंव या मायामोहें मजसी केला हेवा[5] ।
लोटियेलें देवा भवजळामाजीं ॥
आशानदीपुरीं वाहविलें दुरी ।
काढी मज हरी कृपाळुवा ॥

१ भोंपळ्याचा ताफा. २ सुसर. ३ कदाचित्. ४ वंध. ५ मत्सर, द्वेष.

सरितामाजीं धरिलों मदनमगरीं ।
पुढारीं मागारीं होऊं नेदी ॥
न निघे न निघे आणिकां पोहणारें ।
सहित पितांबरें घाली उडी ॥
थंडीये[1] उभया धांव गा श्रीहरी ।
हानी झाली थोरी सर्व गेलें ॥
भक्तिनवरत्नाची बुडाली वाखोरी[2] ।
काढी वेगीं हरि कृपाळुवा ॥
धीर आणि विचार ह्या दोन्हीं सांगडीं ।
श्रद्धा पुढें दोरी तुटोनि गेली ॥
भावबळें सांपडलों दाटलों उभडीं[3] ।
वेगीं घाली उडी कृपाळुवा ॥
नामा म्हणे भजनेंविण कोरडा गळा ।
नेतो रसातळां क्रोधमीन[4] ॥

२९. तुझ्या रूपाची वाट पाहतांना माझे लोचन शिणून गेले आहेत.

काय पांडुरंगा सांग म्यां करावें । शरण कोणा जावें तुम्हांविण ॥
पाहतांना वाट भागले लोचन[5] । कठीणच मन केलें तुवां ॥
ऐकिली म्यां कानीं कीर्ति तुझी देवा । उठलासे हेवा त्याचि गुणें ॥
अनाथ अन्यायी काय मी करीन । दयावंता खूण सांगसी तूं ॥
नामा म्हणे आस पूर्ण कीजे देवा । रूपडें दाखवा नेटेंपाटें[6] ॥

---

१ कांठावर. २ माळ. ३ पूर. ४ मासा. ५ डोळे. ६ लवकर, सत्वर.

### ३० आंसवें दाटून बाह्या पसरून नामदेव विठ्ठलाची वाट पहात आहे.

केथवां[1] भेटसी माझिया जिवलगा । ये गा पांडुरंगा मायबापा ॥
आशा धरूनि पोटीं दिवस लेखीं[2] बोटीं । प्राण ठेउनि कंठीं वाट पाहें ॥
चित्त निरंतर ठेउनि महाद्वारीं । अखंड पंढरी हृदयीं वसे ॥
श्रीमुख साजिरें[3] कुंडलें गोमटीं । तेथें माझीं दृष्टि बैसलीसे ॥
आंसवें[4] दाटुनि पसरूनि बाहे[5] । नामा वाट पाहे विठ्ठलाची ॥

### ३१. निलाजरा नामा कंठांत प्राण धरून रात्रंदिवस तुझें ध्यान करीत आहे.

भेटीचें आर्त[6] उत्कंठित चित्त ।
न राहे निवांत कवणे ठायीं ॥
जया देखे तया पुसें हेंचि मात ।
कैं मज पंढरिनाथ बोलावलि ॥
माहेरींची आस दसरा दिवाळी ।
बाहे ठेवुनि निढळीं[7] वाट पाहें ॥
कृपेचा सागरु विठो लोभापरु ।
परि कां माझा विसरु झाला त्यासी ॥
विटेसहित चरण देईन आलिंगन ।
तेणें माझी तनु कोल्हावेलें[8] ॥
ऐसा निलाजिरा[9] नामा कंठीं धरोनि प्राण ।
करितों तुझें ध्यान रात्रंदिवस ॥

---

१ केव्हां. २ मोजणें. ३ शोभिवंत, सुंदर. ४ अश्रु. ५ हात. ६ उत्कट इच्छा. ७ कपाळ. ८ शांत होणें. ९ निर्लज्ज.

३२. संसारवणव्यांत जळत असलेल्या मजवर, करुणाघना, तूं आपल्या कृपेचा वर्षाव कर.

तापत्रयअग्नीची जळतसे शेगडी। ओंहाळोनि कोरडी झाली काया॥
केव्हां करुणाघन वोळसी अंबरीं। निववीसी नरहरि कृपादृष्टी ॥
शोकमोहाचिया झंळंबलों ज्वाळीं। क्रोधाचे काजळीं पोळतसे ॥
चिंतेचा वोणवा लागला चहूंकडां। जातों तळा बुडा धांव देवा॥
धांव धांव करुणाघना तुजविण। नामा म्हणे प्राण जातो माझा ॥

३३. खुंट्याभोंवतीं फिरणाऱ्या वासराप्रमाणें मी आपआपणांस बांधून घेतलें आहे.

वासरूं भौंवे खुंटिया भोंवतें। आपआपणियातें गोंवियेलें ॥
तैसी परी मज झाली गा देवा। गुंतलों मी भावा लटिकिया ॥
नामा म्हणे केशवा तोडीं कां बंधनें। मी एक पोसणें भक्त तुझा ॥

३४. मी लटिका असलों तरी तुझेंच नाम गात आहे.

लटिकें तरी गायें तुझेंचि नाम। लटिकें तरी प्रेम तुझेंचि आणी॥
सहजेंचि लटिकें असे माझे ठायीं। तुझिया पालट नाहीं साचपणा॥
लटिकें तरी हरी करीं तुझें ध्यान। लटिकें माझें मन तुजचि चिंती॥
लटिका तरी म्हणवी तुझाचि मी दास। परि नामीं विश्वास सत्य आहे
लटिका तरी बैसें संतांचे संगतीं। परि आहे माझें चित्तीं ध्यान तुझें ॥
ऐसें लटिकें माझें मन सफळ करीं देवा। नामा म्हणे केशवा विनवित आहे ॥

---

१ पोळणें. २ स्पर्शकरणें, पोळणें. ३ फिरणें. ४ पोसलें जाणारें मूल.

### ३५. मी अंगुष्ठापासून मस्तकापर्यंत पातकें आचरीत आलों आहें.

काय गुण दोष माझे विचारिसी। आहे मी तों राशी अपराधांची॥
अंगुष्ठापासोनि मस्तकापर्यंत। अखंड दुश्चित[1] आचरलों॥
स्वप्नीं देवा तुझी नाहीं घडली भक्ति। पुससी विरक्ति कोठोनियां॥
तूंचि माझा गुरु तूंचि तारी स्वामी। सकळअंतर्यामी गाऊं तुज॥
नामा म्हणे माझें चुकवीं जन्ममरण। नको करूं शीण पांडुरंगा॥

### ३६. मी कंटाळून आपोंआप उठून जाईन असें तुला वाटतें काय?

वारंवार काय विनवावें आतां। समजावें चित्ता आपुलिया॥
तूं काय म्हणसी कंटाळेल हाचि। जाईल उगाचि उठोनियां॥
मजलागीं देवा जासी चुकवोनि। आणीन धरुनी तुजलागीं॥
दृढ भक्तिभाव प्रेमाचा हा दोरा। बांधीन सत्वर तुझे पायीं॥
नामा म्हणे बोल काय विठो आतां। भेटावें सर्वथा यांत बरें॥

### ३७. तुला जिवंत धरून सोहंशब्दानें मार दिल्यावर तूं काकुळतीस येशील.

प्रेमफांसा[2] घालुनियां गळां। जितं[3] धरिलें गोपाळा॥
एक्या मनाची करुनि जोडी। विठ्ठलपायीं घातली बेडी॥
हृदय करुनि बंदिखाना। विठ्ठल कोंडूनि ठेविला जाणा॥
सोहंशब्दें मार केला। विठ्ठल काकुळती आला॥
नामा म्हणे विठ्ठलासी। जीवें न सोडीं सायासीं[4]॥

---

१ पातक. २ जाळें. ३ जिवंत. ४ प्रयत्नानें.

## ३८. तुला निष्कामकर्मयोग माहीतच नाहीं.

उदाराचा राणा म्हणविसी आपणां ।
सांग त्वां कवणा काय दिल्हें ॥
उचितां उचित देसी पंढरिनाथा ।
न बोलों सर्वथा वर्मे[1] तुझीं ॥
वर्मे तुझीं कांहीं बोलेन मी आतां ।
क्षमा पंढरिनाथा करी बापा ॥
न घेतां न देसी आपुलेंही कोणा ।
प्रौढी[2] नारायणा न बोलावी ॥
बाळमित्र सुदामा विपत्तीं पीडिला ।
भेटावया आला तुजलागीं ॥
तीन मुष्टि[3] पोह्यासाठीं मन केलें हलुवट[4] ।
मग तया उत्कृष्ट राज्य दिलें ॥
छळावया पांडवां दुर्वास पातला ।
द्रौपदीनें केला धांवा तुझा ॥
येवढिया आकांतीं घेउनि भाजीपान ।
मग दिलें अन्न ऋषींलागीं ॥
बिभीषणा दिधली सुवर्णाची नगरी ।
हे कीर्ति तुझी हरि वाखाणती ॥
वैरियाचें घर भेदें[5] त्वां घेतलें ।
त्याचें त्यासी दिधलें नवल काय ॥
ध्रुव आणि प्रल्हाद अंबऋषि नारद ।
हरिश्चंद्र रुक्मांगद आदिकरुनी ॥

---

१ उणेंपण. २ मोठेपणा. ३ मुठी. ४ हलकें. ५ फितूरी.

त्याचें सेवाऋण घेऊनि अपार ।
मग त्या देसी वर अनिर्वाच्य ॥
एकाची शरीरसंपत्ति आणि वित्त ।
एकाचें तें चित्त हिरोनि घेसी ॥
मग तया देसी आपुलें तूं पद ।
जगदानी[१] हें ब्रीद मिरविसी ॥
माझें सर्वस्व तूं घेई तुझें नको कांहीं ।
मनोरथाची नाहीं चाड मज ॥
नामा म्हणे केशवा जन्मजन्मांतरीं ।
करीन मी हरि सेवाऋण ॥

३९. हात जोडून मढ्याशीं बोलावें तशी माझी स्थिति झाली आहे.

कागदींचें वित्त वेश्येसी दिधलें । तैसें आम्हां केलें नारायणें ॥
जोडोनियां हस्त बोले मढयापाशीं । तैसें तूं मजशीं केलें देवा ॥
कडू भोंपळ्याचा कोणता उपयोग । तैसें पांडुरंगें केलें जाण ॥
नामा म्हणे ऐसें करूं नको देवा । समागम व्हावा पायांसवें ॥

४०. "घेसी तेव्हां देसी ऐसा अससी उदार."

घेसी तेव्हां देसी ऐसा अससी उदार ।
काय जाउनियां तुझे कृपणाचे[२] द्वारां ॥
उच्छिष्टाचीं शितें न टाकिसी बाहेरीं ।
कोणी दिधली देवा एवढी भूषणाची थोरी ॥

१ सर्व जगांत श्रेष्ठ दाता. २ लोभी, कवडीचुंबक.

सोडीं ब्रीद देवा आतां नव्हेसी अभिमानी ।
पतितपावन नाम तुझें ठेवियलें कोणी ॥
नामा म्हणे देवा तुझें नलगे मज कांहीं ।
प्रेम असों द्यावें कीर्तनाचे ठायीं ॥

४१. भक्त उदार व देव कृपण असाच डंका पुराणांत गाजला आहे.

आम्ही शरणागत परि सर्वस्वें उदार ।
भक्तीचे सागर सत्त्वशील ॥
कायावाचामनें अर्थ संपत्ति धन ।
दिधलें तुजलागून पांडुरंगा ॥
आम्हांऐसें वित्त तुम्हां कैचें देवा ।
हा बं[1]डिवार केशवा न बोलावा ॥
सत्त्वाचा सुभट[2] बळि चक्रवर्ती ।
पहा पहा केवढी ख्याति केली तेणें ॥
त्रिभुवनींचें वैभव जोडिलें ज्यालागुनि ।
तें शरीर तुझ्या चरणीं समर्पिलें ॥
रावणा ऐसा बंधु सांडूनि सधर[3] ।
ओळंगती[4] परिवारें[5] ब्रह्मादिक ॥
ते सांडोनि एकसरां[6] आलासे धांवत ।
झाला शरणागत बिभीषण ॥
हिरण्यकश्यपें तुझा वैरसंबंध ।
पाहे पां प्रल्हाद गांजियेला ॥

१ प्रतिष्ठा. २ शूर, उत्तम योद्धा. ३ बळकट. ४ चाकरी करणें. ५ दास. ६ एकदम.

अजगर कुंजर[1] करितां विषपान।
परि तुझें स्मरण न संडीच ॥
पतिपुत्र स्नेह सांडोनि गोपिका।
रासक्रीडे देखा भुललीया ॥
एकीं तुझें ध्यान करितां त्यजिले प्राण।
सांग ऐसें निर्वाण[2] कवणें केलें ॥
ऐसे मागां पुढां झाले असंख्यात।
भक्तभागवत सखे माझे ॥
त्यांचेनि सरता[3] झालासी त्रिभुवनीं।
विचारी आपुल्या मनीं पांडुरंगा ॥
आतां केलें उच्चारण बोलतां लाजिरवाणें।
हांसतीं पिशुणें[4] संसारींचीं ॥
नामा म्हणे केशवा अहो शिरोमणि।
निकुरा[5] जासी क्षणीं मायबापा ॥

## ४२. ध्रुवाप्रमाणें अज्ञान अगर उपमन्याप्रमाणें बुद्धिमंद मी नाहीं.

आम्हीं शरणागतीं सांडिली वासना।
ते त्वां नारायणा अंगिकारिली ॥
म्हणोनि प्रसन्न व्हावया आमुतें।
वोरसल्या[6] चित्तें चालविसी ॥
अज्ञान बाळकु ठकविला ध्रुरु[7]।
तैसा मी अधीरु नव्हे जाण ॥

---

१ हत्ती. २ पराकाष्ठेचा प्रयत्न. ३ मान्य. ४ चहाडखोर. ५ कठोरपणा. ६ पान्हा सोडणें. ७ ध्रुव.

लंकापति केला तुवां बिभीषण ।
झालासी उत्तीर्ण वाचाक्रणें ॥
उपमन्यें घेतला दुधाचाची छंद ।
तैसा बुद्धिमंद नव्हे जाण ॥
नामा म्हणे तैसा नव्हे मी अज्ञान ।
माग तुज देईन शरीर अवघें ॥

४३. तुझा आम्हीं अंगिकार केला आहे, व तूं आमच्यामुळें थोरवी भोगितोस, हें तूं विसरलास !

आम्हीं शरणागतीं केलासे सरता ।
येऱ्हवीं अनंता कोण जाणे ॥
वेदशास्त्रपुराणीं उबगोनि सांडिलासी ।
तो आम्हीं धरिलासे हृदयकमळीं ॥
चतुरां शिरोमणि अहो केशिराजा ।
आंगिकार तुझा केला आम्हीं ॥
सहस्रैकनामें झालासी संपन्न ।
तरी हेंही भूषण आमुचेनचि ॥
येऱ्हवीं त्या नामांची कोण जाणे सीमा ।
पाहें मेघश्यामा विचारोनि ॥
होतासी क्षीरसागरीं अनाथाचे परी ।
लक्ष्मी तेथें करी चरणसेवा ॥
तेहि तंव जाण आमुची जननी ।
तूं तिये वांचोनि शोभसी कैसा ॥

---

१ कंटाळणें.

तुज नाहीं नाम रूप जाति कुळ ।
अनादीचें मूळ म्हणती तुज ॥
आम्हीं भक्त तरी तूं भक्तवत्सल ।
ऐसा प्रगट बोल जगामाजी ॥
ऐसी आमुचेनि भोगिसी थोरीव ।
आमुचा जीवभाव तुझ्या पायीं ॥
नामा म्हणे केशवा जरी होसी जाणता ।
तरी या बोला उचिता प्रेम देईं ॥

### ४४. राजानें जरी आपली कांता टाकिली तरी तिची जगावर सत्ता चालत नाहीं काय?

प्रीति नाहीं रायें वर्जियेली[1] कांता । परि तिची सत्ता जगावरी ॥
तैसे दंभधारी आम्हीं तुझे भक्त । घालूं यमदूत पायांतळीं ॥
रायाचा तो पुत्र अपराधी देखा । तो काय आणिकां दंडवेल ॥
बहात्तर खोडी देवमण कंठीं । आम्हां जगजेठी नामा म्हणे ॥

### ४५. विषयगरळाची शेवटची लहरी येण्याच्या अगोदरच तूं मला वांचीव.

मज चालतां आयुष्यपंथें । तारुण्यवन पातलें तेथें ॥
मदमत्सरादि श्वापदें[3] बहुतें । आलीं[4] कळकाळित मजपाशीं ॥
तीं धांवतीं पाठोंपाठीं । पाहे तंव विषयाचे घोटीं[5] ।
काम क्रोध व्याघ्रांची वाटी[6] । देखोनि पोटीं रिघाले पाय ॥
मग स्वधर्ममार्गीं रिघालों । तंव अहंकारतस्करें[7] आकळिलों ॥

---

१ टाकणें. २ घोड्याच्या गळ्यावरील शुभदायक भोंवरा. ३ हिंस्र पशु. ४. खाखाकरित. ५ घाटांत. ६ जाळी. ७ चोर.

राहें राहें म्हणूनि उभा केलों । तेणें अंतरलों स्वामियां ॥
जंव क्षण एक उघडिले डोळे । पाहें तंव कंठ व्यापिला व्याळें॥
मायामोहसर्पी डंखिलें[1] । त्यांचिये गरळें[2] झळंबलों[3] ॥
जंव न पावेल शेवटील लहरी । तंव धांव उपाव करीं ॥
विष्णुदास नामा धांवे पुकारी । माझा कैवारी केशिराज ॥

### ४६. देवानें शिरावर हात ठेवून नामदेवास प्रेमसुख दिल्यावर नामदेव तृप्त झाला.

घे रे घे रे नाम्या दिलें माझें प्रेम । घोकीं माझें नाम सर्वकाळ ॥
शिरावरी हात ठेवितसे माझा । अभिमान तुझा गेला म्हणुनी ॥
भक्तिसुख देवें दिलें नामयातें । नामा परमामृतें तृप्त झाला ॥
नामा म्हणे देवा झालों मी पावन । माझें तुजविण कोण आहे ॥

### ४७. खेचरदात्यामुळें सर्व सत्ता नामदेवाचे हातीं येते.

बोलूं ऐसे बोल । जेणें बोलें विठ्ठल डोले ॥
प्रेम सर्वांगाचे ठायीं । वाचे विठ्ठल रखुमाई ॥
नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ॥
परेहुनी परतें घर । तेथें राहूं निरंतर ॥
सर्वसत्ता आली हातां । नामयाचा खेचर दाता ॥

---

१ दंश करणें. २ विष. ३ व्यापणें.

## ३ नाम आणि भक्ति.

४८. तुला कपटाचें कुपथ्य झालें असल्यानें तूं नामाचें औषध घे.

कपटाचें कुपथ्य झालें तुझें पोटीं । स्मरावा जगजेठी कृपाळु तो॥
नाम औषध घ्यावें नाम औषध घ्यावें । संतांचे लागावें समागमीं॥
त्यापासीं औषध आहे नानाविध । राम कृष्ण गोविंद म्हणती वाचे॥
पुत्रस्नेहें कैसा अजामेळ स्मरला । तेणें तो उद्धरला क्षणमात्रें ॥
राम राम म्हणतां तारिली कुंटिणी । वैकुंठभुवनीं तिये वासु ॥
तेंचि हें औषध प्रल्हादें घेतलें । तें तूं घे उगलें म्हणे नामा ॥

४९. माझ्या मुखांत तुझ्या नामाचें खंडण झाल्यास माझी रसना शतधा विदीर्ण होईल.

तुझ्या चरणाचें तुटतां अनुसंधान ।
जाईल माझा प्राण तत्क्षणीं ॥
मग हें ब्रह्मज्ञान कोणातें सांगसी ।
विचारीं मानसीं पांडुरंगा ॥
वदनीं तुझें नाम होतांचि खंडणा ।
शतखंड रसना होईल माझी ॥
सांवळें सुंदर रूप पाहतां तुझें दृष्टि ।
न देखतां उन्मळेती नयन हे ॥
तुज परतें साध्य आणीक नाहीं साधन ।
साधक माझें मन होईल श्रांत ॥

१ शांत, मुकाट्यानें. २ समूळ बाहेर येणें.

नामा म्हणे केशवा अनाथाचा नाथ ।
क्षणीं माझा अंत पाहसी देवा ॥

५०. एकतत्त्वनामावर तूं निर्धार धरिलास तर प्रपंच आपोआप ओसरेल.

एकतत्त्व हरि निर्धार तूं धरीं । प्रपंच बोहरी[1] एका नामें ॥
अच्युत गोविंद परमानंद छंद । नित्य तो आल्हाद हरिनामीं ॥
ऐसा तूं विनटे[2] हरिनामपाठें । जाशील वैकुंठें नश्वरितां[3] ॥
नामा म्हणे तत्त्व नाम गोविंदाचें । हेंचि धरी साचें येर वृथा ॥

५१. अनुभवानें, भावानें, अगर कपटानें कसेंही नाम वाचेस येऊं दे.

आगमीं[4] नाम निगमीं[5] नाम । पुराणीं नाम केशवाचें ॥
अर्थीं नाम पदीं नाम । धृपदीं नाम त्या केशवाचें ॥
अनुभवें भावें कपटें प्रपंचें । परि हरिचें नाम येऊं दे वाचे ।
नाम व्हावें नाम व्हावें । नाम व्हावें त्या केशवाचें ॥
ऐसें नाम बहु सुंदर । नामीं तरले लहान थोर ।
नामा म्हणे अंतर । पडों नेदी याउपर ॥

५२. देहास क्लेश झाले असतांही वाचेनें हरिनाम उच्चारावें.

देह जावो हेचि घडीं । पाय हरीचे न सोडीं ॥
क्लेश हो नानापरी । मुखीं रामकृष्ण हरि ॥
क्रीडा वैष्णवांचे मेळीं । हांक केशव आरोळी ॥
नामा म्हणे विठोबासी । जें तें घडो या देहासी ॥

---

१ नाश होणें. २ तल्लीन होणें. ३ देहावसान झाल्यावर. ४ शास्त्र. ५ वेद.

## ५३. सर्व कर्मांचे प्रारंभीं नामच सांगितलें आहे.

नामाचा महिमा नेणोंचि पैं ब्रह्मा । म्हणोनियां कर्मी अनुसरला ॥
नाम हेंचि कर्म नाम हेंचि धर्म । केशव हेंचि वर्म सांगितलें ॥
नाम शुद्ध स्नान नाम शुद्ध संध्या । नामाविणें वेद आणिक नाहीं ॥
करितां आचमन केशव नारायण । करितां उच्चारण आधीं हेंचि ॥
लग्नाचिये काळीं म्हणती सावधान । लक्ष्मीनारायण चिंतन करा ॥
देहाचिये अंतीं प्रायश्चित्त देती । शेवटीं वदविती रामनाम ॥
ऐसिया नामापरतें नाहीं सार । गिरिजेसी शंकर उपदेशी ॥
करिती पितृश्राद्ध कर्म आचरती । शेवटीं म्हणती एको विष्णु ॥
नामें होय गति नामें होय मुक्ति । नामयाचें चित्तीं रामनाम ॥

## ५४. सदा सर्वकाळ नाम कंठीं धरल्यास गोपाळ सांभाळ करील.

काळवेळ नसे नामसंकीर्तनीं ।
उंच नीच योनि[१] हेंही नसे ॥
धरा नाम कंठीं सदा सर्वकाळ ।
मग तो गोपाळ सांभाळील ॥
कृपाळु कोंवसा[२] सुखाचा सागर ।
करील उद्धार भाविकांसी ॥
नामा म्हणे फार सोपें हें साधन ।
वाचें नाम घेणें इतुकेंचि ॥

## ५५. " अठरा पुराणांच्या पोटीं, नामाविण नाहीं गोष्टी. "

शिव हालाहलें[३] तापला । तोही नामें शीतळ झाला ।
नाम पावन पावन । याहूनि पवित्र आहे कोण ॥

---

१ जन्म. २ आश्रय, कैवारी. ३ विष.

शिवासी नामाचा आधार । केला कळिकाळ किंकर[1] ॥
मरण झालें काशीपुरीं । तेथें नामाचि उद्धारी ॥
अठरा पुराणांच्या पोटीं । नामाविण नाहीं गोष्टी ॥
नामा म्हणे अवघीं चोरें । एक हरिनाम सोईरें ॥

५६. नामावर श्रद्धा नसलेले वेदज्ञ, पंडित, व हरिदास घेऊन काय करावयाचे ?

वेदपरायण मनीं तो ब्राह्मण ।
चित्त समाधान संतुष्ट सदा ॥
येरां माझें नमन सर्वसाधारण ।
ग्रंथाचें राखण म्हणोनियां ॥
शास्त्रपंडित तोचि मी बहु मानी ।
जो आपणांतें जाणोनि तन्मय झाला ॥
पुराणिक ऐसा मानितों कृतार्थ ।
विषयीं विरक्त विधि पाळी ॥
मानी तो हरिदास ज्या नामीं विश्वास ।
मी त्याचा दास देहभावें ॥
नामा म्हणे ऐसे कई भेटविसी विठ्ठला ।
त्यालागीं फुटला प्राण माझा ॥

५७. पुंडलीकानें रचिलेल्या पेठेंत नामद्राक्षांचे अपार घड आले आहेत.

पुंडलिकें रचिली पैठ । संत ग्राहिक[2] चोखट ॥
प्रेमसांखरा वाटिती । नेघे त्यांचें तोंडीं माती ॥

---

१ दास. २ गिऱ्हाईक.

समतेचे फणस गरे । आंबे पिकले पडिभरें ॥
नामद्राक्षाचे घड । अपार रस आले गोड ॥
नामा म्हणे भावें घ्यावें । अभक्तांचें मढें जावें ॥

५८. शेतास थोडें बीज नेऊन गाडाभर धान्य परत आणितात.

शेतीं बीज नेतां थोडें । मोटे आणितातीं गाडे ॥
एक्या नामें हरि जोडे । फिटे जन्माचें सांकडें ॥
बाळे भोळे जन । सर्व तरती कीर्तनें ॥
नामा म्हणे नेणे मूढ । नाम स्मरावें सांबडें ॥

५९. नामापुढें सर्वभक्षक अग्नीचें सामर्थ्य चालत नाहीं.

अग्नि जाळी तरी न जळती पांडव । हृदयीं माधव धरिला म्हणोनि ॥
अग्नि जाळी तरी न जळती गोपाळ । हृदयीं देवबोल धरिला म्हणोनि ॥
अग्नि जाळी तरी न जळे हनुमंत । हृदयीं सीताकांत ह्मणोनियां ॥
अग्नि जाळी तरी न जळे प्रल्हाद । हृदयीं गोविंद म्हणोनियां ॥
अग्नि जाळी तरी न जळे पैं सीता । हृदयीं रघुनाथ धरिले म्हणोनि ॥
लंकेसि उरलें बिभीषणाचें घर । हृदयीं सीतावर धरिला म्हणोनि ॥
नामा म्हणे स्वामी स्मरावें गोविंदा । चुके भवबाधा संसाराची ॥

६०. ज्या माउलीच्या ओठांवर विठ्ठलाचें नाम आहे
तिचें पोटीं देव जन्म घेतो.

विठ्ठलाचें नाम जे माउलीचे ओंठीं । विठो तिचें पोटीं गर्भवासीं ॥
जयाचिये कुळीं पंढरीची वारी । विठो त्याचे घरीं बाळलीला ॥
नामा म्हणे जिव्हे काढीन मी रवा । असत्य केशवा वचन होतां ॥

१ जोरानें. २ भोळें.

६१. हरिनामामृतानें वाचेवर बसलेले असत्याचे मळ धुवून जातात.

असत्याचे मळ बैसले ये वाचे। ते न फिटती साचे तीर्थोदकें ॥
हरिनामामृत प्रक्षाळी जिव्हेतें। पाणियें बहुतें काय करितीं ॥
गंगासागरादि तीर्थें कोडिवरी। हरिनामाची सरी न पवती ॥
हरिनामगंगे सुस्नात पैं झाला। नाम्याजवळीं आला केशिराज ॥

६२. नामानें भक्ति जोडते, नामानें कीर्ति वाढते.

नामें सदा शुद्धि प्राणिया होतसे। नामापाशीं असे भक्तिमुक्ति ॥
नामा ऐसें सोपें नाहीं त्रिभुवनीं। नाम संजीवनी[1] साधकांसी ॥
नामें भक्ति जोडे नामें कीर्ति वाढे। नामें सदा चढे मोक्ष हातां ॥
यज्ञदानतप नामें आलीं हातां। नामें सर्व सत्ता प्राप्त होय ॥
नामा म्हणे सदा नाम ज्याचे मुखीं। नाहीं याच्या तुकीं[2] दुजा कोणी॥

६३. तुझें नाम म्हणजे केवळ अमृताची खाणीच होय.

गोक्षीर[3] लाविलें आंधळिया मुखीं। तेथील पारखी जिव्हा जाणे ॥
तैसें देवा तुझें नाम निरंतर। जिव्हेसी पाझर अमृताचे ॥
सोलूनियां केळें साखरें घोळिलें। अंधारीं खादलें तरी गोड ॥
द्राक्षफळां घड सेवितां चोखड। तयाहूनि गोड नाम तुझें ॥
आळूनियां क्षीर तुपाचिये आळें। कालविलें गुळें गोड जैसें ॥
जाणोनियां नामा करी विनवणी। अमृताची खाणी नाम तुझें ॥

६४ नामांत व रूपांत भेद नाहीं.

नाम तेंचि रूप रूप तेंचि नाम। नामरूपा भिन्न नाहीं नाहीं ॥
आकारला देव नामरूपा आला। म्हणोनि स्थापिलें नाम वेदीं ॥

१ जीवन देणारी. २ वजनांत, तुलनेस. ३ गाईचें दूध.

नामापरता मंत्र नाहीं हो आणिक । सांगती ते मूर्ख ज्ञानहीन ॥
नामा म्हणे नाम केशव केवळ । जाणती प्रेमळ भक्त भले ॥

६५. मी निर्विकल्पनाम गाइलें असतां तूं आपोआप मला हुडकीत येशील.

नलगे तुझी मुक्ति नलगे तुझी भक्ति । मज आहे विश्रांति वेगळीच ॥
माझें मज कळलें माझें मज कळलें । माझें मज कळलें प्रेमसुख ॥
न करीं तुझें ध्यान नलगे ब्रह्मज्ञान । माझी आहे खूण वेगळीच ॥
न करीं तुझी स्तुति न वाखाणी कीर्ति । धरिलीसे ते युक्ति वेगळीच ॥
न करी कायाक्लेश इंद्रियां निरोध । माझा आहे बोध वेगळाचि ॥
नामा म्हणे नाम गाईन निर्विकल्प[1] । येसी आपोआप गिंवसीत[2] ॥

६६. तूं लपलास तर तूं आपलें नाम कोठें नेतोस ?

लपालासी तरी नाम कैसें नेसी । आम्हीं अहर्निशीं नाम गाऊं ॥
आम्हांपासूनियां जातां नये तुज । तें हें वर्म बीज नाम घोकूं ॥
आम्हांसी तों तुझें नामचि पाहिजे । मग भेटी सहजें देणें लागे ॥
भोळीं भक्तें आम्हीं चुकलों होतों वर्म । सांपडलें नाम नामयासी ॥

६७. देह जावो अथवा राहो, पांडुरंगीं दृढभाव ठेवावा.

देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥
चरण न सोडीं सर्वथा । तुझी आण पंढरीनाथा ॥
वदनीं तुझें मंगळ नाम । हृदयीं अखंडित प्रेम ॥
नामा म्हणे केशवराजा । केला नेम चालवी माझा ॥

---

१ कल्पना टाकून. २ शोधीत.

### ६८. तुझ्या नामाच्या अनुसंधानानें असतां प्रारब्ध भोगणें गोड वाटतें.

देवा माझें मन आणि तुझे चरण। एकत्र करोनि दिधली गांठी ॥
होणार तें हो गा सुखें पंढरिनाथा। कासया शिणतां वायांवीण ॥
माझिया अदृष्टीं[1] ऐसेंचि पैं आहे। सेवावे तुझे पाय जन्मोजन्मीं ॥
असतां निरंतर येणें अनुसंधानें। प्रारब्ध भोगणें गोड वाटे ॥
हृदयीं तुझें रूप वदनीं तुझें नाम। बुद्धि हे निष्काम धरिली देवा ॥
नामा म्हणे तुझीं पाऊलें चिंतितां। झाली कृतकृत्यता जन्मोजन्मीं ॥

### ६९. अखंड खंडेना असा जप कर.

धरीं रे मना तूं विश्वास या नामीं। अखंड रामनामीं ओळखी धरीं ॥
जप करीं ऐसा अखंड खंडेना। निशिदिनीं मना होय जागा ॥
नामा म्हणे मना होईं रामरूप। अखंडित जप सोहं सोहं ॥

### ७०. केशवाचें नाम घेशील तरच तूं वैष्णव होशील.

वेदाध्ययन करिसी तरि वैदिकचि होसी।
परि वैष्णव न होसी अरे जना ॥
गायन करिसी तरी गुणिजन होसी।
परि वैष्णव न होसी अरे जना ॥
पुराण सांगसी तरी पुराणिकचि होसी।
परि वैष्णव न होसी अरे जना ॥
कर्म आचरसी तरी कर्मठचि होसी।
परि वैष्णव न होसी अरे जना ॥

---

१ प्रारब्ध.

यज्ञ करिसी तरि याज्ञिकचि होसी ।
परि वैष्णव न होसी अरे जना ॥
तीर्थ करिसी तरी कांपडीच[1] होसी ।
परि वैष्णव न होसी अरे जना ॥
नामा म्हणे नाम केशवाचें घेसी ।
तरीच वैष्णव होसी अरे जना ॥

७१. तूं केशवाचें ध्यान करशील तर तूं केशवच होशील.

पृथ्वी ध्यासी तरी पृथ्वीचि होसी । केशव न होसी अरे मना ॥
आपें[2] ध्यासी तरी आपाचि होसी । केशव न होसी अरे मना ॥
वायु ध्यासी तरी वायुचि होसी । परि केशव न होसी अरे मना॥
आकाश ध्यासी तरी आकाशचि होसी । परि केशव न होसी अरे मना ॥
नामा म्हणे जरी केशवासी ध्यासी । तरी केशवचि होसी अरे मना॥

७२. नारायणास मनीं दृढ धरण्याबद्दल मी लहानथोरांची प्रार्थना करित आहे.

ब्राह्मणां न कळे आपुलें तें वर्म । गंवसे[3] परब्रह्म नामें एका ॥
लहान थोरांसी करितों प्रार्थना । दृढ नारायणा मनीं धरा ॥
सर्वांप्रति माझी हेंचि पैं विनंति । आठवा श्रीपति आपुले मनीं ॥
केशव नारायण करावें आचमन । तेंचि संध्यास्नान कर्म तया ॥
नामा म्हणे हेंचि करा नित्य भजन । ब्रह्मार्पण साधन याचे पायीं॥

---

१ यात्रेकरु. २ पाणी, जल. ३ सांपडणें.

## ७३. जपतपध्यानापेक्षां भक्ति श्रेष्ठ आहे.

भाक्तिप्रतापें पावलों मी सुपंथ। सफळ निश्चित परमार्थ ॥
देव सर्वांभूतीं असतां प्रगट। निर्वाणीं चोखट भक्ति जाण ॥
धरूनियां मनीं जपसील नाम। तेणें निजधाम पावसील ॥
जप तप ध्यान नलगे साधन। भक्ति ते कारण नामा म्हणे ॥

## ७४. प्रेमाच्या जिव्हाळ्यानें काया पालटून कैवल्य मिळेल.

अभ्यासिले वेद झाला शास्त्रबोध। साधिल्या विविध नाना कळा ॥
प्रेमाचा जिव्हाळा जंव नाहीं अंतरीं। तंव कैसा श्रीहरि करील कृपा॥
हित तें आचरा हित तें विचारा। नामीं भाव धरा जाणतेनो ॥
अनंत ह्या मूर्ति पाहिल्या लोचनीं।त्यांतील कोण ध्यानीं प्रतिबिंबली॥
स्वप्नींच्या परी देखसी आभास। न धरीच विश्वास चित्त तुझें॥
दृष्टीचें देखणें श्रवणींचें ऐकणें। मनाचें बैसणें एक होय ॥
नामा म्हणे तरी विठो येऊनि भेटे। कायाच पालटे कैवल्य होय॥

## ७५. प्रेमावांचून कीर्तनाचा काय उपयोग?

चंद्रसूर्यादि बिंबें लिहिताती सांग। परि प्रकाशाचें अंग लिहितां न ये ॥
संन्याशाचीं सोंगें आणिताती सांग। परि वैराग्याचें अंग आणितां न ये ॥
नामा म्हणे कीर्तन करिताती सांग। प्रेमाचे तें अंग आणितां न ये ॥

---

१ ओंलावा.

७६. माझ्या मनानें गोपाळ धरला आहे तो तें सोडीतच नाहीं.

बेडूक म्हणजे चिखलाचा भोक्ता। क्षीर सांडूनि रक्ता गोचिड झोंबे॥
जयाची वासना तयासीच गोड । प्रेमसुखचाड नाहीं तया ॥
वांझ म्हणे मी वाढविते जोझार[1]। उघडावया कैवाड नाहीं कोणी॥
अस्वलाचे तेल माखियेलें कानीं। तें म्हणे रानीं थोर सुख ॥
स्वामीचिया कानीं खोंविली लेखणी। ते घेत असे धणी घरोघर॥
गाढवासी लाविली तूप पोळी डाळ। भुंके आळोआळ लाज नाहीं॥
सूकरा[2] कस्तूरी चंदन लाविला। तो तेथोनि पळाला विष्ठा खाया ॥
नामा म्हणे माझें मन हें बोळलें। धरिलासे गोपाळ सोडीचिना॥

७७. अन्न उदक सोडून स्त्रीपुत्रांचा विसर पडून तुझें ध्यान लागो इतकेंच मला दे.

हातीं वीणा मुखीं हरी। गाये राउळीं[3] भीतरीं ॥
अन्न उदक सोडिलें। ध्यान देवाचें लागलें ॥
स्त्रीपुत्र बापमाय। यांचा आठव न होय ॥
देहभाव विसरला। छंद हरीचा लागला ॥
नामा म्हणे हेंचि देई । तुझे पाय माझे डोई ॥

७८. हातीं वीणा घेऊन राउळांत उभ्यानें कीर्तन करावें इतकेंच मला दे.

विणा घेउनियां करीं। उभा राउळामाझारीं ॥
तहान भूक हारपली। छंद लागला विठ्ठलीं ॥
कन्या पुत्र बाप माय। त्यांचा आठव तो न ये ॥
नामा म्हणे हेंचि देई। तुझे पाय माझे डोई ॥

---

१ भार. २ डुक्कर. ३ देउळांत.

७९. माझ्या वाचेस, श्रवणास, अगर दृष्टीस तुझ्यावांचून दुसरा विषयच नाहीं.

श्रीहरि श्रीहरि ऐसें वाचे म्हणेन ।
वाचा धरिसी तरी मी श्रवणीं ऐकेन ॥
श्रवणीं दाटसी तरी मी नयनीं पाहीन ।
ध्यानीं मी ध्याईन जेथें तेथें ॥
जेथें जायें तेथें लागला हा आम्हां ।
न संडीं तुझें वर्म म्हणे नामा ॥

८०. काळ देहास खाण्यास आला असतां आम्हीं आनंदानें गाऊं नाचूं.

काळ देहासी आला खाऊं । आम्हीं आनंदें नाचूं गाऊं ॥
कोणें वेळें काय गाणें । हें तों भगवंता मी नेणें ॥
टाळ मृदंग दक्षिणेकडे । माझें गाणें पश्चिमेकडे ॥
नामा म्हणे बा केशवा । जन्मोजन्मीं द्यावी सेवा ॥

## ४. उपदेश.

८१. सर्वांगसाजिरीं इंद्रियें आहेत तोंपर्यंतच सावधान हो.

सर्वांगसाजिरीं[1] आहेतीं इंद्रियें । तंव सावध होय हरिकथे ॥
कीर्तन नर्तन वाचे जनार्दन । न पवसी पतन येरझारीं[2] ॥

---

१ सुशोभित, टवटवीत. २ जन्ममरणाच्या खेपा.

पूर्ण मनोरथ घडती एका नामें । दाटेल सप्रेमें जीवनहेतु ॥
नामा म्हणे विलास न करी तूं आणिक । सर्वां सर्वां एक नाम असे ॥

## ८२. संसारसागरांतून विवेकानें पोहणारा विरळा.

संसारसागर भरला दुस्तर । विवेकी पोहणार विरळा[1] संत ॥
कामाचिया लाटा अंगीं आदळती । नेणों गेले किती पोहोनियां ॥
भ्रम हा भोंवरा फिरवी गरगरा । एक पडिले घरा चौऱ्यांशींच्या ॥
नावाड्या विठ्ठल भवसिंधु तारूं । भक्तां पैलपारू उतरितो ॥
नामा म्हणे नाम स्मरा श्रीरामाचें । भय कळिकाळाचें नाहीं तुम्हां ॥

## ८३. संसार करीत असतां परमार्थाचें वर्म सांपडणें शक्य नाहीं.

संसार करितां देव जैं सांपडे । तरि कां झाले वेडे सनकादिक ॥
संसारीं असतां जरी देव भेटतां । शुकदेव कासया जातां तयालागीं ॥
घराश्रमीं[2] जरी जोडे परब्रह्म । तरि कां घराश्रम त्याग केला ॥
ज्ञातीच्या आचारें सांपडे जरी सार । तरि कां निरहंकार झाले साधु ।
नामा म्हणे आतां सकळ सांडोन । आलोंसे शरण विठोबासी ॥

## ८४. जवळ क्षीर असतां गोचिडाप्रमाणें रुधिराचें सेवन कां करितोस ?

परब्रह्मींची गोडी नेणतीं तीं बापुडीं । संसारसांकडीं विषयभरित ॥
तूंतें चुकली रे जगजीवनरक्षा । अनुभवावीण लक्षा नयेचि रे कोणा ॥
जवळीं असतांचि क्षीर नव्हेसी वरपडा[3] । रुधिरें[4] सेवितां गोचिडा जन्म गेला ॥
दर्दुरा[5] कमळिणी एके ठायीं बिढारें[6] । वास तो मधुकरें[7] घेवोनि गेला ॥

---

१ एकादा. २ गृहस्थाश्रम. ३ प्राप्त. ४ रक्त. ५ बेडूक. ६ वस्ति. ७ भ्रमर.

मधुमक्षियां मोहोळ रचितां रात्रंदिवस। भाग्यवंत रस घेउनि गेला॥
शेळीस घातली उसांची वैरणी। घेऊं नेणे धणी त्या रसाची॥
नामा म्हणे ऐसीं चुकलीं बापुडीं। अमृत सेवितां पुढीं चवी नेणे॥

## ८५. सर्वेश्वरावर लक्ष ठेवून कोणताही व्यापार कर.

वावडी[1] दुरीच्या दुरी उडतसे अंबरीं। हातीं असे दोरी परि लक्ष तेथें॥
दुडी[2] वरि दुडी पाण्या निघाली गुजरी[3]। चाले मोकळ्या करीं परि लक्ष तेथें॥
व्यभिचारी नारी परपुरुष जिव्हारीं[4]। वर्ते घराचारीं[5] परि लक्ष तेथें॥
तस्कर[6] नगरीं परद्रव्य जिव्हारीं। वर्ते घरोघरीं परि लक्ष तेथें॥
धनलोभ्यानें धन ठेवियेलें दुरी। वर्ते चराचरीं परि लक्ष तेथें॥
नामा म्हणे असावें भलतियां व्यापारीं। लक्ष सर्वेश्वरीं ठेऊनियां॥

## ८६. कलियुगींच्या अधर्माचा महिमा.

ऐका कलियुगींचा आचार। अधर्मपर झाले नर॥
मंचकावरि बैसे राणी। माता वाहतसे पाणी॥
स्त्रियेसी अलंकार भूषण। माता वळीतसे शेण॥
स्त्रियेसी पाटावाची[7] साडी। माता नेसे चिंध्या लुगडीं॥
सासुसासऱ्यां योग्य मान। मायबापां न घाली अन्न॥
म्हणे विष्णुदास नामा। ऐसा कलियुगींचा महिमा॥

## ८७. पोट माझी माता, पोट माझा पिता.

वीतभर पोट लागलेंसे पाठीं। साधुसंगें गोष्टी सांगूं न देई॥
पोट माझी माता पोट माझा पिता। पोटानें ही चिंता लाविलीसे॥

१ पतंग. २ कळशी व घागर यांची जोडी. ३ गुजराथी स्त्री. ४ अंतःकरणांत.
५ घरांतील धंदा. ६ चोर. ७ रेशमी उंची वस्त्र.

पोट माझा बंधु पोट माझी बहीण। पोटानें हें दैन्य मांडिलेंसे ॥
विष्णुदास नामा पोटाकडे पाहे। अझून किती ठाये हिंडविसी ॥

## ८८. संगतीचा परिणाम.

बहुरूप्या ब्राह्मणा पडियेलें मैत्र। दोहींचें तें गोत्र एक झालें ॥
वेश्या पतिव्रते पडियला शेजार। दोहींचा आचार एक झाला ॥
संग तोचि बाधी संग तोचि बाधी। कुसंग तो बाधी नारायणा॥
नामा विष्णुदासा सत्संगती बोधिला। आत्मा हा लाधला पांडुरंग ॥

## ८९. प्रारब्धाचें सामर्थ्य.

कृष्ण सहाय पांडवांसी। ते भोगिती नष्टचर्यासी।
साह्य केले हरिहरासी। प्रारब्ध कोणासी टळेना ॥
ऐसी प्रारब्धाची ठेव। झाले भिक्षुक पांडव।
राज्य घोडे भाग्य सर्व। सांडियेला ठाव[1] प्रारब्धें ॥
शरीर संचिता आधीन। धर्मराज हिंडे वन।
कर्में बुडाला रावण। आणि दुर्योधन प्रारब्धें ॥
अभिमानें शिशुपाळ। कृष्णहस्तें झाला काळ।
यादव निमाले सकळ। केले निर्मूळ प्रारब्धें ॥
कर्मरेखा टळेना। बाण लागला जगज्जीवना।
कृष्णें सांडिल्या गोपांगना। हें नारायणा प्रारब्ध ॥
कामबुद्धीचें सुख। अति मानिती ते मूर्ख।
चंद्रासी लागला कलंक। इंद्रासी दुःख[2] प्रारब्धें ॥
हरिश्चंद्र तारामती। घोर जन्मांतर भोगिती।

१ ठिकाण. २ दुर्दैव.

नळराव पुरुषार्थी । तयाच्या विपत्ति प्रारब्धें ॥
पतिव्रता सुशीळ । दमयंती पायें पोळे ।
ऐसें अनिवार कपाळ । भोगी दुष्काळ प्रारब्धें ॥
ऐसीं अनिवार जन्मांतरें । राज्य सांडिलें रघुवीरें ।
सवें मेळवूनि वानरें । फिरवी दिगांतरें प्रारब्धें ॥
फिरत असतां काय झालें । पुढें प्रारब्ध ओढवलें ।
जानकीस राक्षसें नेलें । कष्ट भोगविलें प्रारब्धें ॥
कर्मा आधीन शरीर । पूर्ण ब्रह्म रामचंद्र ।
रघुपति विष्णूचा अवतार । पाठीं जन्मांतर नामा म्हणे ॥

## ९०. चोर शूळाकडे जात असतां पावलोंपावलीं त्यास मृत्यु सन्मुख येतो.

चोरां ओढोनियां नेईजे जैं शूळीं । चालतां पाउलीं मृत्यु जैसा ॥
तैसी परी मज झाली नारायणा । दिवसें दिवस उणा होत असे ॥
वृक्षाचिये मुळीं घालितां कुऱ्हाडी । वेंचे तैसी घडी[1] आयुष्याची ॥
नामा म्हणे हेंही लहरीचें जळ । आटत सकळ भानुतेजें ॥

## ९१. पायांस स्वर्ग लागो, अगर अंगावर अग्नि पडो, आत्मस्थितीचा भंग होऊं देऊं नये.

निद्रिस्ताचे सेजे सर्प कां उर्वशी । पाहों विषयासी तैसें आम्हीं ॥
ऐसी कृपा केली माझ्या केशिराजें । प्रतीतीचें[2] भोजें[3] एकसरां ॥
शेण आणि सोनें भासतें समान । रत्न कां पाषाण एकरूप ॥
पायां लागो[4] स्वर्ग वरि पडो आग । आत्मस्थिति भंग नोहे नोहे ॥
नामा म्हणे कोणी निंदा आणि वंदा । झालों ब्रह्मानंदाकार आम्हीं ॥

---

१ घटका. २ अनुभव. ३ कौतुक, मोठेपणा. ४ प्राप्त होवो.

### ९२. आमच्या कर्माकडे दोष असून, नारायणा, तुझ्याकडे शब्द नाहीं.

पापाचें संचित देहासी दंडण । तुज नारायणा बोल नाहीं ॥
सुख अथवा दुःख भोगणें देहासी । सोस वासनेसी वाउगाचि[1] ॥
पेरी कडु जीरें इच्छी अमृतफळ । अर्कवृक्षा[2] केळीं केविं येती ॥
मुसळाचें धनु न होय सर्वथा । पाषाण पिळितां रस कैंचा ॥
नामदेव म्हणे देवा कां रुसावें । मनाला पुसावें आपुलिया ॥

### ९३. श्रीमुख हृदयांत बिंबेल तरच देहबुद्धि पालटेल.

सांवळी श्रीमूर्ति हृदयीं बिंबली । तरी पालटली देहबुद्धि ॥
धन्य माझा जन्म धन्य माझा भाव । ज्यानीं केशिराज नांदतसे ॥
आशा तृष्णा कैशा मावळल्या देहीं । बुडोनियां पायीं ठेलें चित्त ॥
नामा म्हणे ऐसी विश्रांति पैं झाली । हृदयीं न्याहाळी केशिराज ॥

### ९४. दगडाचा देव व मायेचा भक्त या उभयतांचा संदेह कशानें फिटणार ?

देव दगडाचा भक्त हा मायेचा । संदेह दोघांचा फिटे कैसा ॥
ऐसे देव देही[3] फोडिले तुरकीं[4] । घातले उदकीं बोभातीना[5] ॥
ऐसीं लोहदैवतें[6] नको दावूं देवा । नामा म्हणे केशवा विनवीतसें ॥

### ९५. सजीव तुळस तोडून निर्जीव दगडाची पूजा कां करतोस ?

पोटीं अहंतेसी ठाव । जिव्हे सकळ शास्त्रांचा सराव ॥
भजन चालिलें उफराटें । कोण जाणे खरें खोटें ॥

---

१ व्यर्थ. २ रुईचें झाड. ३ देहधारी, सगुण. ४ मुसलमान. ५ ओरडणें. ६ लोखंडादिक धातूंची.

सजीवासी हाणी लाथा। निर्जीवपायीं ठेवीं माथा ॥
सजीव तुळसी तोडा। पूजा निर्जीव दगडा ॥
बेला करी नोडातोडी। शिवा लाखोली रोकडी ॥
तोंड धरून मेंढा मारा। म्हणती सोमयाग करा ॥
सिंदूर माखूनियां धोंडा। त्यासि भजती पोरें रांडा ॥
अग्निहोत्राचा सुकाळ। कुशपिंपळाचा काळ ॥
मृत्तिकेची पूजा नागा। जित्या नागा घेती डांगा[1] ॥
नामा म्हणे अवघें खोटें। एक हरिनाम गोमटें ॥

९६. मनाचा आरसा निर्मळ करून तूं त्यांत आपलें रूप पहा.

भुजंग विखारें[2] पवनाचा आहार। परि योगेश्वर म्हणों नये ॥
पवनाच्या अभ्यासें काया पालटी। परि तो वैकुंठीं सरता[3] नव्हे ॥
शुद्ध करी मन समता धरोनि ध्यान। तरीच भवबंधन तुटेल रे ॥
पवित्र गंगाजळ मीन[4] सेवी निर्मळ। परि दुष्ट केवळ कर्म त्याचें ॥
अवचितां हेतु सांपडला गळीं। न सुटे तयेवेळीं तीर्थोदकें ॥
घर सांडोनियां वन सेवितातीं। वनीं कां नसती रीसें[5] व्याघ्र ॥
काम क्रोध लोभ न संडवे मनीं। असोनियां वनीं कोण काज ॥
बहुरूप्याचा नटा माथां भार जटा। भस्म राख सोटा हातीं दंड ॥
धोती पोति[6] कर्मावेगळा आंदेसें[7]। हुंबरत असे अंगबळें ॥
त्रिपुंड्र टिळे अंगीं चंदनाची उटी। घालोनियां कंठीं तुळसीमाळा ॥
व्यापक हा हरि न धरिती चित्तीं। लटकियाची गती गातु असे ॥
मीतूंपण जरी हीं दोन्हीं सांडीं। राखिसी तरी शेंडी हेंचि कर्म ॥
मानसीं तूं मुंडीं देहभाव सांडी। वासनेसी दंडी आत्ममयें[8] ॥

१ काठी. २ विष. ३ मान्य. ४ मासा. ५ अस्वल. ६ योगांतील क्रिया. ७ आदेश. ८ आत्मरूप होऊन.

मन हें दर्पण[1] करोनि निर्मळ। पाहें पां केवळ आत्मा स्वयें ॥
तुझा तूं केवळ तुजमाजी पाहीं। नामा म्हणे ध्यायी केशिराजु ॥

९७. जोंपर्यंत विषयावर मन विटलें नाहीं तोंपर्यंत नित्यसुख कसें सांपडणार ?

देहाचें ममत्व नाहीं जों तुटलें। विषयीं विटलें मन नाहीं ॥
तंव नित्य सुख कैसेंनि आतुंडे[2]। नेणती बापुडे प्रेमसुख ॥
मीच एक भक्त मीच एक मुक्त। म्हणवी पतित दुराचारी ॥
नामा म्हणे तुझे कृपेंविण देवा। केंवि जोडे ठेवा विश्रांतीचा ॥

९८. मांजरानें उपवास केला तरी त्यास पारण्यास उंदीर पाहिजे.

मांजरें केली एकादशी। ईळवर[3] होतें उपवासी।
यत्न करितां पारण्यासी। धांऊनि गिंवसी[4] उंदिरू ॥
लांडगा बैसला ध्यानस्थ। तोंवरि असे निवांत।
जंव पेट सुटे जीवांत। मग घात करी वत्साचा ॥
श्वान गेलें मलकार्जुना। देह कवंतीं घातलें जाणा।
आलें मनुष्यदेहपणा। परी खोडी न संडी आपुली ॥
श्वानें देखिला स्वयंपाक। जोंवरि जागे होते लोक।
मग निजलिया निःशंक। चारी मडकीं फोडिलीं ॥
वेश्या झाली पतिव्रता। तिचा भाव असे दुश्चिता।
तिसी नाहीं आणिक चिंता। परद्वारावांचुनी ॥
दात्यानें केली समाराधना। बहुत लोक जेविले जाणा।
परि न संडी वोखटी वासना। खटनेंट[5] चाळितसे[6] ॥

---

१ आरसा. २ सांपडणें. ३ आतांपर्यंत, इतका वेळ. ४ हुडकणें. ५ वाईट साईट. ६ गाळणें.

ऐशा प्रकारच्या भक्ती। असती त्या नेणों किती।
एक ओळगा लक्ष्मीपती। म्हणे विष्णुदास नामा॥

९९. वेश्या पाटाची राणी झाली तरी तिला मागील करणी आठवतेच.

डोई बोडून केली खोडी। काया वागविली बापुडी॥
ऐसा नव्हे तो संन्यास। विषय देखोनि उदास॥
मांजराचे गेले डोळे। उंदीर देखोनि तळमळे॥
वेश्या झाली पाटाची राणी[1]। तिला आठवे मागील करणी॥
नामा म्हणे वेष पालटे। परि अंतरीचें ओसपण न तुटे॥

१००. लावण्यानें सुंदर व रूपानें बरवी असलेल्या पापिणीचें तोंड पाहूं नये.

लावण्य सुंदर रूपानें बरवी। पापीण जाणावी ते कामिनी॥
देखतां होतसे संगाची वासना। भक्ताच्या भजना नाश होये॥
ऐसी जे घातकी जन्म कासयाची। चांडाळीण तिसी नरक प्राप्त॥
नामा म्हणे तिचें पाहूं नये तोंड। पापीण ते रांड बुडवी नरा॥

१०१. जिचें रूप अतिहीनवर अशा परोपकारी माउलीचे चरण वंदावे.

कायारूप जिचें हिनवट[2] अती। माउली धन्य ती आहे नारी॥
तियेवरी मन कदापि नव जाये। भजना न होये कदा चळ॥
ऐसिये माउली परउपकारी। घात हा न करी भजनाचा॥
नामा म्हणे तिचे चरण वंदावे। वदन पहावें माउलीचें॥

---

१ पदाभिषिक्त राणी. २ हीन.

### १०२. विषयसंगानें इंद्राअंगीं सहस्रभगें पडलीं आहेत.

संग खोटा परनारीचा । नाश होईल या देहाचा ॥
रावण प्राणासी मुकला । भस्मासुर भस्म झाला ॥
गुरुपत्नीशीं रतला । क्षयरोग त्या चंद्राला ॥
इंद्राअंगीं सहस्रभगें । नामा म्हणे विषयासंगें ॥

### १०३. जोंपर्यंत कामिनीकटाक्षबाण लागले नाहींत तोंपर्यंतच वैराग्याच्या गोष्टी !

तोंवरि रे तोंवरि वैराग्याचें ठाण । जंव कामिनीकटाक्षबाण लागले नाहीं ॥
तोंवरि रे तोंवरि आत्मज्ञानबोध । जोंवरि अंतरिं कामक्रोध उठले नाहीं ॥
तोंवरि रे तोंवरि निराभिमान । जंव देहा अपमान झाला नाहीं ॥
नामा म्हणे अवघी बचबच गाळी । विरळा तो जाळी द्वैतबुद्धी ॥

### १०४. संकल्पस्वरूपे वासने, तूं मला सोडणार नाहींस तर केशिराज मला सोडवितील.

परियेसि वासने संकल्पस्वरूपे । विश्व त्वां आटोपें वश केलें ॥
ब्रह्मादिक तुझे इच्छेचें खेळणें । विषयाकारणें लोलिंगत ॥
परि माझ्या मना सांडीं वो समर्थे । देईं मज दीनातें कृपादान ॥
वेदशास्त्रवक्ते व्युत्पन्न थोरले । तृणापरिस केले हळुंवट ॥
कृपणाचे द्वारीं होऊनि याचक । विसरले सकळिक आत्महित ॥
एकांतें लाविला पुत्रकलत्रधंदा । नेणती ते कदां सुखगोष्टी ॥
जन्ममरणाचे जुंपियेले पांतीं । आकल्प भोगिती नाना योनी ॥
ऐसे तुझे संगें बहु झाले हिंपुटी । म्हणोनि पाडिली तुटी संतसंगा
नामा म्हणे पुढती गांजिसील मज । येईल केशिराज सोडवणें ॥

---

१ स्थिति. २ आसक्त. ३ विद्वान्. ४ हलकट. ५ पंगत. ६ खिन्न.

## १०५. एकावांचून एक कोणत्या गोष्टी शोभा पावत नाहींत ?

त्यागेंविण विरक्ति प्रेमावांचूनि भक्ति ।
शांति नसतां ज्ञप्ति[1] शोभा न पवे ॥
दमनेवांचूनि यति मानाविण भूपति ।
योगी नसत युक्ति शोभा न पवे ॥
बहिर्मुख लावी मति नेमावांचूनि वृत्ति ।
बोधेंविण महंती शोभा न पवे ॥
अनधिकारी व्युत्पत्ति गुरु तो कनिष्ठ याती ।
माता नीच शिश्नवृत्ति शोभा न पवे ॥
हेतूवांचूनि प्रीति गुणरहित स्तुति ।
करणीवांचूनि कीर्ति शोभा न पवे ॥
सत्समागमसंगति बाणली नसतां चित्तीं ।
नामा म्हणे क्षितीं शोभा न पवे सर्वथा ॥

## १०६. दुर्लभ द्वंद्वें.

सुवर्ण आणि परिमळ । हिरा आणि कोमळ ।
योगी आणि निर्मळ । हें दुर्लभ जी दातारा ॥
देव जरी बोलता । जरी कल्पतरू चालता ।
गज जरी दुभता । हें दुर्लभ जी दातारा ॥
धनवंत आणि दयाळु । व्याघ्र आणि कृपाळु ।
अग्नि आणि सीतळु । हें दुर्लभ जी दातार ॥
सुंदर आणि पतिव्रता । सावधान होय श्रोता ।
पुराणिक आणि ज्ञाता । हें दुर्लभ जी दातारा ॥
क्षत्रिय आणि शूर भला । चंदन फुलीं फुलला ।
स्वरूपी[2] गुणव्यापिला[3] । हें दुर्लभ जी दातारा ॥

---

१ ज्ञान. २ सुरूप. ३ गुणयुक्त.

ऐसा संपूर्ण सर्वगुणीं। केविं पाविजे शारंगपाणी।
विष्णुदास नामा करी विनवणी। मुक्ति चरणीं त्याचिया॥

१०७. देवास मागणें.

तुझें नित्य सुख ध्यावें येणें मनें। असावें संधानें चरणाचेनि॥
वासनेविरहित होऊनि एकवट। असावें निकट संतसंगें॥
ऐशी मज कृपा करीं गा विठ्ठला। म्हणविसी आपुला दास जरी॥
श्रवणीं तुझें नाम ऐकावें आवडी। चित्तें देउनि बुडी प्रेमडोहीं॥
नयनीं तुझें रूप देखावें सर्वत्र। व्हावे भूतमात्र सखे माझे॥
वदनीं तुझें नाम गावें निर्विकल्प। धरोनि तुझें रूप हृदयकमळीं॥
काया संतांपायीं जावी लोटांगणीं। तें भाग्य अनुदिनीं देईं बापा॥
हेंचि माझें व्रत हेंचि तपतीर्थ। करावें दास्यत्व संतांचें हें॥
अनुदिनीं व्हावा संतांचा हा संग। असावा अनुराग कीर्तनाचा॥
मानाचा मज ओसं[१] अपमानीं उल्हास। देईं तुझा ध्यास सर्वकाळ॥

---

# ५. संतमहिमा.

१०८. साधूंचीं लक्षणें.

सर्वांभूतीं पाहे एक वासुदेव। पुसोनियां[२] ठाव अहंतेचा॥
तोचि संत साधु ओळखावा निका। येर ते आइका मायाबद्ध॥
देखिलिया धन मृत्तिकेसमान। नवविधारत्न जैसे धोंडे॥

१ उदासपणा. २ नाहींसा करणें.

काम क्रोध दोघे घातले बाहेरी। शांति क्षमा घरीं राबवीत ॥
नामा म्हणे नाम गोविंदाचें वाचे। विसंबेना त्याचे क्षणमात्र ॥

१०९. मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः।

जैसा वृक्ष नेणे मान अपमान। तैसे ते सज्जन वर्तताती ॥
येऊनियां पूजा प्राणी जे करीती। त्याचें सुख चित्तीं तयां नाहीं ॥
अथवा कोणी प्राणी येऊनि तोडिती। तयां न म्हणती छेदूं नका ॥
निंदास्तुति सम मानिती जे संत। पूर्ण धैर्यवंत साधु ऐसे ॥
नामा म्हणे त्यांची जरी होय भेटी। तरी जीवा शिवा गांठी पडुनि जाय।

११०. वैष्णवांच्या कुळींचा कुळधर्म.

आम्हां वैष्णवांचा कुळधर्म कुळींचा। विश्वास नामाचा सर्वभावें ॥
तरी त्याचे दास म्हणतां श्लाघिजे। निर्वासन कीजे चित्त आधीं ॥
गाऊं नाचूं आम्हीं आनंदें कीर्तनीं। भक्ति मुक्ति दोन्ही मागूं देवा ॥
वृत्तिसहित मन बुडे प्रेमडोहीं। नाठवती देहीं देहभाव ॥
सगुणीं निर्गुणीं एकच आवडी। मनें दिली बुडी चिदाकाशीं ॥
नामा म्हणे देवा ऐसी मज सेवा। द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ॥

१११. खऱ्या भक्ताच्या योगानें तिन्ही लोक पावन होतात.

निंदील हें जन सुखें निंदूं द्यावें। सज्जनीं क्षोभावें न ये बापा।
निंदा स्तुति ज्याला समान पैं झाली। त्याची स्थिति आली समाधीला ॥
शत्रुमित्र ज्याला समसमानत्वें। तोचि पैं देवातें आवडला ॥

१ विसर पावणें. २ आनंद पावणें.

माती आणि सोनें ज्या भासे समान। तो एक निधान योगिराज ॥
नामा म्हणे ऐसे भक्त जे असती। तेणें पावन होती लोक तीन्ही ॥

११२. संताच्या संगतीनें अधमासही काळांतरीं गति मिळेल.

कडु वृंदावन साखरें घोळिलें। तरी काय गेलें कडूपण ॥
तैसा तो अधम करो तीर्थाटण। नोहे त्याचें मन निर्मळत्व ॥
बचनाग रवा दुग्धीं शिजविला। तरी काय गेला त्याचा गुण ॥
नामा म्हणे संतसज्जनसंगतीं। ऐशासही गती काळांतरीं ॥

११३. संतांचे चरण देखिल्यास कल्पकोटी पापराशी दग्ध होतील.

संताचें लक्षण ओळखावया खूण। जो दिसे उदासीन देहभावा ॥
सतत अंतरीं प्रेमाचा जिव्हाळा¹। वाचे वसे चाळा रामकृष्ण ॥
त्या संताचे चरण देखिले म्या दृष्टीं। जळती कल्पकोटी पापराशी ॥
जयांच्या हृदयीं प्रेमाचा जिव्हाळा। जीवेंभावें गोपाळा न विसंबती॥
त्यांचे अंगणींचा होईन सांडोवा²। मग तूं केशवा नुपेक्षिसी ॥
तुझ्या ध्यानीं ज्यांचें सदा भरलें मन।विश्व तूंचि म्हणोन भजती भावें
त्यांच्या उष्टावळीचा होईन मागता। तरीच पंढरीनाथा भेटी देसी॥
ऐसें नित्यानंदें बोधें जे निवाले। ते जिवावेगळे न करी नाम्या ॥

११४. दुराचारी असला तरी तो संतकृपेनें लवकर उद्धरतो.

ब्रह्ममूर्ति संत जगीं अवतरले। उद्धरावया आले दीन जनां ॥
ब्रह्मादिक त्यांचे वंदिती पायवणी³।नाम घेतां वदनीं दोष जाती ॥
हो कां दुराचारी विषयीं आसक्त। संतकृपें त्वरित उद्धरतो ॥
अखंडित नामा त्यांची वास पाहे। निशिदिनीं ध्याये सत्संगती ॥

---

१ ओलावा. २ पाण्याचा पाट, ओंवाळन टाकलेला पदार्थ. ३ चरणतीर्थ.

११५. बोधसाबणानें संतरूपी परीट पापाचे डाग उडवितात.

आह्मीं परीट चोखट । शुद्ध केलें खटनट ॥
बोधसाबण लावुनी ठायीं । डाग उडाविला पाहीं ॥
शांतिशिळेवरी धुतलें । ज्ञानगंगे निर्मळ झालें ॥
परब्रह्म होउनि ठेलों । नामा ह्मणे सुखरूप झालों ॥

११६. कृपा करून अशा जीवास, केशवा, तूं सोडीव.

आतां आहे नाहीं पहातां क्षण एक । संपत्तीचें सुख विषय हा ॥
हित तें आचरा हित तें विचारा । नामीं भाव धरा जाणतेनो ॥
संपत्तीच्या बळें एक झाले आंधळे । वेढिलें कळिकाळें स्मरण नाहीं
एक विद्यावंत जातीच्या अभिमानें । नेले तमोगुणें रसातळा ॥
मिथ्या माया मोह करोनि हव्यास । वेंचिलें आयुष्य वायांविण ॥
नामा ह्मणे कृपा करूनि ऐशा जीवा । सोडवी केशवा मायबापा ॥

११७. हरिदासांना आकल्प आयुष्य व्हावें.

आकल्प आयुष्य व्हावें तयां कुळां । माझिया सकळां हरिच्या दासां ॥
कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं । ही संतमंडळी सुखी असो ॥
अहंकाराचा वारा न लागो राजसां[1] । माझ्या विष्णुदासां भाविकांसी ॥
नामा ह्मणे तयां असावें कल्याण । ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥

११८. एकमेकांस सावध करून नामाचें अनुसंधान आम्हीं तुटूं देणार नाहीं.

दुर्लभ नरदेह झाला तुम्हां आम्हां । येणें साधूं प्रेमा राघोबाचा ॥
अवघे हातोहातीं तरों भवसिंधू । आवडी गोविंदु गाऊं गीतीं ॥

---

१ सुकुमार.

हिताचिया गोष्टी सांगूं एकमेकां । शोक मोह दुःखा निरसूं[1] तेणें ॥
एकमेकां करूं सदा सावधान । नामीं अनुसंधान तुटों नेदूं ॥
घेऊं सर्वभावें रामनामदीक्षा । विश्वासें सकळिकां हेंचि सांगों ॥
नामा म्हणे शरण रिघों पंढरिनाथा । नुपेक्षी सर्वथा दीनबंधु ॥

### ११९. साधु हे तीर्थांचें तीर्थ होत.

जयांचेनि तीर्थां आलें तीर्थपण । केली सांठवण हृदयीं ती ॥
नवल महिमा हरिदासां जीवीं । तीर्थें उपजवी त्यांचे कुसीं ॥
वाराणसीं[2] प्राणी मरे अंतीं कोणी । तया चक्रपाणी नामें तारी ॥
नामा म्हणे तीर्थें तया येती भेटी । वोळंगती दृष्टी त्रिभुवना ॥

### १२०. धिक् तो ग्राम कीं जेथें संतसंगति नाही !

धिग् धिग् तो ग्राम धिग् धिग् तो आश्रम । संतसमागम नाहीं जेथें ॥
धिग् धिग् ते संपत्ति धिग् धिग् ते संतति । भजन सर्वांभूतीं नाहीं जेथें ॥
धिग् तो आचार धिग् तो विचार । वाचे सर्वेश्वर नाहीं जेथें ॥
धिग् तो वक्ता धिग् तो श्रोता । पांडुरंग कथा नाहीं जेथें ॥
धिग् तें गाणें धिग् तें पठणें । विठ्ठल नामबाणें नाहीं जेथें ॥
नामा म्हणे धिग् धिग् त्यांचें जिणें । एका नारायणेंवांचूनियां ॥

### १२१. तूं संतांवर विश्वास टाकशील, तर तुला देव आपोआप भेटेल.

संतपायीं माया धरितां सद्भावें । तेणें भेटे देव आपेआप ॥
म्हणवूनि संतां अखंड भजावें । तेणें भेटे देव आपेआप ॥

---

१ दूर करणें. २ काशीक्षेत्र.

साधुपाशीं देव कामधंदा करी । पीतांबर धरी वरी छाया ॥
नामा म्हणे देव इच्छी संतसंग । आम्हां जिवलग जन्मोजन्मीं ॥

१२२. तूं संतांचा प्रसाद सेविशील तर तुझें आयुष्य दुणावेल.

संतांच्या चरणा द्यावें आलिंगन । जीवें निंबलोण[1] उतरावें ॥
तेथें तूं निश्चळ राहे माझ्या मना । मग तुज यातना न होती कांहीं
संतांचे द्वारींचा होईं द्वारपाळ । तुटे मायाजाळ मोहपाश ॥
संतांचे प्रसाद सेविसी उरले । आयुष्य सरलें दुणावेल[2] ॥
नामा म्हणे संत आहेत कृपासिंधु । देती भक्तिबोधु प्रेमसुख ॥

१२३. "तैसा भेटे नारायण संतसंगें."

परिसाचेनि संगें लोह होय सुवर्ण । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥
कीटकी[3] ध्यातां भृंग[4] झाली तोचि वर्ण । तैसा भेटे नारायण संतसंगें ।
वनस्पति परिमळु चंदन झाला जाण । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥
अग्नीस मिळे तें न ये परतोन । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥
सरिता ओघ जाय सिंधूसि मिळून । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥
नामा म्हणे केशवा मज देईं संतसंग । आणिक कांहीं तुज न मागें बापा ॥

१२४. ज्यानें तुला पाहिलें त्याचा चरणरज मिळाल्यास मी आपल्यास धन्य समजेन.

ज्याचिया रे मनें देखियेलें तुज । त्याची लोकलाज मावळली ॥
नाहीं तया क्रिया नाहीं तया कर्म । वर्णाश्रमधर्म सुखदुःख ॥

---

१ उतरून टाकण्याचा पदार्थ. २ दुप्पट होईल. ३ किडा. ४ भुंगा.

नाहीं देहस्फूर्ति जातिकुळभेद । अखंड आनंद ऐक्यतेचा ॥
नामा म्हणे त्याचे चरणरज व्हावें । हेंचि भाग्य द्यावें केशिराजा॥

१२५. जो मला राम प्रत्यक्ष दाखवील त्याचे मी पाय धरीन.

मंत्रतंत्र दीक्षा सांगतील लक्ष। परि राम प्रत्यक्ष न करी कोणी॥
प्रत्यक्ष दावील राम धरीन त्याचे पाय। आणिकांची काय चाड मज॥
सर्व कामीं राम भेटविती मातें। जीवेंभावें त्यांतें ओवाळीन ॥
नामा म्हणे आम्हां थोर लाभ झाला। सोइरा भेटला अंतरींचा ॥

१२६. सद्गुरु नानाप्रकारें साक्षीला पाहिजे.

भक्तीविण मोक्ष नाहीं हा सिद्धांत। वेद बोले हात उभारोनि ॥
तरी तेंचि ज्ञान जाणायालागुनी। संतां वोळगोनि वश्य कीजे ॥
प्रपंच हा खोटा शास्त्रें निवडिला। पाहिजे साक्षीला सद्गुरु तो ॥
नामा म्हणे सेवा घडावी संतांची। घ्यावी कृपा त्यांची तेंचि ज्ञान॥

१२७. नाम जरी स्वतःसिद्ध असलें तरी सद्गुरुवांचून वर्म हातीं येत नाहीं.

करितां वेदाध्ययन ज्योतिष। नामाचा तो लेश नये हातां ॥
बहुत व्युत्पत्ति पुराण। व्यर्थ तें स्मरण नाम नव्हे ॥
अनंत हें नाम जयांतूनि आलें। त्यांतचि जिरालें जळीं जळ ॥
सद्गुरु तें नाम सद्गुरुकृपेंविण कोणा। साधन साधना जपें तपें॥
नामदेव म्हणे स्वतःसिद्ध नाम। गुरूविण वर्म हातां नये ॥

### १२८. साधूची भेट होण्यास भाग्य लागतें.

रविरश्मि धरोनि स्वर्गीं जाऊं येईल । परि साधुसंगतीचा पार नकळे नकळे ॥
वैतरणी[1] उतरोनि वैकुंठा जाऊं येईल । परि साधुसंगतीचा पार नकळे नकळे ॥
स्वप्नींचा हा ठेवा साचही होईल । परि साधुसंगतीचा पार नकळे नकळे ॥
मायबाप बंधु भगिनी मिळे योनि । परि साधूची मिळणी भाग्ययोगें ॥
तपें व्रतें दानें गोविंद पैं भेटे । परि साधु तंव न भेटे भाग्येंविण ॥
नामा म्हणे केशवा बरा साधुसंग । यावेगळा भवरोग न तुटे न तुटे ॥

### १२९. ज्यास दया माया नाहीं असा हरिदास घेऊन काय करावयाचा ?

मुखीं नाम हातीं टाळी । दया नुपजे कोणे काळीं ॥
काय करावें तें गाणें । धिक् धिक् तें लाजिरवाणें ॥
हरिदास म्हणोनि हालवी मान । कवडीसाठीं घेतो प्राण ॥
हरिदासाचे पायीं लोळे । केशीं धरोनि कापी गळे ॥
नामा म्हणे अवघे चोर । हरिनाम हें थोर ॥

### १३०. कोणाचा अंकित न होईन अशी प्रतिज्ञा एका भक्तासच साजते.

आणिक न मागें हें ब्रीद साजे चातका ।
भूमीच्या उदका न खालवी माथा ॥

---

१ परलोकांतील नदी.

आणिकापुढें न गाय हें ब्रीद साजे कोकिळिये ।
वसंत ऋतु स्वयें ओळखीतसे ॥
आणिकापुढें न नाचे हें ब्रीद साजे मयूरा ॥
वर्षला घन[1] सारा वळोनियां ॥
एका लक्ष्मीपतिवांचूनि न बैसे आणिकापुढें ।
हें ब्रीद साजे रोकडें गरुडासी ॥
आणिकांचा पांगिला[2] न करी गा देवा ।
नामा म्हणे केशवा रंक तुझा ॥

१३१. येथें एका पुंडलीकानेंच राज्य केलें आहे.

जन्मजन्मांतरीं असेल सामुग्री । तरिच नाम जिव्हाग्रीं येईल वाचे ॥
कर जोडुनी दोन्ही मोक्ष पाहे वास । म्हणे होइन दास हरिदासांचा ॥
तरि हे तुच्छ करूनि न पाहती दृष्टी । आंपंगिलें[3] शेवटीं ब्रह्मज्ञानीं ॥
नामाचेनि बळें उडविलीं साधनें । तोडिलीं बंधनें संसाराचीं ॥
मुक्तिपद कोणी न घेती फुकासाठीं । हिंडे वाळुवंटीं दीनरूपें ॥
योगियाचे घर रिघे काकुलती । अव्हेरिलें संतीं म्हणोनियां ॥
रिद्धिसिद्धि म्हणती आमुची कवण गती । यावें काकुलती कवणा आम्हीं ॥
मोक्षमुक्ति जिहीं हाणितल्या लाथीं । ते काय धरिती आमुची सोय ॥
ऐसें सर्व देवांसी श्रीदेव ते पूज्य । केलें एक राज्य पुंडलीकें ॥
हर्षें निर्भर नामा नाचे महाद्वारीं । मुखीं निरंतरीं नामघोष ॥

---

१ मेघ. २ अंकित. ३ स्वीकारिलें.

### १३२. पांडुरंग आपली पदवी सेवकास देतो.

आपली पदवी सेवकासी द्यावी । तो एक गोंसावी पांडुरंग ॥
भावाचा आ[1]ळुका भुलला भक्तिसुखा । सांपडला फुका नामासाठीं॥
प्रेमाचा जिव्हाळा नामाची आवडी । क्षण एक न सोडी संग त्याचा॥
नामा म्हणे आम्हां दीनाचें माहेर । तो एक उदार पांडुरंग ॥

### १३३. जे भक्त संसाराची सोय सोडतात त्यासच देव मागें पुढें सांभाळितो.

संसाराची सोयें[2] चुकले बापुडे । केशव मागें पुढें सांभाळीत ॥
आ[3]ळीकार नामें खेळे महाद्वारीं । आंतून बाहेरीं न वचे कांहीं ॥
संतांतें देखोनि मिठी घाली चरणीं । कुरवंडी करूनि देह टाकी॥
ऐसें निजबोधें राहिले निवांत । नामा राहे एक केशवचरणीं ॥

### १३४. नानाप्रकारच्या खेळियांचें वर्णन.

नव्हें तेंचि कैसें झालेंरे खेळिया । नाहीं तेंचि दिसूं लागलेंरे ।
अरूप होतें तें रूपासि आलें । जीव शीव नाम पावलें रे ॥
आपलिच आवडी धरून खेळिया । आपआपणातें व्यालें रे ।
जोपनाकारणें केली बायको । तिणें पवडें वाढविलें रे ॥
ऐक खेळिया तुज सांगितलें ऐसें । जाणुनि खेळ खेळेंरे ॥धृ०॥
ब्राह्मणाचें पोर एक खेळासि भ्यालें । तें बारा वर्षे लपालेंरे ।
कांपत कांपत बाहेर आलें । ते नागवेंचि पळून गेलेंरे ॥
सहातोंड्या एक संभूचें बाळ त्यानें । बहुतचि बळ आथियेलें रे ।
खेळ खेळतां दगदगी व्यालें । तें कपाट फोडुनी गेलें रे ॥

---

१ भुकेला. २ मार्ग, सबंध. ३ हट्ट घेणारे.

चहूं तोंड्याचा पोर एक नारयाहि जाण। तो खोळियामाजी आगळारे।
कुचालि[1] करुनी पोरें भांडवी। आपण राहे वेगळारे॥
गंगा गौरी दोघी भांडवी। संभ्यासि घाडिलें राना रे।
खेळ खेळे परि डायीं न सांपडे। तो एक खेळिया शाहणारे॥
खेळियामाजी हनुम्या शहाणा। न पडे कामव्यसनीं रे।
कामचि नाहीं तेथें क्रोधाचि कैंचा तेथें कैंचें भांडणरे। रामागड्याची आवडि मोठी म्हणूनि लंकें पेणें[2] रे॥
यादवांचा पोर एक गोप्या भला। तो बहुतचि खेळ खेळलारे।
लहान थोर अवघीं मारिलीं। खेळचि मोडुनि गेला रे॥
ऐसे खेळिये कोट्यानकोटी। गणित नाहीं त्यालारे।
विष्णुदास नामा म्हणे वडिल हो। पहा देहीं शोधुनि रे॥

---

## ६. अनुभव.

१३५. ईश्वरास जाणण्याची कळा ही एक निसर्गदत्त देणगी आहे.

धेनु विये वनीं तिसी कैंची सुइणी। तरी तें वत्स स्तनीं लावी कवण
भुजंगाचीं पिलीं उपजतांचि वेगळीं। त्यांसि डंखूं[3] शिकविलें हो कोणीं॥
सहज लक्षण जयाचिये ठायीं। तो आपुलिये सोयी धांवतसे॥

---

१कुचेष्ट. २ मुक्काम. ३ दंश करणें.

उपजतांचि फूल मोगऱ्याच्या माथां । त्यासी परिमलता कोणें लावियेली ॥
कडू दुध्याच्या आळ्यांसी साखर दूध घातलें । तें अधिकचि कडुवाळें कवणें केलें ॥
गिळिला तोडिला खंडविखंडीं । ऊस न संडी सोय गोडीसी ॥
नामा म्हणे तैसें आहे गा श्रीहरि । सोईचे व्यापारीं घेईन तूंतें ॥

## १३६. चरणांवर लोटांगण घालून मी तुझें रूप पाहीन.

घालीन लोटांगण वंदीन चरण । डोळ्यांनीं पाहीन रूप तुझें ॥
प्रेमें आलिंगीन आनंदें पूजीन । भावें ओंवाळीन म्हणे नामा ॥

## १३७. एकवेळ नयनीं पाहून तुम्हीं भलत्या गांवास गेला तरी हरकत नाहीं.

एकवेळ नयनीं पहावा । मग जाइजे भलत्या गांवा ॥
आठवाल वेळोवेळां । विठोबा आहे रे जवळां ॥
हृदयीं मांडूनिया ठसा । नामा म्हणे केशव असा ॥

## १३८. मुक्यानें गूळ खादला । गोडी न ये सांगायाला.

गूळ गोड न लगे म्हणावां । तैसा देव न लगे वानावा ॥
सेवी तोचि चवी जाणें । येरां सांगतां लाजिरवाणें ॥
नामा म्हणे या खुणा । तुम्हीं ओळखा पंढरिराणा ॥

## १३९. अमृतलिंग केशव चित्तीं असल्यानें आम्हीं अखंड तृप्तीचा उपभोग घेत आहों.

तान्हेलों भुकेलों । तुझेनि नामें निवालों ॥
तहान नेणें भूक नेणें । अखंड पारणें नामीं तुझ्या ॥
अमृतलिंग केशव हा चित्तीं । तेणें नामया तृप्ति अखंडित ॥

१४०. डावीउजवीकडे आणि मागेंपुढें तुझे चरण जोडतील असें कर.

मनें ध्यान करणें वाचे उच्चारणें। नयनें तुज पाहणें हेंचि देई ॥
करें पूजा करणें माथा चरणीं ठेवणें। श्रवणीं गुण ऐकणें हेंचि देई ॥
मनसा वाचा कर्म आणि दश इंद्रियें। तुझ्या चरणीं दृढ होय ऐसे करीं ॥
डावी उजवीकडें आणि मागें पुढें। अंतीं चरण जोडे ऐसें करीं ॥
नामा म्हणे केशवा तुझी मज गोडी। जन्मोजन्मीं जोडी हेचि देई ॥

१४१. देव चहूंबाहीं उभा असून सर्व दिशा व्यापून राहिला आहे.

मन झालें उन्मन वासना तल्लीन। देखिले हरिचरण सर्वां ठायीं ॥
गुरुशिष्यमत हारपला दृष्टांत। प्रत्यक्ष त्वरित हरि झाला ॥
नामा पाहे देहीं तंव उभा चहूं बाहीं। दिशाद्रुमित दाहीं हरि दिसे॥

१४२. आंधळ्यानें देखिलें बहिऱ्यानें ऐकिलें.

आंधळ्यानें स्वरूप देखियेलें नयनीं। मुकें बहिऱ्या कानीं गोष्टी सांगे ॥
कांसवीचें दूध दुहितां भरणा। दुही त्याला जाणा हात नाहीं ॥
वारियाच्या लोथा बांधोनियां माथां। वांझेचिया सुता बळिवंता॥
मुंगीनें त्रैलोक्य धरियेलें तोंडीं। नामा म्हणे पिंडीं प्रचित आहे ॥

१४३. सहस्रदळांतून उठणाऱ्या अनाहतनादाच्या गजरानें पातकें कपाटीं रिघतात.

सहस्रदळांमधून अनुहात ध्वनि उठीं।
नामाचेनि गजरें पातकें रिघालीं कपाटीं॥

---

१ काढणें. २ मोट.

जागा रे गोपाळांनो रामनामीं जागा।
कळिकाळ एका नामें महादोष जाती भंगा॥
दशमी एकव्रत दिंडीचें करा दर्शन।
एकादशी उपवास तुम्हीं करा जागरण॥
द्वादशी साधनें जळती पातकांच्या कोटी।
नामा म्हणे केशव ठाव देईल वैकुंठीं॥

१४४. नाम घेतांच देव सामोरा येणार नाहीं तर माझें मस्तक छेदा.

हडबडलीं[1] पातकें। घेतां रामनाम एक॥
नाम घेतां तत्क्षणीं। चित्रगुप्तें सांडिली लेखणी॥
घेउनि पूजेचा संभार[2]। ब्रह्म येतसे सामोर॥
नामा म्हणे जरि हें लटकें। तरि माझें छेदावें मस्तक॥

१४५. बसून नाम घेतल्यास देव उभा राहतो, उभ्यानें नाम घेतल्यास देव नाचतो.

कीर्तनाच्या सुखें सुखी होतो देव। कोणतें वैभव वाणी आतां॥
अंत्यज आणि जातिवंता। सुखीं राम घेतां उडी घाली॥
बैसोनि आसनीं आळवितां नाम। उभा सर्वोत्तम तयापुढें॥
प्रेमाचिया भरें उभ्यानें गर्जतां। नाचे हा अनंत तयासवें॥
नामा म्हणे तया कीर्तनाची गोडी। घालीतसे उडी नेटेंपाटें[3]॥

१४६. नामयाचा स्वामी आला.

कोटी दिवाळ्या दसरे। आम्हां हेंचि झालें पुरे॥
घरोघरीं ओंवाळणी। विठ्ठल देखिला नयनीं॥

---

१ गोंधळून जाणें. २ साहित्य. ३ लवकर.

झाला सुखाचा शेजार । करा नामाचा गजर ॥
नामयाचा स्वामी आला । ब्रह्मादिकां आनंद झाला ॥

१४७. गरुडासमवेत सुदर्शनधारी देदीप्यमान देवाचें दर्शन.

कोटिसूर्य प्रभादीप्ति । गगनीं झळकली अवचितीं ॥
संत नामया सांगती । पैल आला कमलापति ॥
वत्सालागीं जैसी धेनु । तैसा धांवे जगज्जीवनु ॥
गरुडाचे धुंदुवाती । दाही दिशा आक्रंदती ॥
हरिकंठींची सुमनमाळा । सुटोनि आली भूमंडळा ॥
सवें चाले सुदर्शन । भक्त कराया रक्षण ॥
उचलोनि दोन्ही बाहीं । नामा धरिला हृदयीं ॥

१४८. महाप्रळयांत सप्तसागर एकवटतात तसा विश्वव्यापित्वानें स्वरूपसाक्षात्कार.

चेइला तो जाणरे सद्‌गुरुवचनीं निर्धारें ।
विपरीत भावना विसर पडला कंठीं जया परिहार रे ॥
आपणा पैं पहावया कवण लावूं दिवा रे ।
चंद्रसूर्य जेणें प्रकाशे तो मी कैसा पाहूं येई रे ॥
अंत त्यासी नाहीं रे स्थान मान कांहीं रे ।
चेइला तेणें ओळखिला येरांसी अगम्य भाई रे ॥
पूर्व पश्चिम दक्षिण उत्तर नाहीं दाही दिशा रे ।
महाप्रळई सप्त सागर एक होती अनुभविया तो तैसा रे॥

१ संचार.

दाही दिशा व्यापूनियां तो अंधःकार महा रे।
रविप्रकाश जाहल्या आपेआप निरसला रे॥
काष्ठीं पावक उपजला तोही तयासम रे।
नामा म्हणे केशिराजा चेईल्या आम्हां तुम्हीं रे॥

## १४९. उन्मन्यवस्थेंत स्वरूपसाक्षात्कार.

देहमंदिराभीतरीं। शेजे सूदला[1] श्रीहरि॥
निद्रा उन्मनीचे भरीं। तें म्यां स्वप्न देखिलें॥
स्वप्नीं भुललें बाई। मागील नाठवेचि कांई॥
हा जीव परवस्तूच्या ठाईं। तनुमनें आटला॥
स्वप्न सांगूं कोणासी। विवेक करिती तयासी॥
हें कोडें अज्ञानासी। संतावांचुनी नुगवे॥
ध्यानीं पहुडला[2] सांवळा। जवळी नारी बारा सोळा॥
विंजणे[3] वारिती सकळां। सोहंशब्दजागरणीं॥
धिं धिं तुरे वाजती। अनुहात ध्वनि गर्जती॥
तेथें निद्रा ना सुषुप्ति। चंद्रसूर्य मावळले॥
मना पवना नाहीं भेद। तया ठायीं हा गोविंद।
तेथें खुंटला अनुवाद। वेदश्रुति आटल्या॥
म्हणे विष्णुदास नामा। जन्ममरण नाहीं आम्हां।
कृपा केली मेघश्यामा। संतसंगें तारिलों॥

## १५० "केशव तोचि नामा, नामा तोचि केशव."

नामयाचे प्रेम केशवाचे जाणे। केशवासी राहणें नाम्यापाशीं॥
केशव तोचि नामा नामा तोचि केशव। प्रेमभक्तिभाव मागतसे॥
विष्णुदास नामा उभा केशवद्वारीं। प्रेमाची शिदोरी मागतसे॥

१ घालणें. २ निजणें. ३ पंखा.

# गोराकुंभार.

## १. नाम्या, तुम्हां आम्हां यावर तुटी उरली नाहीं.

स्थूल होतें तेंचि सूक्ष्म पैं झालें । मन हें बुडालें महासुखीं ॥
माझें रूप माझें विरालेंसे डोळां । सामा[1]विलें बुबुळां माझें ज्ञान ॥
म्हणे गोरा कुंभार नवल जाहली भेटी । नाम्या तुम्हां आम्हां तु[2]टी उरली नाहीं ॥

## २. पाहतां पाहतां माझी खेचरी मुद्रा लागून गेली.

निर्गुणाचे भेटी आलों सगुणासंगें । तंव झालों प्रसंगें गुणातीत ॥
मज रूप नाहीं नांव सांगूं काई । झाला काई बाई बोलूं नये ॥
बोलतां आपुली जिव्हा पैं खादली । खे[3]चरी लागली पाहतां पाहतां ॥
म्हणे गोरा कुंभार नाम्या तुझी भेटी । सुखासुखी मिठी पडली कैसी ॥

## ३. जयजय झनकून झांगट वाजते.

अंतरींचें गु[4]ज बोलूं ऐसें कांहीं । वर्ण व्यक्ति नाहीं शब्द शून्य ॥
जय जय झनकून जयजय झनकून । अनुहात जंगटें[5] नाद गर्जे ॥
परतल्या श्रु[6]ति म्हणती नेति नेति । त्याही नादाअंतीं स्थिर राहती ॥
म्हणे गोरा कुंभार सद्भावीचें नीरें[7] । सेवी निरंतर नामदेवा ॥

## ४. मजवर झडपणी होऊन आदिरूप मनांत संचरलें आहे.

केशवाचे भेटी लागलें तें पिसें[8] । विसरले कैसें देहभाव ॥
झाली झड[9]पणी झाली झडपणी । संचरलें मनीं आदिरूप ॥

---

१ मावणें. २ भेद. ३ एक मुद्रा. ४ गुप्त गोष्ट. ५ काशाचें एक वाद्य. ६ वेद. ७ अमृत. ८ वेड. ९ भूतानें पछाडलें जाणें.

न लिंपेचि कर्मीं न लिंपेचि कर्मीं । न लिंपे गुणधर्मीं पुण्यपापा ॥
म्हणे गोरा कुंभार सहज जीवन्मुक्त । सुखरूप अद्वैत नामदेवा ॥

५. मन हें मुकें होऊन नेत्रपातीं निवांत राहिलीं आहेत.

कवण स्तुति करूं कवणिया वाचे । बोध संकल्पाचे गिळिलें चित्तें॥
मन हें झालें मुकें मन हें झालें मुकें । अनुभवाचें हें सुख हेलावलें॥
दृष्टीचें पाहणें परतलें मागुतीं । राहिलीं निवांत नेत्रपातीं ॥
म्हणे गोरा कुंभार मौन्यसुख घ्यावें । जीवें ओंवाळावें नामयासी॥

६. आपण जीवन्मुक्त होऊन जगास शाहणें न करणें हें बरें.

मुकिया साखर चाखाया दिधली । बोलतां हे बोली बोलवेना ।
ते काय शब्द खुंटला अनुवाद । आपुला आनंद आधारा या ॥
आनंदीं आनंद गिळुनी राहणें । अखंडित होणें न होनियां ॥
म्हणे गोरा कुंभार जीवन्मुक्त होणें । जग हें न करणें शहाणे बापा॥

---

१ डोलणें. २ पापण्या.

# विसोबाखेचर.

१. देव देखिला म्हणसील तर, नामदेवा, हा बोल बरा नव्हे.

जरी म्हणसी देव देखिला। तरी बोल भला नव्हे नाम्या ॥
जोंवरि मी माझें न तुटे। तंव आत्माराम कैसेनि भेटे ॥
खेचरसाह्यानें मी कांहीं नेणें। जीवाया जीव इतुलें[1] मीं जाणें ॥

२. तुझें निजसुख तुझ्यापाशींच आहे.

तुझें निजसुख तुजपासीं आहे। विचारूनि पाहे मनामाजी ॥
विवेकवैराग्य शोधूनियां पाहे। तेणें तुज होय ब्रह्मप्राप्ति ॥
ज्ञानाचा प्रकार सहजाचि झाला। आहे भाव गेला गळोनियां ॥
खेचर विसा म्हणे जेथें ओंकार निमाला। सहजाचि झाला ब्रह्ममूर्ति॥

३. असा अनकळित मार्ग तुला साधेल तर पर्वतप्राय पापराशि दग्ध होतील.

पर्वतप्राय पापराशि होती दग्ध। वाचेसी मुकुंद उच्चारितां ॥
अच्युत हरे केशव हरे। माधव हरे रामकृष्ण ॥
नामाचें साधन करिशील पूर्ण। तैं प्रपंचभान उरों नेदी ॥
उदासीनवृत्ति आवरावें मन। नाहीं गुणधर्म मायालोभ ॥
ऐसा अनकोळित[2] मार्ग साधेल जरी तुज। खेचर विसा गुज सांगे नाम्या ॥

---

१ इतकें. २ समग्र.

४. खेचराचे गुरु ज्ञानराज, व खेचराचे शिष्य नामदेव.

जळ स्थळ काष्ठ पाषाणु । पिंडब्रह्मांड अणुरेणु ।
सर्वस्वें आपणु । साक्ष असें ॥
हें जाणूनियां यापरतें । जाणें आप आपणियातें ।
खेचर म्हणे नामयातें । अवघाचि देव ॥
श्रवणीं सांगितली मात । मस्तकीं ठेविला हात ।
पद[1]पिंडविवर्जित[2] । केला नामा ॥
खेचर विसा । प्रेमाचा हो पिसा ।
नामा कैसा । उपदेशिला ॥
सांगितलें गुज । दाखविलें निज ।
पाल्हाळीं[3] हो तुज । काय चाड ॥
खेचर म्हणे मज । ज्ञानराज हे गुरु ।
तेणें अगोचरु । नामा हा केला ॥

---

१ ब्रह्म व जीव. २ या वेगळा. ३ विस्तार.

# सांवतामाळी.

१. संसाराची बोहरी करण्याविषयीं देवाजवळ सांवत्याची प्रार्थना.

ऐकावे विठ्ठल धुरे[1] । विनंति माझी हो सत्वरें ॥
करी संसाराची बोहरी[2] । इतुकें मागतों श्रीहरि ॥
कष्ट करितां जन्म गेला । तुझा विसर पडला ॥
माळी सांवता मागे संतान । देवा करी गा निःसंतान ॥

२. ब्राह्मणजन्म असता तर मी कर्मांतच गुंतलों असतों.

मली केली हीन याति । नाहीं वाढली महंती ॥
जरी असतां ब्राह्मणजन्म । तरी हें अंगीं लागतें कर्म ॥
स्नान नाहीं संध्या नाहीं । याति कुळ संबंध नाहीं ॥
सांवता म्हणे हीन याति । कृपा करावी श्रीपति ॥

३. मला अनाथाला येथें न ठेवितां मला उचलून न्या असें सांवता माळी म्हणतो.

कां बा रुसलासी कृपाळुवा हरि। तुजविण दुसरीं भाकूं तीं कोण ॥
दीन रंक[3] पापी हीन माझी याति । सांभाळा श्रीपति पांडुरंगा ॥
मोह आशा माझ्या लागलीसे पाठीं । काळ क्रूरदृष्टि पाहात असे ॥
सांवता म्हणे देवा नका ठेवूं येथें । उचलोनि अनाथा न्यावें मज ॥

४. सुखांत व दुःखांत देव ठेवील तसें रहावें.

समयासी सादर[4] व्हावें । देव ठेविल तैसें रहावें ॥
कोणे दिवशीं बसून हत्तीवर । कोणे दिवशीं पालखी सुभेदार ॥

---

१ श्रेष्ठ. २ राखरांगोळी. ३ दरिद्री. ४ तयार, तत्पर.

कोणे दिवशीं पायांचा चाकर । चालून जावें ॥
कोणे दिवशीं बसून याची मन । कोणे दिवशीं घरांत नाहीं धान्य ॥
कोणे दिवशीं द्रव्याचें सांठवण । कोठें सांठवावें ॥
कोणे दिवशीं यम येती चालून । कोणे दिवशीं प्राण जाती घेऊन॥
कोणे दिवशीं स्मशानीं जाऊन । एकटें रहावें ॥
कोणे दिवशीं होईल सद्‌गुरूची कृपा । कोणे दिवशीं चुकती जन्माच्या खेपा ॥
कोणे दिवशीं सांवत्याच्या बापा । दर्शन द्यावें ॥

## ५. देवाची सांवत्यास भेट.

विकासिले नयन स्फुरण आलें बाहीं । दाटलें हृदयीं करुणाभरितें॥
जातां मार्गीं भक्त सांवता तो माळी । आला तयाजवळी पांडुरंग॥
नामा ज्ञानदेव राहिले बाहेरीं । मळियाभीतरीं गेला देव ॥[१]
माथां ठेऊनि हात केला सावधान । दिलें आलिंगन चहूं भुजीं ॥
चरणीं ठेऊनि माथां विनवितो सांवता । बैसा पंढरिनाथा करीन पूजा ॥

## ६. नामाच्या बळानें न भितां आम्हीं कळिकाळाच्या माथ्यावर सोटे मारूं.

नामाचिया बळें न भिऊं सर्वथा । कळिकाळाच्या माथां सोटे मारूं॥
वैकुंठींचा देव आणूं या कीर्तनीं । विठ्ठल गाऊनि नाचों रंगीं ॥
सुखाचा सोहळा करूनि दिवाळी । प्रेमें वनमाळी चित्तीं धरूं ॥
सांवता म्हणे ऐसा भक्तिमार्ग धरा । तेणें भक्ति[२] द्वारा वोळंगेती ॥

१ भरून येणें. २ सेवा करणें, आश्रय करणें.

# नरहरिसोनार.

१. चितारी जशीं भिंतीवर चित्रें रंगवितो तसें हें सर्व जग आहे.

चिताऱ्या चितरें काढी भिंतीवरी। तैसें जग सारें अवघें हें ॥
पोरें हो खेळतीं शेवटीं मोडितीं। टाकूनियां जाती आपुल्या घरा॥
तैसे जन सारे करिती संसार। मोहगुणें फार खरें म्हणती ॥
कांहीं साध्य करा साधुसंग धरा। नाम हें उच्चारा नरहरि म्हणे॥

२. ऐरावत ज्या प्रमाणें अंकुशाच्या ताब्यांत आहे त्याप्रमाणें नरहरि गैबीनाथाच्या अंकित आहे.

ऐरावती बहु थोर। त्याला अंकुशाचा मार ॥
व्याघ्र बहु भयंकर। त्याला सांपळा हा थोर ॥
सर्पविष हा वि[1]खार। मंत्रवल्ली केली थोर ॥
देह जठराग्नि भारी। अन्नपाणी शांत करी ॥
गुरु गैबीनाथ। नरहरिदास हा अंकित ॥

३. नाम हें फुकाचें असून परिणामीं अमृताप्रमाणें गोड आहे.

नाम फुकाचें फुकाचें। देवा पंढरिरायाचें ॥
नाम अमृत हें सार। हृदयीं जपा निरंतर ॥
नाम संतांचें माहेर। प्रेम सुखाचें आगर ॥
नाम सर्वांमध्यें सार। नरहरि जपे निरंतर ॥

---

१ भयंकर.

### ४. निशिदिनीं होणाऱ्या अनाहतनादाला मन लुब्ध होऊन गेलें आहे.

अनुहात ध्वनि करित निशिदिनीं[1] । मन हें लुब्धुनि गेलें तया ॥
अखंड हें मनीं स्मरा चिंतामणी । हृदयीं हो ध्यानीं सर्वकाळ ॥
अखंड हें खेळे जपे सर्वकाळीं । हृदयकमळीं आनंदला ॥
प्रेम अखंडित निशिदिनीं ध्यात । नरहरिसी पंथ दाखविला ॥

### ५. नरहरि हा परमार्थांत सुद्धां सोनाराचा धंदा करितो.

देवा तुझा मी सोनार । तुझे नामाचा व्यवहार ॥
देह बागेसरी[2] जाण । अंतरात्मा नाम सोनें ॥
त्रिगुणाची करुनि मूस[3] । आंत ओतिला ब्रह्मरस ॥
जीव शिव करुनि फुंकी[4] । रात्रंदिवस ठोकाठोकी ।
विवेक हातवडा घेऊन । कामक्रोध केले चूर्ण ॥
मनबुद्धीची कातरी । रामनाम सोनें चोरी ॥
ज्ञान ताजवा[5] घेऊनि हातीं । दोन्हीं अक्षरें जोखिती[6] ॥
खांद्या वाहोनि पोतडी । उतरला पैलथडी[7] ॥
नरहरि सोनार हरिचा दास । भजन करी रात्रंदिवस ॥

---

१ रात्रंदिवस. २ सोनाराची शेगडी. ३ धातूंचा रस करण्याचें पात्र. ४ फुंकणी. ५ तराजू. ६ वजन करणें. ७ पलीकडचें तीर.

# चोखामेळा.

१. मला दूर हो, दूर हो, म्हणतात तर मी तुला कसा भेटूं ?

हीन याति माझी देवा । कैसी घडेल तुझी सेवा ॥
मज दूर दूर हो म्हणती । तुज भेटूं कवण्या रीतीं ॥
माझा लागतांचि कर । सितोडा घेताती करार ॥
माझ्या गोविंदा गोपाळा । करुणा भाकी चोखामेळा ॥

२. विठोबाचा हार तुझे कंठीं कसा आला असें मला बडवे विचारतात.

धांव घाली विठू आतां चालूं नको मंद ।
बडवे मज मारिती ऐसा कांहीं तरी अपराध ॥
विठोबाचा हार तुझे कंठीं कैसा आला ।
शिव्या देउनी म्हणती महारा देव बाटवीला ॥
अहो जी महाराज तुमचे द्वारींचा कुतरा ।
नका जी मोकलूं[1] चक्रपाणी दुजे[2] द्वारां ॥
जोडुनियां कर चोखा विनवितो देवा ।
बोलिला उत्तरीं परि राग नसावा ॥

३. मी देहांतच पंढरी पाहिल्यानें अविनाश आत्मा विठ्ठलरूपानें मला दिसत आहे.

देहीं देखिली पंढरी । आत्मा अविनाश विटेवरी ॥
तो पहा पांडुरंग जाणा । शांति रुक्मिणी निजांगना ॥

---

१ हाकलणें. २ दुसऱ्या.

आकारलें तितुकें नासे । आत्मा आविनाश विठ्ठल दिसे ॥
ऐसा विठ्ठल हृदयीं ध्यायी । चोखामेळा जडला पायीं ॥

४. चोखा डोंगा असला तरी त्याचा आत्मा कांहीं डोंगा नाहीं.

ऊंस डोंगा[1] परी रस नव्हे डोंगा । काय भुललासी वरलिया रंगा ॥
कमान डोंगी परी तीर[2] नाहीं डोंगा । काय भुललासी वरलिया रंगा ॥
नदी डोंगी परी जळ नोहे डोंगें । काय भुललासी वरलिया रंगें ॥
चोखा डोंगा परी भाव नाहीं डोंगा । काय भुललासी वरलिया रंगा ॥

५. देणार असशील तर भक्तियुक्त कन्यापुत्र दे; नाहीं तर माझें निःसंतान कर.

ऐसा पुत्र दे गा देवा । जग म्हणे त्याला बावा ॥
कन्या ऐसी तरी देई । जैसी मिरां[3] मुक्ताबाई ॥
ऐसा भक्तराज गुंडा । त्याचा तिहीं लोकीं झेंडा ॥
इतकें न देवे तुझ्यानें । माझें करीं गा निःसंतान ॥
दोही मार्जी एक लेखा । बोले केशवदास चोखा ॥

६. खटनटांनीं येऊन येथून शुद्ध होऊन जावें अशी चोखामेळा दवंडी पिटितो.

टाळी वाजवावी गुढी[4] उभारावी । वाट ते चालावी पंढरीची ॥
हरिनाम गर्जतां नाहीं भयचिंता । ऐसें बोले गीता भागवत ॥
पातकाचे भार मिळाले अपार । जयजयकारें भरलें भीमातीर ॥
पंढरीचा हाट[5] कवुलाची पेंठ[6] । मिळाले चतुष्ट[7] वारकरी ॥
खटनट[8] यावें शुद्ध होउनी जावें । दवंडी पिटी भावें चोखामेळा ॥

---

१ वांकडा. २ बाण. ३ मिराबाई. ४ पताका. ५ बाजार. ६ पेठ. ७ चार. ८ वाईटसाईट.

७. आमच्या घरास विठोबा पाहुणा आला असल्यानें षड्रस पक्वान्न वाढून आम्हीं त्याशीं एकवट होऊन जेवूं.

विठोबा पाहुणा आला आमुचे घरा। निंबलोण करा जीवें भावें॥
पंचप्राण ज्योति ओंवाळुनी आरती। ओंवाळिला पति रखुमाईचा॥
षड्रस पक्वान्न विस्तारिलें ताट। जेवूं एकवट चोखा म्हणे॥

८. विदुरद्रौपदीच्या घराप्रमाणें येथेंही गोड करून जेवा असें चोखामेळ्याची म्हारी म्हणते.

येई येई गरुडध्वजा। विटे सहित करीन पूजा॥
धूपदीप पुष्पमाळा। तुज समर्पूं गोपाळा॥
पुढें ठेवोनियां पान। वाढी कुटुंबी ते अन्न॥
तुम्हां योग्य नव्हे देवा। गोड करूनियां जेवा॥
विदुराघरच्या पातळ कण्या। खासी मायबापा धन्या॥
द्रौपदीच्या भाजीपाना। तृप्ति झाली नारायणा॥
तैसी झाली येथें परी। म्हणे चोखयाची म्हारी॥

---

१ बायको.

# जनाबाई.

### १. पतंगानें सुखावून दीपावर उडी घातली असतां त्याचें सुखही जाईल व देहही जाईल.

पतंग सुखावला भारी । उडी घाली दीपावरी ॥
परि तो देहांतीं मुकला । दोहीं पदार्थां नाडिला[1] ॥
विषयाचे संगतीं । बहु गेले अधोगती ॥
ऐसे विषयानें भुलविले । जनी म्हणे वायां गेले ॥

### २. देहांत असून छायापुरुषाप्रमाणें वर्तन करावें.

सुखें संसार करावा । माजीं विठ्ठल आठवावा ॥
असोनियां देहीं । छायापुरुष जैसा पाहीं ॥
जैसा सूर्य घटाकाशीं । तैसी देहीं जनी दासी ॥

### ३. साधकाचे गुण.

आक्रोशें ध्यानासीं आणी पुरुषोत्तमा । पृथ्वीयेसी क्षमा उणी आणी ॥
अखंडित शुद्ध असावें अंतर । लोणिया कठोर वाटे मनीं ॥
बोलें तें वचन बहु हळुवट[2] । सुमना अंगीं दाट जडभार ॥
नाम तें स्मरण अमृतसंजीवनी । म्हणे दासी जनी हेंचि करा ॥

### ४. अभिमानत्यागावांचून देव हातीं येणार नाहीं.

शूराचें तें शस्त्र कृपणाचें[3] धन । विध्वंसिल्या[4] प्राण हातां नये ॥
गजमाथां मोतीं सर्पाचा तो मान । गेलियांही प्राण हातां नये ॥

---

१ फसणें. २ हलकें, कोमळ. ३ लोभी. ४ नाश करणें.

सिंहाचें तें नख पतिव्रतेचे स्तन । गेलियाही प्राण हातां नये ॥
विराल्यावांचून देह अहंभाव । जनी म्हणे देव हातां नये ॥

५. काया, वाचा, मन सद्गुरूस देऊन त्याजपासून वस्तु मागून घ्यावी.

संसारीं निधान लाधलें जना । सद्गुरुचरणा सेवी बापा ॥
कायावाचामनें तयास देयावीं । वस्तु मागून घ्यावी अगोचर ॥
तें गोचर नव्हे जाण गुरुकृपेंवीण । एऱ्हवीं तें आपणामाजीं आहे॥
माळ वेष्टण करीं[2] टापोरे[3] घेती शिरीं । नेम अष्टोत्तरीं करिताती ॥
जो माळ करविता वाचेसी वदविता । तया हृदयस्था नेणें कोणी
सोहं आत्मा प्रगट जो दाखवी वाट । सद्गुरु वरिष्ठ तोचि जाणा॥
तया उत्तीर्णता[4] व्हावया पदार्था । न देखों सर्वथा जनी म्हणे ॥

६. इंगळाच्या खाईप्रमाणें, विषाच्या ग्रासाप्रमाणें, अगर खड्गाच्या धारेप्रमाणें भक्ति कठीण आहे.

भक्ति ते कठीण इंगळाची[5] खाई[6] । रिघणें त्या डोहीं कठीण असे ॥
भक्ति ते कठीण विषग्रास घेणं । उदास पैं होणें जीवेंभावें ॥
भक्ति ते कठीण भक्ति ते कठीण । खड्गाची[7] धार बाण न सोसी तया ॥
भक्ति ते कठीण विचारून पाहे जनी । भक्तियोगें संतसमागमीं सर्वसिद्धि ॥

---

१ ठेवा. २ हातांत. ३ डोळ्याभोंवतीं गुंडाळलेलें वस्त्र. ४ ऋणांतून मुक्तता. ५ निखारा. ६ खाच. ७ तरवार.

७. घार पिलांवर झांप घालते, त्याप्रमाणें आम्हीं तुजवर आसक्ति ठेवितों.

पक्षी जाय दिगंतरा[1] । बाळकांसी आणी चारा ॥
घार हिंडते आकाशीं । झांप घाली पिल्लापाशीं ॥
माता गुंतली कामासीं । चित्त तिचें बाळापाशीं ॥
वानर हिंडे झाडांवरी । पिलीं बांधुनी उदरीं ॥
तैसीं आम्हांसी विठ्ठल माये । जनी वेळोवेळां पाहे ॥

८. दळत कांडत असतां नामयाची जनी देवाचें नाम घेते.

नाम विठोबाचें घ्यावें । मग पाऊल टाकावें ॥
नाम तारक[2] हे थोर । नामें तारिले अपार ॥
अजामेळ उद्धरिला । चोखामेळा मुक्तीस नेला ॥
नाम दळणीं कांडणीं । म्हणे नामयाची जनी ॥

९. गंगा सागराजवळ गेली असतां त्यानें तिचा अव्हेर केला आहे काय ?

गंगा गेली सिंधूपाशीं । त्याणें अव्हेरिलें[3] तिसी ॥
तरी तें सांगावें कवणाला । ऐसें बोले बा विठ्ठला ॥
जळ काय जळचरां[4] । माता अव्हेरी लेंकुरा ॥
जनी म्हणे शरण आलें । अव्हेरितां ब्रीद[5] गेलें ॥

१०. विठया, तुझी रांड रंडकी होऊन ती जन्मसावित्रीच्या चुडा ल्याली आहे.

अरे विठ्या विठया । मूळ मायेच्या कारट्या ॥
तुझी रांड[6] रंडकी झाली । जन्मसावित्रीचुडा[7] ल्याली ॥

---

१ सर्व पृथ्वीवर. २ तारणारें. ३ त्याग करणें. ४ मासे. ५ प्रतिज्ञा. ६ बायको. ७ बांगडी, सौभाग्यचिन्ह.

तुझें गेलें मढें । तुला पाहून काळ रडे ॥
उभी राहुनी अंगणीं । शिव्या देती दासी जनी ॥

११. पंढरीचा चोर धरून त्यास सोहं शब्दाचा मारा केल्याबरोबर देव काकुळतीस येतो.

धरिला पंढरीचा चोर । गळां बांधोनियां दोर ॥
हृदय बंदिखाना केला । आंत विठ्ठल कोंडिला ॥
शब्दें केली जडांजुडी[1] । विठ्ठलपायीं घातली बेडी ॥
सोहं शब्दाचा मारा केला । विठ्ठल काकुळती आला ॥
जनी म्हणे बा विठ्ठला । जीवें न सोडी मी तुजला ॥

१२. नवऱ्यामुलाबरोबर वऱ्हाड्यांस पक्कान्न मिळतें, त्याप्रमाणें नामदेवाबरोबर जनाबाईस देव मिळाला.

नोवरिया संगें वऱ्हाडियां सोहोळा।
मांडे पुरणपोळया मिळे अन्न ॥
परिसाचेनि संगें लोहो[2] होय सोनें ।
तयाचीं भूषणें श्रीमंतांसी ॥
जनी म्हणे जोड झाली विठोबाची ।
दासी नामयाची म्हणोनियां ॥

१३. रक्तश्वेत, श्यामनील, शून्यें पहात असतांच जनीचें अनाहतनादश्रवण.

शून्यावरि शून्य पाहे । तयावरि शून्य आहे ॥
प्रथम शून्य रक्तवर्ण । त्याचें नांव अधःशून्य ॥

---

१ जोड. २ लोखंड.

उर्ध्वशून्य श्वेतवर्ण[1]। मध्यशून्य श्यामवर्ण ॥
महाशून्य वर्ण नीळ। त्यांत स्वरूप केवळ ॥
अनुहातघंटा श्रवणीं। ऐकुनि विस्मय जाहली जनी ॥

### १४. चारी वाचेपलीकडच्या सोहंज्योतीचा नवलाव.

जोत पहा झमकली[2]। काय सांगूं त्याची बोली ॥
प्रवृत्ति निवृत्ति दोघीजणी। लीन होती त्याच्या चरणीं ॥
परा पश्यंती मध्यमा। वैखरेची झाली सीमा ॥
चार वाचा कुंठित जाहाली। सोहंज्योति उभारली ॥
जोत परब्रह्मीं जाणा। जनी म्हणे निरंजना ॥

### १५. त्रिकूट शिखरावर भ्रमरगुंफेंत जनीनें देवाचें दर्शन घेतलें.

रक्तवर्ण त्रिकूट[3] स्नान। श्रीहाट[4] पाहे श्वेतवर्ण ॥
श्यामवर्ण तें गोल्हाट[5]। नीळबिंदु औटपीठ[6] ॥
वरि भ्रमरगुंफा पाहे। दशमद्वारीं गुरु आहे ॥
नवद्वारांतें भेदुनी। दशमद्वारीं गेली जनी ॥

### १६. वामसव्य, अधोर्ध्व, चराचरीं, देवाचें दर्शन.

वामसव्य[7] दोहींकडे। देखूं कृष्णाचें रूपडें ॥
आतां खालीं पाहूं जरी। चहूंकडे दिसे हरि ॥
चराचरीं जें जें दिसे। तें तें अविद्याचि नासे ॥
माझें नाठवे मीपण। तेथें कैचें दुजेंपण ॥
सर्वांठायीं पूर्णकळा। दासी जनी पाहे डोळां ॥

---

१ पांढऱ्या रंगाचें. २ चमकली. ३ रजोगुणात्मक चक्र. ४ सत्त्वगुणात्मक चक्र. ५ तमोगुणात्मक चक्र. ६ अर्धमात्रात्मक ब्रह्मरंध्रचक्र. ७ डावी उजवीकडे.

१७. स्वरूपाचा पूर डोळ्यांवर आल्यानें डोळे झांकुळतात.

नित्य हातानें वारावें। हृदय अंतरीं प्रेरित जावें ॥
ऐसा स्वरूपाचा पूर। आला असे नेत्रांवर ॥
स्वरूपाचा पूर आला। पाहतां डोळा झांकुळला[1] ॥
जनी म्हणे ऐसा पूर। पाहे तोचि रघुवीर ॥

१८. तुला पाहतांच माझा शीण गेला.

माझा शीणभाग[2] गेला। तुज पाहतां विठ्ठला ॥
पाप ताप जाती। तुझें नाम ज्याचे चित्तीं ॥
अखंडित नामस्मरण। बाधूं न शके तया विघ्न ॥
जनी म्हणे हरिहर। भजतां वैकुंठीं त्या घर ॥

१९. देहभाव गेल्यावर विदेहसुखाची प्राप्ति.

देहभाव सर्व जाय। तेव्हां विदेही सुख होय ॥
तया निद्रे जे पहुडले[3]। भवजागृती नाहीं आले ॥
ऐसी विश्रांति लाधली। आनंदकळा संचरली ॥
त्या ऐक्यीं एक होतां। दासी जनी कैंची आतां ॥

२०. "नवल वर्तलें, नवल वर्तलें."

नवल वर्तलें नवल वर्तलें नवल गुरूचे पायीं।
कापुर जळुनि गेला तेथें काजळी उरली नाहीं ॥
साखर पेरुनि ऊंस काढिला कान झाला डोळा।
निबर[4] बायको भ्रतार तान्हा सासरा तो भोळा ॥

---

१ झांकणें, चकित होणें. २ श्रम. ३ निजले. ४ मोठी, वृद्ध.

नवल वर्तलें नवल वर्तलें नवल चोजवेना।
डोहामाजी मासोळीनें वांचविलें जीवना॥
नवल वर्तलें नवल वर्तलें अनाम चक्रपाणी।
गोकुळ चोरुनि नेलें तेथें कैंची दासी जनी॥

## २१. माझ्या मनांत जें जें होतें तें तें देवानें पुरविलें.

माझे मनीं जें जें होतें। तें तें दिधलें अनंतें॥
देह नेऊनि विदेही केलें। शांति देऊनि मीपण नेलें॥
मूळ हें दिलें क्रोधाचें। ठाणें केलें विवेकाचें॥
निजपदीं दिधला ठाव। जनी म्हणे दाता देव॥

## २२. द्वारांत उभ्या असलेल्या विठ्ठलास जनी पाहते.

श्रीमूर्ति असे बिंबली। तरी हे देहस्थिति पालटली॥
धन्य माझा इहजन्म। हृदईं विठोबाचें नाम॥
तृष्णा आणि आशा। पळोनि गेल्या दाही दिशा॥
नामा म्हणे जनी पाहे। द्वारीं विठ्ठल उभा आहे॥

## २३. मी देव खाते, देव पिते.

देव खाते देव पिते। देवावरि मी निजतें॥
देव देते देव घेते। देवासवें व्यवहारिते॥
देव येथें देव तेथें। देवाविणें नाहीं रितें॥
जनी म्हणे विठाबाई। भरुनी उरलें अंतरबाहीं॥

---

१ समजेना. २ पाणी.

### २४. जनाबाईच्या मागें जाऊन देव तिचें धुणें धुतो.

धुणें घेउनी काखेसीं। जनी गेली उपवासी ॥
मागें विठ्ठल धांवला। म्हणे कां टाकिलें मला ॥
कां गा धांवोनि आलासी। जाय जाय राऊळासी[1] ॥
चहूं हातीं धुणें केलें। जनी म्हणे बरें झालें ॥

### २५. जनीनें झाडलोट केली तर चक्रपाणी केर भरितो.

झाडलोट करी जनी। केर भरी चक्रपाणी ॥
पाटी घेउनीयां शिरीं। नेऊनियां टाकी दुरी ॥
ऐसा भक्तीसी भूलला। नीच कामें करूं लागला ॥
जनी म्हणे विठोबाला। काय उतराई होऊं तुला ॥

### २६. देवानें संतांस कसें साह्य केलें आहे?

द्रौपदीकारणें। पाठीराखा[2] नारायण ॥
गोरा कुंभाराच्या संगें। चिखल तुडवूं लागे अंगें ॥
कबिराच्या बैसोनि पाठीं। शेले विणितां सांगे गोष्टी ॥
चोखामेळयासाठीं। ढोरें ओढी जगजेठी ॥
जनीसंगें दळूं लागे। सुरवैर[3] म्हणती धन्य भाग्य ॥

### २७. चोखामेळा देवास आपल्या भक्तीनें भुलवितो.

चोखामेळा संत भला। तेणें देव भुलविला ॥
भक्ति आहे ज्याची मोठी। त्याला पावतो संकटीं ॥

---

१ देऊळ. २ रक्षण करणारा. ३ देवश्रेष्ठ.

चोखामेळयाची करणी । तेणें देव केला ऋणी ॥
लागा विठ्ठलचरणीं । म्हणे नामयाची जनी ॥

## २८. देव आणि संत दोन काय ?

आम्हीं आणि संत संत आणि आम्हीं । सूर्य आणि रश्मि काय दोन॥
दीप आणि सारंग[1] सारंग आणि दीप । ध्यान आणि जप काय दोन॥
शांति आणि विरक्ति विरक्ति आणि शांति। समाधान तृप्ति काय दोन
रोग आणि व्याधि व्याधि आणि रोग । देह आणि अंग काय दोन ॥
कान आणि श्रोत्र श्रोत्र आणि कान । यश आणि मान काय दोन॥
देव आणि संत संत आणि देव । म्हणे जनी भाव एक ऐसा ॥

## २९. जो संत आणि देव निराळे मानितो त्याचा विटाळ रजस्वलाही मानितो.

संत आणि देव मानी जो वेगळे । तेणें येथें आगळे[2] केले दोष ॥
माता ते वेगळी कुचें[3] ते उरींचे । म्हणोनियां त्यांचें मर्दन करी ॥
पाप तें वेगळें पुण्य तें आगळें । म्हणोनि गरैळ[4] पितो मद ॥
तयाचा विटाळ वाँहे[5] रजस्वला[6] । म्हणे जनी चांडाळा बोलावूं नका॥

## ३०. ज्याचा हरि सखा झाला त्यास सर्व विश्वही साह्य करतें.

ज्याचा सखा हरी । त्यावरि विश्व कृपा करी ॥
उणें पडों नेदी त्याचें । वारें सोसी आघातांचें[7] ॥
तयावीण क्षणभरी । कदा आपण नव्हे दुरी ॥
अंगा आपुले ओढोनि । त्याला राखे जो निर्वाणीं[8] ॥
ऐसा अंकित भक्तांसी । म्हणे नामयाची दासी ॥

---

१ सहा रंग. २ अधिक. ३ स्तन. ४ विष. ५ मानणें. ६ विटाळशी. ७ धक्का. ८ संकट.

# सेनान्हावी.

१. दुर्जनाची सुखानें मानखंडणा करावी.

मान करावा खंडण। दुर्जनाचा सुखें करून॥
लाथा हाणुनि घाला दुरी। निंदकासी झडकरी॥
त्याचा जाणावा विटाळ। लोकां पीडितो चांडाळ॥
त्याची संगती जयास। सेना म्हणे नर्कवास॥

२. धूम्रपान, पंचाग्निसाधन, न करितां केवळ नामाचेंच चिंतन करा.

नामाचें चिंतन श्रेष्ठ पैं साधन। जातील जळोनि महापापें॥
न लगे धूम्रपान पंचाग्निसाधन। करितां चिंतन हरि भेटे॥
बैसुनि निवांत करा एकचित्त। आवडी गावें गीत विठोबाचें॥
सकळाहुनि सोपें हेंचि पैं साधन। सेना म्हणे आण विठोबाची॥

३. क्षण एक वायां जाऊं न देतां नारायणाचें स्मरण करावें.

असाल तेथें नामाचें चिंतन। याहुनि साधन आणिक नाहीं॥
सोडवील माझा भक्ताचा कैवारी। प्रतिज्ञा निर्धारीं केली आम्हीं॥
गुण दोष याति न विचारी कांहीं। धांवे लवलाही भक्तकाजा॥
अवघे काळीं वाचे म्हणा नारायण। सेना म्हणे क्षण जाऊं न द्या॥

---

१ साह्यकर्ता. २ निश्चयपूर्वक. ३ लवकर.

### ४. गिरिकाननास जाल तर विभांडकाप्रमाणें रंभेकडून नागवून घ्याल.

कशासाठीं करितां खटपट। तप तीर्थ व्रतें अचाट ॥
नलगे शोधावें गिरिकाननें[1]। भावें रिघा विठ्ठला शरण ॥
विभांडक शृंगी तपस्वी आगळा[2]। क्षण न लागतां रंभेनें नागविला[3]॥
जाणोनि सेना निवांत बैसला। केशवराजा शरण रिघाला ॥

### ५. सेना पापाचा पुतळा असला तरी तूं उदाराचा राणा आहेस.

अन्यायी अन्यायी। किती म्हणोनि सांगों काई ॥
तूं तो उदाराचा राणा। क्षमा करी नारायणा ॥
काम क्रोध लोभ मोहो। नाडिलों यांचेनि पहाहो ॥
नावडे संतसंगति। नाहीं केली हरिभक्ति ॥
निंदा केली भाविकांची। चित्तीं आस धनाची ॥
सेना पापाचा पुतळा। तुज शरण जी दयाळा ॥

### ६. माझ्या मनांत जो भाव मी धरला आहे तो तूं सिद्धीस ने.

आतां ऐसें करी गा देवा। तुझी घडो पायसेवा ॥
मनामाजीं दुर्बुद्धि। न यावी माउलिये कधीं ॥
चित्तीं भाव[4] जो धरिला। सिद्धि न्यावा जी विठ्ठला ॥
सेना ह्मणे याविण कांहीं। लाभ दुसरा नाहीं ॥

### ७. तुमचें पाऊल देखिलें या माझ्या भाग्यास आज सीमाच नाहीं.

धन्य धन्य दिन। तुमचें झालें दरुषण ॥
आजि भाग्य उदया आलें। तुमचें पाऊल देखिलें ॥

---

१ पर्वतांतील अरण्य. २ श्रेष्ठ. ३ फसवणें. ४ हेतु, इच्छा.

पूर्वपुण्य फळा आलें । माझें माहेरें भेटलें ॥
सेना म्हणे झाला । धन्य दिवस आजि भला ॥

८. माझ्यासारख्या जडजीवांचा उद्धार केला ही संतांची कृपा मी किती म्हणून वर्णूं !

उदार तुम्ही संत । मायबाप[1] कृपावंत ॥
केवढा केला उपकार । काय वानूं मी पामरें[2] ॥
जडजीवां[3] उद्धार केला । मार्ग सुपंथ दाविला ॥
सेना म्हणे उतराई । होतां न दिसे कांहीं ॥

९. आज संतास पाहिलें हा सोन्याचाच दिवस होय.

आजि सोनियाचा दिवस । दृष्टीं देखिलें संतांस ॥
जीवां सुख थोर झालें । माझें माहेर भेटलें ॥
अवघा निरसला[4] शीण । देखतां संतचरण ॥
आजि दिवाळी दसरा । सेना म्हणे आले घरा ॥

१०. समर्थाचें बाळ समर्थ नसतें काय ?

अन्यायी अपराधी लडिवाळ संतांचा ।
तेथें कळिकाळाचा रीघ[5] नाहीं ॥
समर्थाचें बाळ समर्थचि जाण ।
वागवी अभिमान म्हणतां त्याचे ॥
अन्यायाच्या राशी उदंड केल्या जरी ।
तरी क्षमा करी मायबापा ॥
कल्पतरुछाया बैसला सेना न्हावी ।
दया ते वागवी बहु पोटीं ॥

---

१ आईबाप. २ हीन, दीन. ३ अडाणी प्राणी. ४ दूर होणें. ५ प्रवेश.

### ११. सेना परमार्थामध्यें सुद्धां न्हावीच आहे.

आम्हीं वारिक वारिक । करूं हजामत बारीक ॥
विवेक दर्पण अयना[1] दावूं । वैराग्य चिमटा हालवूं ॥
उदक शांति डोई घोळूं । अहंकाराची शेंडी पिळूं ॥
भावार्थाच्या बगला झाडूं । काम क्रोध नखें काढूं ॥
चौवर्णां देउनि हात । सेना राहिला निवांत ॥

### १२. पांडुरंग बोलावीत आहे असें सेना सांगतो.

करितों विनवणी । हात जोडूनियां दोन्ही ॥
हेंचि द्यावें मज दान । करा हरीचें चिंतन ॥
जातों सांगूनियां मात[2] । पांडुरंग बोलावित ॥
सोडा द्वादशी पारणें । सुखें करावें कीर्तन ॥
दिवस माध्यान्हीं आला । सेना वैकुंठासी गेला ॥

### १३. श्रावण वद्य द्वादशी दिवशीं सेना समाप्त झाला.

माझें झालें स्वहित । तुम्हां सांगतों निश्चित ॥
करा हरीचें चिंतन । गावे उत्तम हे गुण ॥
श्रावण वद्य द्वादशी । सेना समाप्त त्या दिवशीं ॥

---

१ आरसा. २ गोष्ट.

# कान्होपात्रा.

१. विषयाच्या संगतीनें इंद्रचंद्रांची कोण गति झाली ?

विषयाचे संगतीं । नाश पावले निश्चितीं ॥
भगें पडलीं इंद्राला । भस्मासुर भस्म झाला ।
चंद्रा लागला कलंक । गुरुपत्नीसीं रतला देख ॥
रावण मुकला प्राणांसी । कान्होपात्रा म्हणे दासी ॥

२. तुझ्या चरणापाशीं ठाव दे इतकेंच कान्होपात्रा दासी विठ्ठलाजवळ मागते.

दीन पतित[1] अन्यायी । शरण आल्यें विठाबाई ॥
मी तों आहे यातिहीन । नकळे कांहीं आचरण ॥
मज अधिकार नाहीं । भेटी देईं विठाबाई ॥
ठाव देईं चरणापाशीं । तुझी कान्होपात्रा दासी ॥

३. तुझी म्हणवीत असतां दुसऱ्याचा अंगसंग झाल्यास त्यांत उणेपणा कोणाकडे ?

पतितपावन म्हणविसी आधीं । तरी कां उपाधि भक्तांमागें ॥
तुझें म्हणवितां दुजें अंगसंग । उणेपणा सांग कोणाकडे ॥
सिंहाचें भोंतुक जंबुकें[3] पैं नेतां । थोराचिया माथां लाज वाटे ॥
म्हणे कान्होपात्रा देहसमर्पणें । करावें जतन ब्रीदासाठीं ॥

---

१ पामर. २ खाद्य, खाऊ. ३ कोल्हा.

४. जन्मोजन्मीं विठ्ठलचरण पहावयास मिळाले तर आनंदानें मी जन्म घेईन.

जन्मांतरींचें सुकृत[1] आजीं फळासी आलें।
म्हणोनि देखिले विठ्ठलचरण ॥
धन्य भाग आजि डोळियां लाधलें।
म्हणोनि देखिले विठ्ठलचरण ॥
धन्य चरण माझे या पंथीं चालिले।
म्हणोनि देखिले विठ्ठलचरण ॥
येउनियां देहासी धन्य झालें।
म्हणुनि देखिले विठ्ठलचरण ॥
घाली गर्भवासा कान्होपात्रा म्हणे।
जन्मोजन्मीं देखेन विठ्ठलचरण ॥

५. नष्ट दुराचाऱ्यांचा उद्धार करणाऱ्या नामाची माळा कान्होपात्रा गळ्यांत घालते.

ज्याचें घेतां मुखीं नाम। धाकीं पडे काळ यम ॥
ऐशी नामाची थोरी। उद्धरिले दुराचारी ॥
नष्ट गणिका अजामेळ। वाल्मिकी झाला तो सोज्वळ[2] ॥
ऐशी नाममाळा। कान्होपात्रा ल्याली[3] गळां ॥

---

१ पुण्य. २ शुद्ध, पवित्र. ३ धारण करणें, घालणें.

# भानुदास.

१. आमच्या कुळांत पंढरीच्या विठ्ठलाचें नाम घेणें इतकाच नेम आहे.

आमुचिये कुळीं पंढरीचा नेम। मुखीं सदा नाम विठ्ठलाचें ॥
न कळे आचार न कळे विचार। न कळे वेव्हार प्रपंचाचा ॥
असों भलते ठायीं जपूं नामावळी। कर्माकर्मा होळी होय तेणें ॥
भानुदास म्हणे उपदेश आम्हां। जोडिला परमात्मा श्रीराम हा ॥

२. पंढरपूर ही नीळांमाणिकांची खाणी कितीहि लुटली तरी आगरांत जशीच्या तशीच शिल्लक आहे.

माणिकाचें तारूं चंद्रभागे आलें। भूषण तें जालें सनकादिकां ॥
पंढरपुर हें नीळियाची खाणी। नवलाव साजणी[1] देखियेला ॥
अवघिया देशांसी न्यावया पुरलें। आगरीं[2] उरलें जैसें तैसें ॥
भानुदास म्हणे नीळ हा चोखडा। सुजडु[3] हा जडां[4] जीवनमुद्रा[5] ॥

३. उन्मनी समाधि मनास नाठवून विठोबास पाहणें यांतच सुख वाटतें.

उन्मनी समाधि नाठवे मनासी। पाहतां विठोबासी सुख बहु ॥
आनंदी आनंद अवघा परमानंद। आनंदाचा कंद विठोबा दिसे ॥
जाग्रती स्वप्न सुषुप्ति नाठवे। पाहतां सांठवे रूप मनीं ॥

---

१ मैत्रीण. २ खाण, खजिना. ३ जडलेला, शोभायमान. ४ अज्ञानी जीव. ५ जीवनकला.

नित्यता दिवाळी नित्यता दसरा । पाहतां साजिरा[1] विठ्ठलदेव ॥
भानुदास म्हणे विश्रांतीचें स्थान । विठ्ठल निधान[2] सांपडलें ॥

४. भानुदासास सुळावर देण्यास नेलें असतां तो देवाचें चिंतन करितो.

रायें कंठमाळ देवासी घातली । देवें त्या दिधली भानुदासा ॥
कोणी नेली माळ करती त्याचा शोध । देखिली प्रसिद्ध याचे गळां ॥
राजदूतीं नेला म्हणती गे हा चोर । रायानें विचार नाहीं केला ॥
शूळीं द्यावया भानुदास नेला । तेणें आठविला पांडुरंग ॥

५. माझा प्राण कंठांत आला असल्यानें तूं आतां अंत पाहूं नकोस.

देवा कोठवरी अंत पाहतोसी । प्राण कंठापाशीं ठेवियेला ॥
पळमात्र चित्ता नाहीं समाधान । चिंतेनें व्यापून घेतलेंसे ॥
नानापरीचें दुःख येवोनि आदळत । शोकें व्याकुळ चित्त होत असे ॥
यासी तों उपाय न कळेचि मज । शरण आलों तुज देवराया ॥
इच्छा पुरवूनि सुखरूप ठेवीं । भानुदास पायीं ठाव मागे ॥

६. वर आकाश तुटून पडलें तरी मी तुझीच वाट पाहीन.

जरि आकाश वर पडों पाहे । ब्रह्मगोळ[3] भंगा जाये ।
वडवानळ[4] त्रिभुवन खाय । तरी तुझीच वाट पाहें गा विठोबा ॥
न करीं आणिकाचा पांगिला[5] । नामधारक तुझाचि अंकिला ॥ध्रु.॥
सप्तसागर एकवट होती । जैं हे विरुनी जाय क्षिती ।

१ सुंदर. २ ठेवा. ३ ब्रह्मांड. ४ समुद्राच्या पोटांत राहून समुद्राचें पाणी जाळून टाकणारा अग्नि. ५ आंकित. ६ पृथ्वी.

पंचमहाभूतें प्रळय पावती। परि मी तुझाचि सांगाती गा विठोबा॥
भलतैसें वरपडों भारी। नाम न संडों न टळों निर्धारीं।
जैसी पतिव्रता प्राणेश्वरीं[1]। विनवी भानुदास म्हणे आधारीं गा विठोबा॥

७. समर्थांच्या कृपेनें कोरड्या काष्ठासही अंकुर फुटतात.

कोरडियां काष्ठीं अंकुर फुटले। येणें येथें झालें विठोबाचें॥
समर्थांचा आम्हीं धरिला आधार। तरीच सत्वर आला येथें॥
माझिये संकटीं आलासी धाऊनि। भानुदास चरणीं लागतसे॥

---

१ पति.

# जनार्दनस्वामी.

## १ जनार्दनस्वामींचा अनुभव.

### १. औदुंबरवासी गुरूंच्या ध्यानाचें वर्णन.

अनंत निर्गुण सर्वांठायीं पूर्ण । न करी निर्वाण[1] दासालागीं ॥
हांके बरोबरीं धांवोनि सत्वरीं । भक्तालागीं तारी गुरुनाथ ॥
सुंदर तें ध्यान वसे औदुंबरीं । व्याघ्रचर्म[2]धारी शोभतसे ॥
काषायं[3] अंबर दंडकमंडलु । डमरु त्रिशूलु शंखचक्र ॥
किरीट कुंडलें रुद्राक्षांच्या माळा । वैजयंती गळां हार रुळे[4] ॥
सूर्यचंद्र नेत्र शेषफणी चक्र । पीतांबर वस्त्र परिधान ॥
गुरुचरणीं सर्व तीर्थांची मिरासी[5] । म्हणोनि जगासी उद्धरिती ॥
जनार्दन म्हणे न लगे ब्रह्मज्ञान । गुरुचरणीं मन राहो सदा ॥

### २. पापराशींतून तारण्याची जनार्दनस्वामींनीं केलेली गुरूची याचना.

जन्मा आलों मी संसारीं । सखी मानिली अंतुरीं ।
निंदा केली द्विजवरीं । कैसा सद्‌गुरु जोडेल ॥
नाहीं पूजिलें गुरुवरा । नाहीं नमिलें द्विजवरां ।
नाहीं केलें भजन सारा । कैसा भव हा आटेल ॥
जालों परधर्मी रत । अधर्म करितां वाटे हित ।

---

१ नाश. २ कातडें. ३ भगवें. ४ हालणें. ५ हक्काची जागा.

जन्ममरणाची खंत । कैसी आतां वाटेल ॥
संसारीं मी दुखावलों । त्रिविधतापें मी पोळलों ।
दुःखी होऊनियां आलों । औदुंबरीं या ठाया ॥
आंकलखोप कृष्णातीरीं । गुरु वसती औदुंबरीं ।
भक्तवत्सल तारी तारी । म्हणऊनि चरण वंदिले ॥
जनार्दन पापरासी । करुनि आलों तुजपासीं ।
तारिसील या भरंवसी । धरणें घेतलें दारांत ॥

३. " तरी आम्हीं कोठें जावें । कवण्या देवा आराधावें ?"

नरहरि गुरुराया । दीनबंधु सखया ।
करिसी दासां अंतराया । काय वाटे बडिवार[1] ॥
निशिदिनीं हाका । वियोगानें वाढे शोका ।
निराश वाटे सेवका । निद्रा आली तुज काय ॥
किंवा कोठें गुंतलासी । किंवा येथूनि गेलासी ।
काय आम्हीं पापराशी । म्हणउनि लपसी गुरुराया ॥
तरि आम्हीं कोठें जावें । कवण्या देवा आराधावें ।
दत्ता कृपावंता अवघें । शून्याकार त्रैलोक्य ॥
गुरो मौन त्वां धरिलें । आम्हां दुःखानें व्यापिलें ।
जनार्दनास आवरिलें । नाहीं सद्गुरु दीनबंधु ॥

४. आतां तुमच्या पायांवाचून मी कांहींच जाणत नाहीं.

आतां गुरुराया परिसा विज्ञापना । दासाची करुणा येऊं द्यावी ॥
नेणोनियां सोय फिरलों दिशा दाहीं । झालें दुःख देहीं बहुसाल[2] ॥
तुमची ब्रिदावळी[3] पतितपावन । कीर्ति हे ऐकोन शरण आलों ॥

१ डौल. २ अतिशय. ३ प्रतिज्ञा, शोभा.

माझा मायबाप गणगोत[1] बंधु । तूंचि कृपासिंधु गुरुराया ॥
आतां कांहीं नेणें तुमच्या पायांविणें । संसाराचें पेणें[2] दूर केलें ॥
जोडोनियां हात शिर पायांवरी । ठेविलें निर्धारीं जनार्दनें ॥

५. तूं लवकर भेट देऊन माझे प्राण वांचविण्याचें यश घे.

गुरुसख्या तुजविण । जाऊं पाहे माझा प्राण ॥
कां हो कठिण केलें मन । पाहे नेत्र उघडून ॥
माता पिता म्हणविलें । तरि कां निर्वाण[3] मांडिलें[3] ॥
आतां यावें लवकरी । भेट द्यावी बा सत्वरीं ॥
यश घेई गुरुराया । जनार्दन ठेवीं पायां ॥

६. गुरुयात्रेस जाऊन अगर चरित्र वाचूनही भवाचें निर्मूलन होईल.

धन्य कृष्णातीर धन्य औदुंबर । जेथें गुरुवर वसतसे ॥
धन्य तेचि नर येती जे यात्रेसी । दर्शनमात्रें त्यांसी मोक्ष जोडे ॥
अनंत जन्माचीं पातकें संचित । नुरतीं[4] किंचित् तीर्थ घेतां ॥
वाचितां चरित्र सद्गुरु स्वामीचें । निर्मूलन भवाचें सत्य होय ॥
नामस्मरणें ज्याच्या सद्गुरुचि होणें । व्यर्थ चिंता वाहणें संसाराची ॥
गुरु गीतीं गावा भावें चित्तीं ध्यावा । सगुण पहावा डोळेभरी ॥
जनार्दन म्हणे तीर्थ त्याचे पासी । चारी मुक्ति दासी होती त्याच्या ॥

---

१ नातेवाईक. २ मुक्काम. ३ अंत पाहणें. ४ उरत नाहींत.

## २ जनार्दनस्वामींचा एकनाथास उपदेश.

### ७. तूं पंढरीचा सोपा मार्ग पतकर असें जनार्दन एकनाथास सांगतात.

नको गुंतूं लटिक्या प्रपंचासी बापा । मार्ग आहे सोपा पंढरीचा॥
न लगे पुसावें आटाआटी[1] कांहीं । आणिकें प्रवाहीं गुंतूं नको ॥
भांबावल्यापरि जन झाले मूढ । विसरले दृढ विठोबासी ॥
म्हणे जनार्दन एकनाथा निकें[2] । साधी तूं कौतुकें हेंचि वर्म ॥

### ८. विठ्ठलाचा मंत्र जपण्याविषयीं जनार्दनांची एकनाथास आज्ञा.

आणिक या सृष्टीं साधन पैं नाहीं । घेईं पां लवलाही नाम वाचे ॥
उभा दिगंबर कटीं ठेवुनी कर । शोभतसें तीर चंद्रभागा ॥
पुंडलिकें निज[3] साधिलें साधन । तें तूं हृदयीं जाण धरी भावें ॥
म्हणे जनार्दन एकनाथा हृदयीं । विठ्ठल मंत्र ध्यायी सर्वकाळ ॥

### ९. संतांस नमन कर, व आलेल्यांस अन्न दे.

सर्वांभूतीं भाव ठेवूं नको दुजा[4] । तेणें गरुडध्वजा समाधान ॥
संतांसी नमन आलिया अन्नदान । यापरतें कारण आणिक नाहीं॥
सर्वभावें वारी पंढरीची करी । आणिक व्यापारीं गुंतूं नको ॥
म्हणे जनार्दन घेईं ह्याचि बोध । सांडोनि सर्वथा द्वेषभेद ॥

### १०. अन्न परब्रह्म असल्यानें जातीचा विचार करूं नको.

आलिया अतिथां[5] द्यावें अन्नदान । याहुनी साधन आणिक नाहीं ॥
ज्ञातीसी[6] कारण नाहीं पैं तत्त्वतां । असो पैं भलता अन्न द्यावें ॥

---

१ श्रम. २ चांगलें. ३ आपलें, निकट. ४ दुसरा. ५ याचक. ६ जात.

अन्न परब्रह्म वेदांतीं विचार । साधी हाचि निर्धार प्रेमतत्त्वें ॥
म्हणे जनार्दन यापरतें आणिक । नाहीं दुजें देख एकनाथा ॥

### ११. जडभारी पडतां संतच तुला सहाकारी होतील.

संकल्प विकल्प यावरी घालीं शून्य । मन करी निमग्न हरिपायीं ॥
उपासना दृढ संतांचे चरणीं । तेचि पैं निर्वाणीं तारक तुज ॥
पडतां जडभारी[1] संत साह्यकारी[2] । सर्वभावें हरि तेचि होती ॥
म्हणे जनार्दन एकनाथा न विसंबें[3] । सोपा मार्ग ऐके सर्वभावें ॥

### १२. मन शुद्ध झाल्यास भाविकांस देव बसल्याठायींच दिसतो.

तीर्थपर्यटन कासया करणें । मन शुद्ध होणें आधीं बापा ॥
तीर्था जाऊनि काय मन शुद्ध नाहीं । निवांतचि पाही ठायीं बैसे ॥
मन शुद्ध जालिया गृहींच देव असे । भाविकांसी दिसे बैसल्या ठायीं ॥
म्हणे जनार्दन हाचि बोध एकनाथा । याहूनि सर्वथा श्रेष्ठ नाहीं ॥

### १३. मोत्यांची चौकडी, मण्याची ज्योत, अगर तेलावांचून दीप्तीचा प्रकाश.

उदयेचे[4] तीन द्वितीयेचे[5] तीन । अविनाश देखणें संध्याकाळीं ॥
संध्याकाळीं भावना टाकुनियां द्यावी । तेणेंचि हो घ्यावी समाधि सुखें ॥
एक एक चक्रें आकाशाएवढीं । त्यामध्यें चौकडी मोतियांची ॥
मणियाची ज्योति संध्याकाळीं वाती । तेलाविण दीप्ति पाजळिल्या ॥
जनार्दन म्हणे एकनाथा घेईं । समाधि हे पायीं सद्गुरूच्या ॥

---

१ संकट. २ सहाय ३ विसरणें. ४ सकाळ. ५ दोन प्रहर.

### १४. समाधीच्या तीन्ही निरनिराळ्या वेळेस निरनिराळें देखणें.

उदय समाधि लागो तीन वेळ । अवघा ब्रह्मांडगोळ उदयो होतो
चक्रामध्यें चक्र येती व्योमाकार । आदि मध्य हेरे[1] ज्योति त्याची॥
द्वितीयप्रहरीं समाधि कैसी परी । गुरुपुत्रा हारी[2] येणें रूपें ॥
प्रथम समाधि निबिड सर्पाकार । त्यामध्यें आकार चक्राचे ते ॥
झळकती माणिक दिव्य रत्नखाणी । अविनाश देखणी चिन्मयाची
उदयाची ज्योति द्वितीयेचा मणि । हीं दोन्हीं देखणीं झाली बापा
उदयाच्या तीन द्वितीयेच्या तीन । आविनाश देखणें संध्याकाळीं॥
संध्याकाळीं संदेह टाकुनियां द्यावें। त्याचेनि पैं ध्यावें समाधिसुख
एक चक्र येती आकाशाएवढी । त्यामध्यें चौकडी मोतियांची ॥
मणियाचीज्योति संध्याकाळीं जे वानिती।तेलाविण दीप्तिपाजळल्या
जनार्दन म्हणे एकनाथा घेई । सोहं याचि देहीं समाधिसुख ॥

### १५. कानडोळे धरतांच आदित्याचे उमाळे पाहणें हें समाधीच्या अपूर्णत्वाचें चिन्ह होय.

देहाची समाधि लागे तीन वेळां। आपुली जीवनकळा शोधावी हे॥
कर्णीं घालूनियां बोटें अंगुळ्या नेत्रांत निकटे। तेणें विकाशुनि भेटे शुभ्रवर्ण ॥
तयाचे हें नाम बिंब जीवदशा । तेणें स्वरूप दिशा भरुनि येती ॥
तितक्यामध्यें न सोडावी समाधि । त्याचेपुढें शोधी गुरुपुत्रा ॥
स्वामीनें पुसिलें कैसें काय झालें। कैसें तुज भासलें आत्मरूप ॥
शिष्य म्हणे स्वामी धरितां कान डोळे । एकाएकीं उमाळे आदित्याचे ॥

१ पहा. २ पंक्ति, ओळ.

विकासिला निर्मळ जैसा चंद्र दिसे । येताहे प्रकाशे आत्माराम ॥
म्हणे जनार्दन नव्हे एकनाथा । समाधि पहातां आळस केला ॥

### १६. स्वरूपदर्शनापर्यंत समाधि सोडूं नये.

शिष्य म्हणे स्वामी पुढें कैसें पहावें । रिघत हें जावें अभ्यासासी॥
स्वामी म्हणे बापा समाधि घेईं आतां । तुझिया विकल्पता[1] निववीतों
आशंका जे झाली तुझी तुज ठेली । आम्ही नाहीं विचारिली समाधि तुज ॥
प्रथम विकास पहावा शुभ्रवर्ण । त्याचे पुढें चांदणें चकचकित ॥
खद्योताचे वाणी सूर्य तारागण । पुढें शोध जाण घेत जावा ॥
बैसावें निश्चळ त्याचे अग्रीं डोळे । पहावें केवळ हंसु तैसें ॥
त्यामध्यें रिघावें स्वरूप पहावें । परि समाधि ही जीवें सोडूं नये॥
जिवाचा हा शिव देहाचा कुळस्वामी । तो अविनाशखाणी[2] प्रगटतो
म्हणे जनार्दन त्या पोटीं रिघावें । एकनाथा पहावें आत्मरूप ॥

### १७. यापुढें जो बोलेल त्यास पतन होईल.

मन स्वस्थ चित्तीं निश्चल मध्यरात्रीं ।
गुरुगुह्याचे एकांतीं रिघावें हो ॥
हंसा अंगींचा डोळा विकाशुनी कमला ।
त्याचे मध्यस्थला हेरीत[3] जावें ॥
चिन्मय अविनाश प्रगटती ज्योत ।
तोचि प्राणनाथ देहाचा हा ॥
त्यापुढें आभास दिसे नीलवर्ण ।
तेंचि स्वरूप जाण विराटाचें ॥

---

१ संशय. २ अविनाश स्वरूपाचा. ३ पाहणें.

जें ब्रह्मांडीं असे तेंचि पिंडीं दिसे।
बोलायाचा भास नाहीं पुढें ॥
प्रथम समाधि बाहेर घ्यावी आधीं।
तेंही स्वरूप वेधी समरसावें ॥
यापुढें समाधि दुजी सांगेल कोण।
त्यासी होईल पतन निश्चयेंसी ॥
म्हणे जनार्दन एकनाथापासीं।
हेंचि भरूनि घेसी ओहं सोहं ॥

# एकनाथ

## १ गुरुस्तुति.

### १. एकनाथांची गुरुपरंपरा.

जो निर्गुण निराभास। जेथून उद्भव शबलं[1] ब्रह्मास।
आदिनारायण म्हणती ज्यास। तो सर्वांस आदिगुरु ॥
तयाचा ब्रह्मा अनुगृहीत[2]। ब्रह्मा अत्रीस उपदेशीत।
अत्रिपाद प्रसादित। श्रीअवधून दत्तात्रय ॥
दत्तात्रय परंपरा। सहस्रार्जुन यदु दुसरा।
जनार्दन शिष्य तिसरा। केला खरा कलियुगीं ॥
जनार्दनकृपेस्तव जाण। समूळ निरसलें भवबंधन।
एकाजनार्दना शरण। झाली संपूर्ण परंपरा ॥

### २. एकनाथाची गुरुपूजा.

मनोभाव जाणोनि माझा। सगुणरूप धरिलें वोजा[3]।
पाहुणा सद्गुरुराजा। आला वो माय ॥
प्रथम अंतःकरण जाण। चित्त शुद्ध आणि मन।
चोखाळोनि आसन। स्वामीसी केलें ॥
अनन्य आवडीचें जळ। प्रक्षाळिले चरणकमळ।
वासना समूळ। चंदन लावी ॥
अहं जाळियला धूप। सद्भाव उजळिला दीप।
पंचप्राण हे अमूप। नैवेद्य केला ॥
रजतम सांडोनि दोन्ही। विडा दिला सत्त्वगुणी।
स्वानुभवें रंगोनि। सुरंग[4] दावी ॥

---

१ मायायुक्त. २ उपदेशित. ३ सुंदर रीतीचें. ४ उत्तम रंग.

एकाजनार्दनीं पूजा । देवभक्त नाहीं दुजा ।
अवघाचि सद्गुरुराजा । होवोनि ठेला ॥

३. परमार्थ साधावयास एका सद्गुरूचेंच साह्य पाहिजे.

साधावया परमार्था । साह्य नव्हती माता पिता ॥
साह्य न होत व्याही जांवई । आपणां आपण साह्य पाहीं ॥
साह्य सद्गुरु समर्थ । तेचि करिती स्वहित ।
एका जनार्दनीं शरण । नोहे एकपणावांचून ॥

४. गुरूनें मला उदयअस्तावांचून प्रकाश दाखविला.

अभिनव[1] गुरूनें दाखविलें । अहं सोहं माझें गिळिलें ॥
प्रपंचाचें उगवोनि[2] जाळें । केलें षड्वैरियांचें[3] तोंड काळें ॥
उदयो अस्ताविण प्रकाश । स्वयें देहीं दाविला भास ॥
मीपण नाहीं उरलें । एकाजनार्दनीं मन रमलें ॥

५. जनार्दनानीं मला देव दाखविला हा माझा अनुभव घ्या.

सांचपणें[4] देवा शरण पैं जाती । तया वैकुंठपति विसरेना ॥
जैसी कन्या दूरदेशीं एकटी । रात्रंदिवस संकटीं घोकी मायबाप ॥
पतिव्रतेचें सर्व मन पतिपायीं । तैसा देव ठायीं तिष्ठतसे[5] ॥
एकाजनार्दनीं मज हा अनुभव । जनार्दनें देव दाखविला ॥

६. साधनाच्या कोणत्याही आटी न करितां जनार्दनानें
माझ्या देहींच मला देव दाखविला.

अभिनव[6] सांगतां विस्मयो दाटला । देहींच भासला देव माझ्या ॥
नवल कृपेचें विंदान कैसें । जनार्दनें सरिसें[7] केलें मज ॥

---

१ कौतुक. २ सोडवणें. ३ कामक्रोधादिक सहा. ४ खरोखर. ५ उभा रहाणें. ६ कौतुक. ७ सारखे, बरोबर.

साधनाची आटी[1] न करितां गोष्टी। हृदयसंपुष्टीं[2] दाविला देव ॥
एकाजनार्दनीं एकपणें शरण। नकळे महिमान कांहीं मज ॥

७. जनार्दनाच्या कृपेनें मी उघडें परब्रह्म अनुभवीत आहे.

सर्वभावें दास झालों मी उदास। तोडिला मायापाश जनार्दनें ॥
माझें मज दावियलें माझें मज दावियलें। उघडें अनुभविलें परब्रह्म ॥
रविबिंबापरी प्रकाश तो केला। अंधार पळविला कामक्रोध ॥
एकाजनार्दनीं उघडा बोध दिला। तोचि ठसावला[3] हृदयामाजीं ॥

८. जग परब्रह्म पाहणें हेंच गुरुकृपेचें वर्म होय.

दृष्टी देखे परब्रह्म। श्रवणीं ऐके परब्रह्म ॥
रसना सेवी ब्रह्मरस। सदा आनंद उल्हास ॥
गुरुकृपेचें हें वर्म। जग देखे परब्रह्म ॥
एकाजनार्दनीं चराचर। अवघें ज्यासी परात्पर ॥

९. गुरु हाच परमात्मा परेश असा ज्याचा विश्वास त्याचे घरीं देव राबतो.

गुरु परमात्मा परेशु[4]। ऐसा ज्याचा दृढ विश्वासु ॥
देव तयाचा अंकिला। स्वयें संचला[5] त्याचे घरीं ॥
एकाजनार्दनीं गुरु देव। येथें नाहीं वा संशय ॥

---

१ त्रास. २ देव ठेवण्याची संबळी. ३ बिंबणें, बाणणें. ४ श्रेष्ठ देव. ५ भरला.

# २. उपदेश.

### १०. गोड परमार्थ कडू वाटतो हें विषयरोगाचें विचित्र विंदान नव्हे काय ?

नवल रोग पडिपाडु[1] । गोड परमार्थ झाला कडू ॥
विषयव्याधीचा उफाडा[2] । हरिकथेचा घ्यावा काढा ॥
ऐसा रोग देखोनि गाढा । एकाजनार्दन धांवे पुढां ॥

### ११. निरपेक्षता.

आधीं घेई निरपेक्षता । त्याचे चरण वंदीन माथां ॥
निरपेक्ष जेथें घडे । यमकाळ पायीं जोडे ॥
निरपेक्षाची आवडी । ब्रह्मज्ञान घाली उडी ॥
निरपेक्षेवांचून । नाहीं नाहीं रे साधन ॥
एकाजनार्दनीं शरण । निरपेक्ष पाविजे ज्ञान ॥

### १२. "अनुताप जाहलिया सहज समाधि."

अनुताप[3]पावांचुनी नाम नये मुखा । वाउगाचि देखा शीण होय ॥
मुख्य तो संकल्प अनुताप वाहे । मग चित्त होय शुद्ध तेणें ॥
अनुताप जाहलिया सहज समाधि । तुटेल उपाधि सहजचि ॥
एकाजनार्दनीं अनुतापें पाहे । मग देव आहे जवळी तया ॥

### १३. अनुतापानें त्रिविधताप जातील.

अनुताप नाहीं ज्यासी । विवेक नुपजे मानसीं ॥
मुख्य पाविजे अनुताप । तेणें निरसे[4] त्रिविध ताप ॥

---

१ थोरवी. २ जोर. ३ पश्चात्ताप. ४ दूर होणें, नाहींसें होणें.

अनुतापावांचून । ब्रह्मज्ञान होय दीन ॥
एकाजनार्दनीं शरण । तैंच अनुताप बाणे पूर्ण ॥

१४. अविश्वास हा दोषांचा मुकुटमणि आहे.

अविश्वासापुढें । परमार्थ कायसें बापुडें ॥
अविश्वासाची राशि । अभिमान येतसे भेटीसी ॥
सदा पोटीं जो अविश्वासी । तोचि देखे गुणदोषांसी ॥
सकळदोषां मुकुटमणी । अविश्वास तोचि जनीं ॥
एकाजनार्दनीं विश्वास । नाहीं त्यास भय कांहीं ॥

१५. लोखंडाची बेडी तोडून सोन्याची घालून घेण्यांत काय अर्थ ?

लोखंडाची बेडी तोडी । आवडी सोनियाची घडी ॥
मी ब्रह्म म्हणतां अभिमान । तेथें शुद्ध नोहे ब्रह्मज्ञान ॥
जैसी देखिली जळगार[१] । शेवटीं जळाचि निर्धार ॥
मुक्तपणें मोला चढलें । शेवटीं सोनियाचे फांसां[२] पाडिलें ॥
एकाजनार्दनीं शरण । बद्धमुक्ता ऐसा शीण ॥

१६. "एक ते करूं करूं म्हणतांचि गेले."

एक नरदेह नेणोनि वायां गेले । एक न ठके[३] म्हणोनि उपेक्षिले ।
एक ते गिळिले ज्ञानगर्वें ॥
एक ते साधनीं ठाकिले[४] । एक ते करूं करूं म्हणतांचि गेले ।
करणें राहिलेंसे तैसें ॥

१ पाण्याची गार. २ पाश. ३ घडणें. ४ त्यागणें. ५ फसणें.

ज्ञानें व्हावी ब्रह्मप्राप्ति । तें ज्ञान वेंची विषयासक्तीं ।
भांडवल नाहीं हातीं । मा मुक्ति कैंची ॥
स्वप्नींचें निजधनें । जाग्रतीं नोहे धर्म ।
ब्रह्माहमस्मि हेंही समाधान । सोंलीव भ्रम ॥
अभिमानाचिया स्थिती । ब्रह्मादिकां पुनरावृत्ति[१] ।
ऐसी वेदश्रुति । निश्चयें बोले ॥
एकाजनार्दनीं एकपण अनादि । अहं आत्मा तेथें समूळ उपाधि ॥

## १७. दोन साधनाखेरीज तिसरें साधन नको.

हींचि दोनीं पैं साधनें । साधकें निरंतर साधणें ॥
परद्रव्य परनारी । यांचा विटाळ मनें धरीं ॥
नको आणिक उपाय । सेवीं सद्गुरूचे पाय ॥
म्हणे एकाजनार्दन । न लगे आन तें साधन ॥

## १८. जेथें अर्थ आहे तेथें परमार्थ नाहीं.

अर्थ[२] नाहीं जयापाशीं । असत्य स्पर्शेना तयासी ॥
अर्थापाशीं असत्य जाण । अर्थापाशीं दंभ पूर्ण ॥
अर्थापोटीं नाहीं परमार्थ । अर्थापोटीं स्वार्थ घडतसे ॥
अर्थ नको माझे मनीं । म्हणे एकाजनार्दनीं ॥

## १९. हिंगाच्या संगतीनें कस्तुरीचा वास नाहींसा होत नाहीं काय ?

कस्तुरी परिमैळ[३] नाशितसे हिंग । ऐसा खळाचा संग जाणिजेती ॥
साकरेचे आळां[४] निंब जो पेरिला । शेवटीं कडू त्याला फळें पत्रें ॥

१ पुनर्जन्म. २ पैसा. ३ सुवास. ४ आळें.

चंदनाचे संगें हिंगण वसती । परि चंदनाची याती वेगळीच ॥
एकाजनार्दनीं हा अभाविकाचा गुण । वमनासमान[1] लेखूं आम्हीं[2] ॥

२०. अरण्यांत सूकराप्रमाणें मठ करून कां राहतोस ?

वरुषला मेघ खडकावरुता । चिखल ना तत्त्वतां थेंब नाहीं ॥
वायां तो प्राणी आला नरदेहा । गेला वायां पहा भक्तिवीण ॥
अरण्यांत जैशी सूकरें[3] बैसतीं । तैसें मठाप्रति करूनि बैसे ॥
उदय होतांचि लपतें उलूक[4] । तैसा तो मूर्ख समाधि बैसे ॥
एकाजनार्दनीं वायां गेलें सर्व । संसार ना देव दोन्हीं शून्य ॥

२१. मानभावाप्रमाणें आंतबाहेर काळेंपण कां स्वीकारतोस ?

होउनी मानभाव[5] । अवघा बुडविला ठाव ॥
नाहीं चित्त शुद्ध गति । द्वेष देवाचा करती ॥
धरती उफराटी काठी । रांडापोरें भोंदी[6] वाटीं ॥
नेसोनियां काळेंपण । अंगा लाविती दूषण ॥
एकाजनार्दनीं देवा । जळो जळो त्यांची सेवा ॥

२२. बोकडाचें वैराग्य, कुक्कुटाची समाधि, व मर्कटाच्या चेष्टा घेऊन काय करावयाच्या ?

काय तें वैराग्य बोकडाचे परी । भलतिया भरीं पडतसे ॥
काय ती समाधि कुक्कुटाचे[7] परी । पुढेंचि उकरी लाभ नेणें ॥
बैसोनि आसनीं वाउगें तें ध्यान । सदा लक्षी मान आपुलाचि ॥
घालूनियां जेठा बैसतो करंटा । करितसे चेष्टा मर्कटापरी ॥

---

१ ओक. २ मानणें. ३ डुकर. ४ घुबड. ५ काळीं वस्त्रें वापरणारा एक पंथ. ६ फसवणें. ७ कोंबडा.

नाहीं शुद्ध कर्म योगाचा विचार। सदा परद्वार[1] लक्षितसे ॥
ऐशिया पामरा कायसा तो बोध। एकाजनार्दनीं शुद्ध खडक
जैसा ॥

२३. जो अठरा गुण सोडील तोच शुद्ध होय.

काम क्रोध लोभ दंभ मद मत्सर। षड्वैरी तत्पर हेचि येथें ॥
क्षुधा तृषा मोह शोक जरा मरण। षडूर्मी पूर्ण देहीं हेचि ॥
आशा मनीशा[2] कल्पना इच्छा तृष्णा वासना। हे अठरा गुण जाणा
देहामाजीं ॥
एकाजनार्दनीं त्यजोनि अठरा। तोचि संसारामाजी शुध्द ॥

२४. बीज अग्नींत पेरिलें असतां त्यास कोंभ कसे येतील ?

करितां हरिकथा श्रवण। स्वेद रोमांच नये दारुण।
रुका[3] वेंचितां प्राण। जाऊं पाहे ॥
द्रव्यदारा लोभ अंतरीं। हरिकथा वरि वरि।
बीज अग्नी माझारीं। विरूढे कैसें ॥
टांळी[4] लावूनियां जाण। दृढ घालिती आसन।
अंतरीं तों ध्यान। वल्लभे[5]चें ॥
धनलोभाचा वोणवा[6]। तेणें जाळिलें जीवभावा।
हरिकथेचा करी हेवा। लोकरूढी ॥
धनलोभी आसक्तता। हरिकथा करी वृथा।
तयासी तो परमार्थ तत्त्वतां। न घडे जाणा ॥
एकलीच कांता। नाश करी परमार्था।

१ परस्त्री. २ इच्छा. ३ पैसा. ४ दरवाजा. ५ स्त्री. ६ वणवा.

तेथें धनलोभ येतां । अनर्थाचि होय ।
एकाजनार्दनीं । काम क्रोध लोभ तीन्ही ।
द्रव्यदारा त्यजोनि । नित्य तो मुक्त ॥

### २५. एकाजनार्दनांत मीपण तूंपण नाहीं.

देहबुद्धि सांडी कल्पना दंडी[1] । वासनेची शेंडी वाढवूं नको ॥
तूंतें तूंचि पाहीं तूंतें तूंचि पाहीं । पाहुनियां राहीं जेथींच्या तेथें ॥
तूंतें तूंचि पाहीं जेथें देहो नाहीं । मीपणें कां वायां गुंतलासी ॥
एकाजनार्दनीं मीपण तूंपण । नाहीं नाहीं मज तुझीच आण ॥

### २६. गजाचें ओझें गाढव वाहूं शकणार नाहीं.

गजाचें तें वोझें गाढवासी न सोजे[2] ।
भाविकाचें भजन अभाविकां न विराजे[3] ॥
पतिव्रतेची राहाटी[4] सिंदळीसी न साजे ।
श्रोत्रियाचें[5] कर्म हिंसका लाजे ॥
एकाजनार्दनाचें कवित्व सर्वांसी साजे ।
वाचे श्रीगुरु म्हणतां कदा न लाजे ॥

### २७. सर्व वाणी ईश्वरास सारख्याच प्रिय आहेत.

वेदवाणी देवें केली । येर काय चोरापासुनी झाली ॥
सकळ वाचा वदवी देव । कां वाढवा अहंभाव ॥
ज्या ज्या वाणी स्तुति केली । ते ते देवासी पावली ॥
एकाजनार्दनीं मातु[6] । वाचा-वाचक जगन्नाथु ॥

---

१ नाहींशी करणें. २ शोभणें. ३ शोभणें. ४ चालणूक. ५ यज्ञ करणारे दीक्षित. ६ गोष्ट.

### २८. अदृष्टाचें सामर्थ्य.

अधर्मे अदृष्टाचें चिन्ह । विपरीत वचन तें ऐका ॥
भांडारीं ठेविला कापूर उडे । समुद्रामाजीं तारूं बुडे ॥
ठक[1] येवोनि येकांतीं । मुलाम्याचें[2] नाणें देती ॥
स्वचक्रें[3] परचक्र विरोध धाडी[4] । खणीत[5] लावुनि तळघरें फोडी
पाणी भरे पेवा आंत । तेणें धान्य नासे समस्त ॥
गोठणीं[6] शेळ्या रोग पडे । निमती गाईम्हशीचे वाडे ॥
भूमिनिक्षेप करूं जाती । ते आपुल्याकडे धुळी वोढिती ॥
बुद्धि सांगे वाडोवाड । तेथोनि तोंडीं घाला दगड ॥
ऐशीं कर्माची अधर्म स्थिती । एकाजनार्दनीं सोशी फजिती ॥

### २९. मागेंपुढें कुटाकुटी । सकळांस होतसे.

फूल झडे तंव फळ सोसि । तया पाठीं तेंही नासे ॥
एका मागें एक पुढें । मरण विसरलें बापुडें ॥
शेजारीं निमाले कोणाचे खांदीं । लपों गेला सापें खादली मांदी ॥
मरण ऐकतां परता पळे । पळे तोही मसणीं[10] जळे ॥
प्रेत देखोनी वोझ्याच्या[11] जाती । वोझें म्हणती तेही मरती ॥
मरण म्हणतां थूं थूं म्हणती । थुंकतें तोंडें मसणीं जळती ॥
पळे ना चळे तोचि सांपडे । जाणतां जाणतां होताती वेडे ॥
एका जनार्दनीं शरण । काळ वेळ तेथें न रिगे मरण ॥

---

१ चोर, लुच्चा. २ खोटे. ३ आपले व परक्यांचे हल्ले. ४ हल्ला. ५ खणून. ६ जनावरें राहण्याची जागा. ७ नष्ट होणें. ८ धरलें जातें. ९ समुदाय. १० स्मशान. ११ ओझें वाहणारा.

### ३०. प्राचीनाची दोरी असेपर्यंत एखाद्या पांथस्थाप्रमाणें या संसारांत असावें.

पांथस्थ[१] घरासी आला । प्रातःकाळीं उठोनि गेला ॥
तैसें असावें संसारीं । जैसी प्राचीनाची दोरी ॥
बाळीं घराचार[२] मांडिला । तो सवेंचि मोडुनि गेला ॥
एका विनवी जनार्दना । ऐसें करी गा माझ्या मना ॥

### ३१. पक्षी अंगणांत उतरतात व सवेंच उडून जातात.

पक्षी अंगणीं उतरती । ते कां गुतोनियां राहती ॥
तैसें असावें संसारीं । जोंवरी प्राचीनाची[३] दोरी ॥
वस्तीकर[४] वस्ती आला । प्रातःकाळीं उठोनि गेला ॥
शरण एकाजनार्दन । ऐसें असतां भय कवण ॥

### ३२. "मन म्हणे तें न करावें."

वैर करुनी मन मारावें । मनाधीन पैं न व्हावें ॥
मनामागें जाऊं नये । मन आकळुनि मन पाहे ॥
मन म्हणे तें न करावें । मनीं मनासीं बांधावें ॥
मन म्हणेल तें सुख । परि पाहतां अवघें दुःख ॥
एका जनार्दनीं मन । दृढ ठेवावें आकळून ॥

### ३३. मन देवाच्या चरणीं बांधून ठेविलें असतां तें इकडे तिकडे जाणार नाहीं.

माझ्या मनाचें तें मन । चरणीं ठेवावें बांधून ॥
मग तें जाऊं न शके कोठें । राहे तुमच्या नेहटें[५] ॥

---

१ वाटसरू. २ खेळ. ३ प्रारब्ध. ४ वाटसरू. ५ बळानें.

मनासी तें बळ। देवा तुमचें सकळ ॥
एकाजनार्दनीं देवा। मन दृढ पायीं ठेवा ॥

३४. अलक्षपुरचा जोशी सांगतो कीं मनामागें जाऊं नका.

आम्हीं अलक्षपुरचे[1] जोशी। शकुन सांगूं निश्चयेसीं।
तेणें चुकती चौऱ्यांशीं। मी निर्गुणपुरींचा जोशी ॥
होरा[2] ऐका दादांनों। होरा ऐका दादांनों ॥ ध्रु० ॥
नका जाऊं मनामागें। थोर थोरां जाहले दगे।
मी बोलत नाहीं वाउगें[3]। सावध रहा दादानों ॥
वासना वाईट ही बा थोर। भुलाविले लहान थोर।
फिरती चौऱ्यांशीं लक्ष घरें। पडाल फशीं दादांनों ॥
एका जनार्दनीं जोशी। सांगेन शकुन सर्वत्रांसीं।
रामनाम वाचेसी। तेणें तरती विश्वासी दादांनों ॥

३५. एडक्या मदनास शुकदेवानें आणून एकाजनार्दनाचे चरणीं बांधिलें.

एडका मदन। तो केवळ पंचानन[4] ॥ ध्रु० ॥
धडके[5] मारिली शंकरा। केला ब्रह्मयाचा मातेरा[6]।
इंद्रचंद्रासी दरारा[7]। लाविला जेणें ॥
धडक मारिली नारदा। केला रावणाचा चेंदा।
दुर्योधना मारिली गदा। घेतला प्राण ॥
भस्मासुर मुकला प्राणांसी। तेचि गति झाली वालीसी।
विश्वामित्रासारिखा ऋषी। नाडिला[8] जेणें ॥
शुकदेवानें ध्यान धरोनि। एडका आणिला आकळोनि।
एकाजनार्दनाचे चरणीं। बांधिला जेणें ॥

---

१ लक्ष्यातीत परब्रह्म हेंच कोणीएक शहर. २ ज्योतिष, भाविष्य. ३ व्यर्थ. ४ सिंह. ५ धक्का. ६ फजिती. ७ भीति, धाक. ८ फसवणें.

## ३. नामस्मरण आणि भक्ति.

### ३६. "आठव तो परब्रह्म। नाठव तो भवभ्रम."

भगवद्भावो सर्वांभूतीं। हेंचि ज्ञान हेचि भक्ति।
विवेक विरक्ति। याचि नांवें॥
हें सांडूनी विषयध्यान। तेंचि मुख्यत्वें अज्ञान।
जीवीं जीवा बंधन। येणेंचि दृढ॥
आठव तो परब्रह्म। नाठव तो भवभ्रम।
दोहींचें निजवर्म। जाण बापा॥
आठव विसर चित्तीं। जेणें जाणिजेती।
तेंचि एक निश्चिती। निजरूप॥
स्मरण ते निजमुक्ति। विस्मरण तेचि अधोगती।
ऐसें पुराणें गर्जती। बाह्या[1] उभारूनि॥
एकाजनार्दनीं। सहज निजबोधनीं।
सबाह्याभ्यंतरीं[2]। पूर्ण परमानंद॥

### ३७. नामाचा उच्चार हीच भक्ति.

सेवेचें कारण मुख्य तो सद्भाव।
इतर ते वाव[3] इंद्रियबाधा॥
साधन हेंचि आधीं तोडीं तूं उपाधि।
नको नको ऋद्धिसिद्धि आणिक कांहीं॥
नामाचा उच्चार मुख्य हेचि भक्ति।
एकाजनार्दनीं विरक्ति तेणें जोडे॥

---

१ हात. २ आंतबाहेर. ३ व्यर्थ.

### ३८. या जगांत सर्व वस्तु नाशिवंत असून एक हरिनामच शाश्वत आहे.

नाशिवंत धन नाशिवंत मान । नाशिवंत जाण काया सर्व ॥
नाशिवंत देह नाशिवंत संसार । नाशिवंत विचार न करिती ॥
नाशिवंत स्त्रीपुत्रादिक बाळें । नाशिवंत बळें गळां पडती ॥
एकाजनार्दनीं सर्व नाशिवंत । एकचि शाश्वत हरिनाम ॥

### ३९. नामजप मनींचे सर्व हेतु पूर्ण करतो.

आपुलें कल्याण इच्छिणें जयांसी। तेणें या नामासी विसंबूं नये ॥
करील परिपूर्ण मनींचे हेत । ठेविलिया चित्त नामापाशीं ॥
भुक्ति आणि मुक्ति वोळंगती[2] सिद्धि । होईल कीं वृद्धी आत्मनिष्ठे॥
एकाजनार्दनीं जपतां हें नाम । पुरवील काम जो जो हेतु ॥

### ४०. अनुभव आल्यावर नामावरील श्रद्धा दुणावते.

नाहीं जया भाव[3] पोटीं । तया चावटी[4] वाटे नाम ॥
परी येतां अनुभव । चुकवी हाव संसार ॥
वेरझारीं[5] पडे चिरा[6] । नाहीं थारा[7] जन्माचा ॥
एकाजनार्दनीं खंडे कर्म । सोपें वर्म हातां लागे ॥

### ४१. नामरूपाला मेळ न घालतां तुम्हीं केवळ वाचेचा गोंधळ कां करितां ?

नाम घेतां हे वैखरी । चित्त धांवे विषयावरी ॥
कैसें होताहे स्मरण । स्मरणामाजीं विस्मरण ॥
नामरूपा नव्हतां मेळ । नुसता वाचेचा गोंधळ ॥
एकाजनार्दनीं छंद । बोलामाजी परमानंद ॥

---

१ अविनाश, सतत टिकणारें. २ आश्रयकरणें. ३ श्रद्धा. ४ व्यर्थ बडबड. ५ येणेंजाणें, खेपा, जन्ममृत्यु. ६ दगड. ७ आश्रय.

### ४२. हरिनाम ऐकून तुला सुख वाटणार नाहीं तर तुझ्या अंतरीं पाप आहे असें समज.

हरिनाम ऐकतां न वाटे सुख। अंतरीं तूं देख पाप आहे ॥
कस्तुरीचे आळां पेरिला पलांडू[1]। सुवास लोपोनि कैसा वाढे दुर्गंधु॥
धारोष्णं[2] पय परि ज्वरिताचें मुख। थुंकोनि सांडी म्हणे कडू विख॥
पानें[3] लागलीया[3] गूळ न म्हणे गोडु। गोडाचें गोड तें झालें कडु॥
एकाजनार्दनीं भाव नुपजे नरा। नरदेहीं आयुष्य तेंही केला मातेरा[4]॥

### ४३. नामधारक हा सर्वांपेक्षां कोटिगुणानें श्रेष्ठ आहे.

गांवढे[5] सहस्र ब्राह्मण। तृप्त केलिया भोजन।
पुण्यक्षेत्रींचा एकचि जाण। सुकृत तितुकेंचि जोडे॥
ऐसे पुण्यक्षेत्रींचे दशशतक। तृप्त केलिया पाठकें[6]।
पहातां सुकृत। तितुकेंचि जोडे॥
ऐसे सहस्र वेदपाठक। तृप्त केलिया पंडित एक।
पहातां सुकृत। तितुकेंचि जोडे॥
तैसेच पंडित सहस्र एक। तृप्त केलिया संन्यासी देख।
तरी तें सुकृत। तितुकेंचि जोडे॥
तैसे सहस्र संन्यासी। गणित एक परमहंसी।
पहातां सुकृतासी। एक तृप्त केलिया॥
परमहंसी सहस्रगणी। तैसीच ब्रह्मज्ञानाची मांडणी।
जोडे सुकृत तृप्तकरणीं। एक ब्रह्मवेत्ता॥
ऐसे वेत्ते अपरंपार। न ये नामधारकाबरोबर।
नामधारका सादर। पाहे एका जनार्दनीं॥

---

१ कांदा. २ ताजें. ३ सर्पदंश झाला असतां. ४ नाश. ५ गांवढळ.
६ पठण करणारा.

### ४४. चिंतनानें सर्व कार्य सिद्ध होतें.

चिंतनें नासतसे चिंता । चिंतनें सर्व कार्य ये हातां ।
चिंतनें मोक्ष सायुज्यता । घर शोधीतसे ॥
ऐसें चिंतनाचें महिमान[1] । तारिले अधम खळ जन ।
चिंतनें समाधान । प्राणिमात्रां होतसे ॥
चिंतनें तुटे आधिव्याधी[2] । चिंतनें तुटतसे उपाधि ।
चिंतनें होय सर्व सिद्धि । एका जनार्दनाचे चरणीं ॥

### ४५. चिंतनानें काळाचें भय नाहींसें होतें.

हरे भवभय व्यथा चिंतनें । दूर पळती[3] नाना विघ्नें ।
कलिकल्मष[4] बंधनें । न बाधतीं चिंतनें ॥
करा करा म्हणोनि लाहो[5] । चिंतनाचा निर्वाहो[6] ।
काळाचा तो बिहो[7] । दूर पळे चिंतनें ॥
हीच माझी विनवणी । चिंतन करा रात्रंदिनीं ।
शरण एका जनार्दनीं । रामनाम चिंतावें ॥

### ४६. चिंतनानें देवाचें साहाय्य प्राप्त होतें.

चिंतन तें सोपें जगीं । रामकृष्ण म्हणा सत्संगीं ।
उणें पडों नेदी व्यंगीं । देव धांवे चिंतनें ॥
चिंतन करितां द्रौपदी । पावलासे भलते संधीं ।
ऋषीश्वरांची मांदी[8] । तृप्त केली क्षणमात्रें ॥
चिंतनें रक्षिलें अर्जुना । लागों नेदी शक्तिबाणा ।
होउनीं अंकणा[9] । रथारूढ बैसला ॥
चिंतनें प्रल्हाद तारिला । जळीं स्थळीं सांभाळिला ।
एकाजनार्दनीं भला । चिंतनाचा अंकित ॥

---

१ मोठेपणा. २ मानसिक चिंता, व रोग. ३ दूर होणें. ४ कलींतील पाप. ५ छंद. ६ व्यवसाय. ७ भय. ८ समुदाय. ९ अंकित.

## ४७. भक्ति ही माता असून मुक्ति ही तिची दुहिता आहे.

भक्तीच्या पोटा मुक्ति पैं आली। भक्तीनें मुक्तीतें वाढविलें ॥
भक्ति ते माता मुक्ति ते दुहिता[१]। जाणोनि तत्त्वतां भजन करी ॥
भक्ति सोडोनि मुक्ति वांछिती वेडी। मूळ सोडोनि कैसी ये गोडी॥
संतोषोनि भक्ति ज्यासी दे मुक्ति। तोचि लाभे येर व्यर्थ कां शिणती ॥
एकाजनार्दनीं एक भाव खरा। भक्ति मुक्ति दाटुनी आलिया घरा॥

## ४८. प्रेमावांचून ज्ञानी शृंगारलेल्या रांडेप्रमाणें दिसतो.

भक्तिप्रेमाविण ज्ञान नको देवा। अभिमान नित्य नवा तयामाजी ॥
प्रेमसुख देईं प्रेमसुख देईं। प्रेमेंविण नाहीं समाधान ॥
रांडिवेनें[३] जेविं शृंगारु केला। प्रेमेंविण जाला ज्ञानी तैसा ॥
एकाजनार्दनीं प्रेम अति गोड। अनुभवी सुरवाड[४] जाणतील ॥

## ४९. भक्ति हें मूळ, वैराग्य हें फूल, व ज्ञान हें फळ होय.

भक्तीचे उदरीं जन्मलें ज्ञान। भक्तीनें ज्ञानासी दिधलें महिमान ॥
भक्ति ते मूळ ज्ञान तें फळ। वैराग्य केवळ तेथींचें फूल ॥
फूल फळ दोनीं येरयेरां पाठीं। ज्ञान वैराग्य तेविं भक्तीचे पोटीं ॥
भक्तीविण ज्ञान गिवसिती[५] वेडे। मूळ नाहीं तेथें फळ कैंवि जोडे ॥
भक्तियुक्त ज्ञान तेथें नाहीं पतन। भक्ति माता तया करितसे जतन॥
शुद्ध भक्तिभाव तेथें तिष्ठे देव। ज्ञानासी तो ठाव सुखवस्तीसी ॥
शुद्धभाव तेथें भक्तियुक्त ज्ञान। तयाचेनि अंगें समाधि समाधान॥
एकाजनार्दनीं शुद्ध भक्ति क्रिया। ब्रह्मज्ञान त्याच्या लागतसे पायां॥

---

१ मुलगी. २ आपण होऊन. ३ विधवा, वेश्या. ४ सुख. ५ शोधणें.

५० भावभक्तीवांचून केलेलें सर्व पुण्य म्हणजे विटंबनाच होय.

राजाला आळस संन्याशाला सायास। विधवेसी विलास विटंबना॥
व्याघ्रासी शांतता गाईसी उग्रता। वेश्येसी हरिकथा विटंबना॥
दानेंविण पाणि[1] घ्राणेंविण घोणी[2]। नामेंविण वाणी विटंबना॥
एकाजनार्दनीं भावभक्तीविना। पुण्य केलें नाना विटंबना॥

५१. नित्य नवा कीर्तनांत कसा रंग वोढवत आहे!

नित्य नवा कीर्तनीं कैसा वोढवला[3] रंग।
श्रोता आणि वक्ता स्वयें जाला श्रीरंग॥
आल्हादें वैष्णव करिती नामाचा घोष।
हरिनाम गर्जतां गगनीं न माये हरुष[4]॥
पदोपदीं कीर्तनीं निवताहे जन मन।
आवडी भुकेली तिनें गिळिलें गगन॥
एकाजनार्दनीं गातां हरिचें नाम।
निमालीं इंद्रियें विषय विसरलीं काम॥

५२. हरिकीर्तन चाललें असतां आंतबाहेर देव उभा राहतो.

आवडी करितां हरिकीर्तन। हृदयीं प्रगटे जनार्दन॥
थोर कीर्तनाचें सुख। स्वयें तिष्ठे आपण देख॥
घातें[5] आलिया निवारी। चक्र गदा घेउनि करीं॥
कीर्तनीं होऊन सादर। एका जनार्दनीं तत्पर॥

---

१ हात. २ नाक. ३ प्राप्त होणें. ४ आनंद. ५ हल्ला, संकट.

### ५३. योगसाधनानें जो सांपडत नाहीं तो आज कीर्तनांत नाचत आहे.

आजि नवल झालें वो माय। पाहण्या पाहणें दृष्टि धांये[१] ॥
ऐसा लाघवी सुखकर मूर्ति। संतसंगें जाली मज विश्रांति ॥
योगीश्वर जया चिंतिती। सनकादिक जया ध्याती ॥
योगसाधनें नातुडे[२] जो माये। एकाजनार्दनीं कीर्तनीं नाचतु आहे ॥

### ५४. कीर्तनानें चराचर पावन होतें.

मागणें तें आम्हीं मागूं देवा। देईं हेवा[३] कीर्तनीं ॥
दुजा हेत[४] नाहीं मनीं। कीर्तनावांचुनी तुमचीया ॥
प्रेमें हरिदास नाचत। कीर्तन होत गजरीं ॥
एकाजनार्दनीं कीर्तन। पावन होती चराचर जाण ॥

### ५५. कामनिक कीर्तन केलें असतां जन्मोजन्मीं पतनास कारण होईल.

करुनी कीर्तन मागती जे द्रव्य। तें जाणावें वैधव्य विधवेचें ॥
सर्व अलंकार शरीर शोभलें। वायांपरी गेलें कुंकूंहीन ॥
मानवानें भावें करावें कीर्तन। आनंदें नर्तन वैष्णवांपुढें ॥
एकाजनार्दनीं कामनिक[५] कीर्तन। करितां पतन जन्मोजन्मीं ॥

### ५६. कोणास कांहीं सांकडें न घालितां कीर्तन करावें.

कीर्तनाची मर्यादा कैसी। देव सांगे उद्धवासी ॥
गावें नाचावें सांबडें[६]। न घालावें कोंडें[७] त्या कांहीं ॥

---

१ तृप्त होणें. २ सांपडत नाहीं. ३ आवडी, छंद. ४ हेतु. ५ मनांत इच्छा न, सकाम. ६ भोळेपणानें, प्रेमळपणानें. ७ संकट.

मिळेल तरी खावें अन्न। अथवा पर्णें तीं भक्षून ॥
जाईल तरी जावो प्राण। परि न संडावें कीर्तन ॥
किरकिर आणूं नये पाठीं। बोलूं नये भलती गोष्टी ॥
स्वयें उभा राहून। तेथें करी मी कीर्तन ॥
घात[1] आलिया निवारी। माता जैसी बाळावरी ॥
बोले उद्धवासी गुज। एकाजनार्दनीं बीज ॥

५७. परमपावन सगुणचरित्रांचें वर्णन करावें.

सगुणचरित्रें परम पवित्रें सादर[2] वर्णावीं।
सज्जनवृंदें[3] मनोभावें आधीं वंदावीं ॥
संतसंगें अंतरंगें नाम बोलावें।
कीर्तनरंगीं देवासन्निध सुखें डोलावें ॥
भक्तिज्ञानविरहित गोष्टी इतरा न कराव्या।
प्रेमभरें वैराग्याच्या युक्ती विवराव्या[4] ॥
जेणेंकरूनि मूर्ति ठसावे अंतरिं श्रीहरिची।
ऐशी कीर्तनमर्यादा हे संतांच्या घरची ॥
अद्वयभजनें अखंडस्मरणें वाजवी करटाळी।
एकाजनार्दनीं मुक्ति होय तात्काळीं ॥

५८. नवविधाभजनानें कोण कोण पावन झाले ?

नवविधा भक्ति नव आचरती। त्यांची नामकीर्ति सांगूं आतां ॥
एक एक नाम घेतां प्रातःकाळीं। पापा होय होळी क्षणमात्रें ॥
श्रवणें परीक्षिति तरला भूपति। सात दिवसां मुक्ति जाली तया ॥

---

१ संकट. २ आदरयुक्त. ३ समुदाय. ४ विवरणकरणें, स्पष्ट करणें.

महाभागवत करुनि श्रवण। सर्वांगाचे कान केले तेणें ॥
श्रीशुक आपण करूनि कीर्तन। उध्दरिला जाण परीक्षिति ॥
हरिनामघोष गर्जे तो प्रल्हाद। स्वानंदें प्रबोध जाला त्यासी ॥
स्तंभीं अवतार हरि प्रगटला। दैत्य विदारिला तयालागीं ॥
पायाचा महिमा स्वयें जाणे रमा। प्रिय पुरुषोत्तमा जाली तेणें ॥
हरिपदांबुज सुकुमार कोंवळें। तेथें करकमळें अखंडित ॥
गाईचिया मागें श्रीकृष्णपाउलें। अक्रूरें घातलें दंडवत ॥
करूनि वंदन घाली लोटांगण। स्वानंदें निमग्न जाला तेणें ॥
दास्यत्व मारुति अर्चे देहस्थिति। सीताशुद्धि कीर्ति केली तेणें ॥
सेव्यसेवक भाव जाणे तो मारुति। स्वामी सीतापति संतोषला ॥
सख्यत्व स्वजाति सोयरा श्रीपति। सर्वभावें प्रीति अर्जुनासी ॥
उपदेशिली गीता सुखी केलें पार्था। जन्ममरणवार्ता खुंटविली ॥
आत्मनिवेदन करूनियां बळी। जाला वनमाळी द्वारपाळ ॥
औटें पाऊल भूमि घेऊनि दान। याचक आपण स्वयें झाला ॥
नवविधा भक्ति नवजणें केली। पूर्ण प्राप्ति जाली तयांलागीं ॥
एकाजनार्दनीं आत्मनिवेदन। भक्ति दुजेपण उरलें नाहीं ॥

---

## ४. संतांचीं लक्षणें.

### ५९. " ऐसे कैसियानें भेटती ते साधु. "

ब्रह्म सर्वगत सदा सम। जेथें आनु नाहीं विषम।
ऐसें जाणती ते अतिदुर्गम। तयांची भेटी जालिया भाग्य परम ॥

१ खांब. २ साडेतीन. ३ दुसरें. ४ भिन्नजातीचें. ५ कळण्यास अतिशय कठिण.

ऐसे कैसियानें भेटती ते साधु । ज्यांचा अतर्क्य तर्केंवीण बोधु ।
ज्यासि निजानंदीं आनंदु । ज्यांचा परमानंदीं उद्बोधु ॥
पवना घालवेल पालाण[1] । पायीं चढवेल गगन ।
भूत भविष्य कळों येईल वर्तमान । परि त्या साधूचें न कळे भाहिमान॥
चंद्रामृत सुखें सेववेल । रवि अस्ता जातां धरवेल ।
बाह्यां[2] हेळां[3] सागर तरवेल । परि त्या साधूची भेटी न होईल ॥
जप तप करवेल अनुष्ठान । ध्येय ध्याता धरवेल निजध्यान ।
ज्ञेय ज्ञाता विवर्जित ज्ञान । ज्ञानाध्यानाचें मूळ हे साधुजन ॥
निजवृत्तीचा करवेल निरोधु । जिवाशिवाचा भोगवेल आनंदु ।
एकाजनार्दनीं निजसाधु । त्यांच्या दर्शनें तुटे भवबंधु ॥

## ६०. ब्रह्मज्ञान्याचीं लक्षणें.

वर्म जाणे तो विरळा । तयांचीं लक्षणें पैं सोळा ।
देहीं देव पाहे डोळां । तोचि ब्रह्मज्ञानी ॥
जन निंदो अथवा वंदो । जया नाहीं भेदाभेद ।
विधिनिषेधांचे शब्द । अंगीं न बाणती ॥
कार्य कारण कर्तव्यता । हें पिसें[4] नाहीं सर्वथा ।
उन्मनी समाधि अवस्था । न मोडे जयाची ॥
कर्म अकर्माचा ताठा[5] । न बाणेचि अंगीं वोखटा[6] ।
वाउग्या त्या चेष्टा । करीना कांहीं ॥
शरण एका जनार्दनीं । तोचि एक ब्रह्मज्ञानी ।
तयाचे दरुशनीं । प्राणियांसीं उध्दार ॥

---

१ खोगीर. २ हातांनीं. ३ सहज, लीलेनें. ४ वेड. ५ अभिमान. ६ वाईट.

### ६१. क्रोध, शोक, मोह साधूंचे मनास स्पर्शत नाहींत.

आपुलीच दारा[1] जरी टेके व्यभिचारा। क्रोधाचा थारा[2] अंतरीं नये
आपुलेंच धन तस्करें[3] नेतां जाण। जयाचें मन उद्विग्न नव्हे ॥
आपुलाचि पुत्र वधोनि जाय शत्रु। परि मोहाचा पाझरू नेत्रीं नये॥
आपुलें शरीर गांजितां परनरें। परि शांतीचें घर चळों नेदी ॥
एकाजनार्दनीं जया पूर्ण बोधु। तोचि एक साधु जगामाजी ॥

### ६२. निंदास्तुति मुखांत नसून संत केवळ आत्मस्थितीनें वर्ततात.

मुखीं नाहीं निंदास्तुति। साधु वर्ते आत्मस्थिति ॥
राग द्वेष समूळ गेले। द्वैताद्वैत हारपलें ॥
घेणें देणें हा पसारा। नाहीं जयासी दुसरा ॥
एकाजनार्दनीं संत। हा ज्याचे हृदयीं भगवंत ॥

### ६३. संसारीं आपदा असून वाचेनें सदोदित विठ्ठल म्हणणारा विरळा.

असोनि संसारीं आपदा। वाचे वदे विठ्ठल सदा ॥
नाहीं मानसीं तळमळ। सदा शांत गंगाजळ ॥
असोनियां आकिंचन[4]। जयाची वृत्ति समाधान ॥
एकाजनार्दनीं ऐसे थोडे। लक्षांमध्यें एक निवडे ॥

### ६५. वरवर गुरुपण मिरवून काय उपयोग ?

जळातिया घरा। कोण वसती करी थारा ॥
तैसे अभागी पामर। गुरुपण मिरविती वरवर ॥
नाहीं मंत्रशुध्दीचें ज्ञान। भलतियाचे फुंकिती कान ॥
मनुष्य असोनि गुरूं[5] पाही। एकाजनार्दनीं तें नाहीं ॥

---

१ स्त्री. २ आश्रय. ३ चोर. ४ निर्द्रव्य, गरीब. ५ जनावर.

६५. जे पोटासाठीं संत होतात त्यांचा उपदेश कामास येत नाहीं.

होती पोटासाठीं संत । नाहीं हेत[1] विठ्ठलीं ॥
तयांचा उपदेश नये कामा । कोण धर्मा वाढवी ॥
घालुनी माळा मुद्रा गळां । दाविती जिव्हाळा वरिवरी ॥
एकाजनार्दनीं ते पामरें[2] । भोगिती अघोर यातना ॥

६६. जे आम्हांस गुरु करा म्हणतात त्यांजजवळ गोविंद नाहीं असें समजावें.

लावुनियां अंगा राख । म्हणती सुख आम्हांपाशीं ॥
भोळ्यां भाविकां भोंदिती[3] । भलते मंत्र तया देती ॥
म्हणति आम्हां करा गुरु । उपचारु पूजेचा ॥
एकाजनार्दनीं ते मैंद । नाहीं गोविंद तयांपाशीं ॥

६७. शिष्यापासून सेवा घेणें हें अधम लक्षण होय.

शिष्यापासून सेवा घेणें । हें तों लक्षण अधमाचें ॥
ऐसे असती गुरु बहु । नव्हेचि साहूं भार त्यांचा ॥
एकपणें समानता । गुरुशिष्य उरतां उपदेश ॥
एकाजनार्दनीं शरण । गुरु माझा जनार्दन ॥

६८. मजला एकदां हरि दाखवा एवढीच कृपा तुम्हीं संत मजवर करा.

तुम्हीं संतजन । माझें ऐका हो वचन ॥
करा कृपा मजवरी । एकदां दाखवा तो हरि ॥

---

१ हेतु, प्रेम. २ क्षुद्र. ३ फसवणें. ४ लुच्चा.

आहे तुमचे हातीं । म्हणोनि येतों काकुलती ॥
एकाजनार्दनीं म्हणे थारा । संतीं द्यावा मज पामरा ॥

६९. संतांच्या सेवेवांचून मला दुसरा हेतूच नाहीं.

संताचिये द्वारीं होईन द्वारपाळ। न सांगतां सकळ करीन काम ॥
तेणें माझ्या जीवा होईल समाधान। यापरतें साधन आणिक नाहीं ॥
शेष उष्टावळी काढीन पत्रावळी । पूर्वकर्मा होळी सहज होय ॥
एकाजनार्दनीं हेंचि पैं मागत । नाहीं दुजा हेत सेवेविण ॥

७०. संतसेवा हेंच नामश्रद्धेचें वर्म होय.

वेदाभ्यास नको सायास ज्योतिष । नामाचा तो लेश तेथें नाहीं॥
बहुत व्युत्पत्ति[1] सांगसी पुराण । व्यर्थ तें स्मरण नाम नाहीं ॥
अनंत हें नाम जयापासुनि जालें । तें वर्म चुकलें संतसेवा ॥
संतांसीं शरण गेलियावांचुनि । एकाजनार्दनीं न कळे नाम ॥

७१. भलत्या भावानें संतांची सेवा केली तरी ती देवास मान्य होते.

जया जैसा हेत । तैसा संत पुरविती ॥
उदारपणें सम देणें । नाहीं उणें कोणासी ॥
भलातिया भावें संतसेवा । करितां देवा माने तें ॥
एकाजनार्दनीं त्यांचा दास । पूर्ण वोरस कृपेचा ॥

७२. संतसमुदाय भेटला हा आजचा भाग्याचा दिवस !

धन्य दिवस जाहला । संतसमुदाव भेटला ॥

---

१ पढिक ज्ञान. २ पान्हा.

कोडें[1] फिटलें जन्मांचें । सार्थक जाहलें पैं साचें ॥
आज दिवाळी दसरा । संतपाय आले घरा ॥
एकाजनार्दनीं जाहला । धन्य दिवस तो भला ॥

७३. वैष्णवांचे चरण देखिले असतां त्रिविधतापांची बोळवण होते.

धन्य आज दिन संतदरुशनाचा । अनंतजन्मांचा शीण गेला ॥
मज वाटे त्यांसी आलिंगन द्यावें । कदा न सोडावे चरण त्यांचे ॥
त्रिविधतापांची जाहली बोळवण[2] । देखिल्या चरण वैष्णवांचे ॥
एकाजनार्दनीं घडो त्यांचा संग । न व्हावा वियोग माझ्या चित्ता ॥

७४ संतसंगानें आनंदाचे पूर लोटतात.

भाग्याचा उदय झाला । संतसंग मज घडला ॥
तेणें आनंदाचे पूर । लोटताती निरंतर ॥
प्रेम सप्रेम भरतें । अंगीं उतार चढतें ॥
आली आनंदलहरी[3] । एकाजनार्दनीं निर्धारीं ॥

७५. संतसंग हीच कैवल्याची राशि होय.

आजी सुदिन आह्मांसी । संतसंग कैवल्यरासी ॥
हेंचि आमुचें साधन । आणिक नको आम्हां पठन ॥
वेदश्रुति पुराण मत । संतसेवा तें सांगत ॥
जाणोनि विश्वासिलों मनीं । शरण एका जनार्दनीं ॥

---

१ सांकडें, इच्छा. २ निरसन. ३ लाट.

### ७६. संतास शरण गेलें असतां ते काळाचा घाव चुकवितील.

मेघापरिसें[1] उदार संत। मनोगत पुरविती ॥
आलिया शरण मनें वाचा। चालविती त्याचा भार सर्व ॥
लिगाड[2] उपाधि तोडिती। सरते[3] करती आपणामाजी ॥
काळाचा तो चुकविती घाव। येऊं न देती डाव अंगासी ॥
शरण एकाजनार्दनीं। तारिले जनीं मूढ सर्व ॥

### ७७. संकट पडलें असतां त्याचें निवारण करणारा संतांवांचून दुसरा कोणी नाहीं.

देवाचे सोइरे संत ते जाणावे। यापरतें जीवें नाठवी कोणा ॥
पडतां संकट आठवितसे संतां। त्याहुनी वारिता[4] नाहीं दुजा ॥
म्हणोनि घरटीं[5] फिरे तया गांवीं। सुदर्शनादि मिरवी आयुधें हातीं ॥
लाडिके[6] डिंगर वैष्णव ते साचे। एकाजनार्दनीं त्यांचे वंदी पाय ॥

### ७८. संतांच्या दारींचा मी कुतराही होईन;

संतांचिये घरीं होईन श्वानयाती[7]। उच्छिष्ट तें प्रीतीं मिळेल मज ॥
तेणें या देहाची होईल शुद्धता। भ्रम मोह ममता निवारेल ॥
आशापाश सर्व जातील तुटोनि। जीव हा बंधनीं मुक्त होय ॥
एकाजनार्दनीं भाकीन करुणा। श्रीसंतचरणां वारवार ॥

### ७९. कारण कुतऱ्याच्या गळ्यांतली सांखळी ते सोडवितील.

संतद्वारीं कुतरा जालों। प्रेमरसासी सोकलों ॥
भुंकत भुंकत द्वारा आलों। ज्ञान थारुळ्या[8] बैसलों ॥

---

१ पेक्षां. २ लचांड. ३ मान्य. ४ निवारण करणारा. ५ सभोंवार. ६ बालक. ७ कुत्रें. ८ खळी.

कुतरा भुंकत आला हिता। संतीं हात ठावला माथां ॥
कुतऱ्या गळ्याची सांखळी। केली संतांनीं मोकळी ॥
एकाजनार्दनीं कुतरा। दांत पाडुनी केला बोथरा[1] ॥

८०. अभक्तांस देव कंटाळतात, पण संत त्यांचा उद्धार करितात.

अभक्तां देव कंटाळती। परि सरते करिती संत त्यां ॥
म्हणोनि महिमा त्यांचा जगीं। वागविती अंगीं सामर्थ्य ॥
आगमानिगमांचा[4] पसारा। उगाचि भारा चिंध्यांचा ॥
वेदशास्त्रांची घोकणी। ती तों काहणी जुनाट ॥
पुरातन वाटा असती बहु। त्या त्या न घेऊं यामाजीं ॥
एकाजनार्दनीं सोपा मार्ग। संतसंग चोखडा ॥

८१. मायबाप हे जन्मास घालतात; संत हे जन्म चुकवितात.

संत मायबाप म्हणतां। लाज वाटे बहु चित्ता ॥
मायबाप जन्म देती। संत चुकाविती जन्मपंक्ति ॥
मायबापांपरीस थोर। वेदशास्त्रीं हा निर्धार ॥
शरण एका जनार्दनीं। संत शोभती मुकुटमणि ॥

८२. संतांच्या कृपेस सीमाच नाहीं.

रवि न लपेचि अंधारीं। तैशी तुमची जगीं थोरी ॥
कृपावंत तुम्हीं संत। यावरि द्वेत दुजा नाहीं ॥
एकाजनार्दनीं शरण। संत परिपूर्ण दयाळु ॥

---

१ दंतरहित, बोचरा. २ मान्य. ४ शास्त्र. ५ वेद.

८३. संत उदार असून सुरवाडसुखाची प्राप्ति करून देतात.

वैकुंठींचें वैभव । संतांपायीं वसे सर्व ॥
संत उदार उदार । देती मोक्षाचें भांडार ॥
अनन्यभावें धरा चाड । मग सुरवाड[1] सुख पुढें ॥
एकाजनार्दनीं ठाव । नोहे भाव पालट ॥

८४. भक्तच देव होतो हा भजनाचा नवलाव किती म्हणून सांगावा?

नवल भजनाचा भावो । स्वतां भक्तचि होय देवो ॥
वाचे करिती हरिकीर्तन । उन्मनीं मन निशिदिनीं ॥
नाहीं प्रपंचाचें भान । वाचे सदा नारायण ॥
एकाजनार्दनीं मुक्त । सबाह्यअभ्यंतरीं पुनीत[2] ॥

८५. जो संतांस आवडतो तो देवाचाही देव होतो.

संतांसी आवडे तो देवाचाही देव। कळिकाळाचें भेंव[3] पायांतळीं॥
आणिकाची चाड नसेचि वासना । संतांचिया चरणा वांचूनियां॥
ऐसें ज्याचें प्रेम ऐशी ज्याची भक्ति । एकाजनार्दनीं मुक्ति तेथें राबे॥

८६. आमचे जे सोयरे झाले ते यातिकुळाबाहेर गेले.

आम्हीं ब्रह्मपुरींचे ब्राह्मण । याति कुळ नाहीं लहान ॥
आम्हां सोंवळें ओवळें नाहीं । विटाळ न देखों कवणे ठांई ॥
आम्हां सोयरे जे जाहाले । ते यातिकुळावेगळे केले ॥
एकाजनार्दनीं बोधु । यातिकुळींचा फिटला संबंधु ॥

---

१ सुखकर, अलोट. २ पवित्र. ३ भय.

# देव आणि भक्त.

८७ देव आपला देवपणा विसरून भक्तांच्या सर्व वासना पुरवितो.

देवो विसरे देवपणा । अर्पी वासना भक्तांसी ॥
भक्तदेहीं सदा वसे । धर्म अर्थ अर्पितसे ॥
जे जे भक्ताची वासना । पुरवी आपण त्याचि क्षणा ॥
एकाजनार्दनीं अंकित । उभा तेथेंचि तिष्ठत ॥

८८. भाळ्याभोळ्यांस सुख देऊन देव आपण त्याचें दुःख घेतो.

कीर्तनाची आवडी देवा । वैकुंठाहूनि घाली धांवा ॥
नवल वैकुंठींच नसे । तो कीर्तनीं नाचतसे ॥
भाळ्याभोळ्यांसाठीं । धांवे त्यांच्या पाठोपाठीं ॥
आपुलें सुख तया द्यावें । दुःख आपण भोगावें ॥
दीनानाथ पतितपावन[१] । एकाजनार्दनीं वचन ॥

८९. देवावर भार घातला असतां तो निर्धारानें योगक्षेम चालवील.

घालीं देवावरी भार । आणिक न करी विचार ।
योगक्षेम[२] निर्धार । चालवील तुझा ॥
वाचे गाय नामावळी । वासुदेवीं वाहे[३] टाळी ।
प्रेमाचे कल्लोळीं । नित्यानंदें सर्वथा ॥
सोस[४] घेईं कां रे वाचे । रामकृष्ण वदतां साचें ।
धरणें उठतें यमाचें । निःसंदेह ॥

---

१ पापी लोकांना पावन करणारा. २ अप्राप्ताची प्राप्ति यास योग म्हणतात; व प्राप्तवस्तूच्या रक्षणास क्षेम म्हणतात. ३ वाजवणें. ४ छंद.

शरण एका जनार्दनीं । करी रामनामध्वनि ।
कैवल्याचा दानी[1] । रक्षी तुज निर्धारें ॥

## ९०. भक्तांचें सर्व दुःख देव निवारण करितो.

भक्तालागीं अणुमात्र व्यथा । ते न साहवे भगवंता ॥
करुनी सर्वांगाचा वोढा । निवारीतसे भक्तपीडा ॥
होउनी भक्ताचा अंकितु । सारथीपणें तो करीतु ॥
प्रल्हादासी दुःख मोठें । होतांची काष्ठीं प्रगटे ॥
ऐसा अंकित चक्रपाणी । एका शरण जनार्दनीं ॥

## ९१. दासास जडभारी पडलें असतां नानाप्रकारें देव संरक्षणास धांवतो.

दासासी संकट पडतां जडभारी । धांवे नानापरी रक्षणार्थ ॥
पडतां संकटीं द्रौपदी बहीण । धांवे नारायण लवलाहें[2] ॥
सुदामियांचें दरिद्र निवटिलें । द्वारकेतुल्य दिलें ग्राम त्यासी ।
अंबऋषीसाठीं गर्भवास सोशी । परिक्षितीसी रक्षी गर्भामाजी ॥
अर्जुनाचे रथीं होउनी सारथी । उच्छिष्ट भक्षिती गोवळयाचें ॥
राखितां गोधनें मेघ वरुषला । गोवर्धन उचलिला निजबळें ॥
मारुनि कंसासुर सोडिले पितर । रक्षिलें निर्धारें भक्तजन ॥
एकाजनार्दनीं आपुलें म्हणवितां । धांवे हरि सर्वथा तयालागीं ॥

## ९२. ज्ञानदेवादिसंतांबद्दल देवानें कोणकोणते चमत्कार केले ?

ज्ञानराजासाठीं स्वयें भिंत वोढी । विसरूनि प्रौढी थोरपण ॥
तो हा महाराज चंद्रभागेतीरीं । कट धरुनि करीं तिष्ठतसे ॥

---

१ दान देणारा. २ नाहींसें करणें.

नामदेवासाठीं जेवी दहींभात । न पाहे उचित आन दुजें ॥
गोरियाचे घरीं स्वयें मडकीं घडी । चोखियाची वोढी गुरेंढोरें ॥
सांवत्या माळ्यासी खुरपूं लागे अंगें । कबीराचे मागें शेले विणी॥
रोहिदासासवें चर्म रंगूं लागे । सजनकसायाचें अंगें मांस विकी ॥
नरहरि सोनारा घडूं फुंकूं लागे । दामाजींचा वेगें पाडेवार ॥
जनाबाईसाठीं वेंचितसे शेणी । एकाजनार्दनीं धन्य महिमा ॥

## ९३. सांवता, चोखामेळा इत्यादि संतांचा उल्लेख.

खुर्पूं लागे सांवत्यासी । न पाहे यातीसी कारण ॥
घडी मडकें कुंभाराचें । चोखामेळ्याचें ढोर वोढी ॥
सजनकसायाचें विकी मांस । दामाजीचा दास स्वयें होय ॥
एकाजनार्दनीं जनीसंगें । दळूं कांडूं लागे आपण ॥

## ९४. भक्तांच्या अगोदर देव कोठें होता ?

आधीं देव पाठीं भक्त । ऐसें मागें आलें चालत ॥
हेंही बोलणेंची वावें[2] । भक्ता आधीं कैंचा देव ॥
भक्त शिरोमणि भावाचा । देव लंपट[3] जाला साचा ॥
भक्तासाठीं अवतार । ऐसा आहे निर्धार ॥
वडील भक्त धाकुला देव । एकाजनार्दनीं नाहीं संदेह ॥

## ९५. " भक्त वडील देव धाकुला. "

भजन भावातें उपजवी । देव भक्तांतें निपजवी ॥
ऐसा भजनेंचि देव केला । भक्त वडिल देव धाकुला ॥
भक्ताकारणें हा संकल्प । भक्त देवाचाहि बाप ॥

---

१ महार. २ व्यर्थ. ३ आसक्त.

देव भक्ताचिये पोटीं । जाला म्हणोनि आवड मोठी ॥
एकाजनार्दनीं नवलावो । भक्ताचि कैसा जाला देवो ॥

९६. जसें सगुणानंतर निर्गुण, तसाच संतानंतर देव.

संत आधीं देव मग । ह्याचि उमग आणा मना ॥
देव निर्गुण संत सगुण । म्हणोनि माहिमान देवासी ॥
नामरूप अचिंत्य जाण । संतीं सगुण वर्णिलें ॥
मुळीं अलक्ष लक्षा नये । संतीं सोय[1] दाविली ॥
एकाजनार्दनीं संत थोर । देव निर्धार धाकुला ॥

९७. संतांच्या पोटांत देव वसतो; देवाच्या पोटांत संत असतात.

संतापोटीं देव वसे । देवापोटीं संत असे ॥
ऐसा परस्परें मेळा । देव संताचा अंकिला ॥
संताठाईं देव तिष्ठे । देव तेथें संत वसे ॥
एकाजनार्दनीं संत । देव तयाचा अंकित[2] ॥

९८. संतांच्या अंकावर देव वसतो; व देवाच्या अंकावर संत बसतात.

संताअंकीं देव वसे । देवाअंकीं संत बैसे ॥
ऐसा परस्परें मिळणी । समुद्र तरंग तैसे दोन्ही ॥
हेम[3]अलंकारवत । तैसे देव भक्त भासत ।
पुष्पीं तो परिमळ[4] असे । एकाजनार्दनीं देव दिसे ॥

९९. भक्तांचे चरण चुरावयास देव धांवतो.

मिठी घालूनियां भक्तां । म्हणे शिणलेती आतां ॥
धांवे चुरावया[5] चरण । ऐसा लाघवी आपण ॥

---

१ मार्ग. २ स्वाधीन. ३ सोनें. ४ सुवास. ५ चेपणें, दाबणें.

योगियासी भेटी नाहीं । तो आवडीनें कवळी बाहीं ॥
एकाजनार्दनीं भोळा । भक्तां आलिंगी सांवळा ॥

१००. भक्तपणा लहान नाहीं; भक्ताचे पाय देव हृदयांत वाळगितो.

भक्तपणा सानें[1] नव्हे रे भाई । भक्ताचे पाय देवाचे हृदयीं ॥
भक्त तोचि देव, भक्त तोचि देव । जाणती हा भाव अनुभवी ॥
दान सर्वस्वें उदार बळी । त्याचें द्वार राखे सदा वनमाळी ॥
एकाजनार्दनीं मिती[2] नाहीं भावा । देवचि करितो भक्ताची सेवा ॥

१०१. कृष्णाची निंदा करून, व नारदाचा सन्मान करून कंस सायुज्यास गेला.

संतांसी जो निंदी देवासी जो वंदी । तो नर आपदीं आपदा पावे ॥
देवासी जो निंदी संतांसी जो वंदीं । तो नर गोविंदीं सरता होय ॥
कृष्णा कंस द्वेषी नारदा सन्मानी । सायुज्यसदनीं पदवी पावे ॥
एकाजनार्दनीं गुज सांगें कानीं । रहा अनुदिनीं संतसंगें ॥

१०२. संताचा महिमा देवासच माहित, देवाची गोडी संतासच माहित.

संतांचा महिमा देवाचि जाणे । देवाची गोडी संतांसी पुसणें ॥
ऐसी आवडी एकमेकां । परस्परें नोहे सुटिका ॥
बहुत रंग उदक एक । यापरि देव संत दोन्हीं देख ॥
संतांविण देवा न कंठे घडी[4] । उभयतां गोडी एक असे ॥
मागें पुढें न हो कोणही । शरण एका जनार्दनीं ॥

---

१ लहान. २ गणना. ३ दुःख. ४ घटिका.

१०३. मी तुमचा नोकर आहे असें देव भक्तांस म्हणतो.

देव म्हणे भक्तांसी आवडीं । मी झालों तुमचा गडी ॥
सांगाल तें करीन काम । मजवर ठेवा तुमचें प्रेम ॥
भाव मज द्यावा । आणिक मज नाहीं हेवा ॥
आवडीनें देव बोले । भक्तांमाजि स्वयें खेळे ॥
खेळतां गोपाळीं । एकाजनार्दनीं गोकुळीं ॥

१०४. भक्तांचे घरीं देव स्वयमेव उभा असतो.

भाग्याचें भाग्य धन्य ते संसारीं । सांठविती हरी हृदयामाजी ॥
धन्य त्यांचें कुळ धन्य त्यांचें कर्म । धन्य त्यांचा स्वधर्म नाम मुखीं
संकटीं सुखांत नाम सदा गाय । न विसंबे देवराय एक क्षण ॥
एकाजनार्दनीं धन्य त्यांचें दैव । उभा स्वयमेव देव घरीं ॥

१०५. मी देह, व भक्त माझा आत्मा, असें देव म्हणतो.

बहु बोलाचें नाहीं कारण । मी देह, भक्त आत्मा जाण ॥
माझा देह शरीर जाण । भक्त आंत पंचप्राण ॥
नांदे सहज भक्त आंत । मी देह, भक्त देहातीत ॥
एकाजनार्दनीं भक्त । देवपणा मी भक्तांकित ॥

१०६. भक्त हेच माझें आराध्यदैवत होत.

ऐके उद्धवा प्रेमळा । सांगतों जीवाचा जिव्हाळा ।
तूं भक्तराज निर्मळा । सुचित्तें[१] ऐके ॥
मी बैसोनि आसनीं । पूजा करितो निशिदिनीं ।
ते पूज्य मूर्ति तुजलागुनि । नाहीं ठाउकी उद्धवा ॥
जयाचेनि मातें थोरपण । वैकुंठादि हें भूषण ।

---

१ लक्ष लाऊन.

तयाचें पूजेचें माहिमान। एक शिव जाणें ॥
येरां न कळेचि कांहीं। वाउगें पडती प्रवाहीं।
उद्धवा तूं पुशिलें पाहीं। म्हणोनि तुज सांगतों ॥
माझें जें आराध्यदैवत। तें कोण म्हणसी सत्य।
भक्त माझे जीवींचे हेत। जाणती ते ॥
तयांविण मज आवड। नाहीं कोणता पोवाडें[1]।
माझा भक्त मज वरपड। काया वाचा मनेंसी ॥
माझें विश्रांतीचें स्थान। माझे भक्त सुखनिधान।
कायावाचामन। मी विकिलों तयांसी ॥
ते हे भक्त परियेसी। उद्धवा सांगे हृषिकेशी।
एकाजनार्दनीं सर्वांसी। तेंचि वदतसे ॥

१०७. माझा शरणागत केविलवाणा दिसेल तर ती लाज कोणास?

माझा शरणागत दिसे केविलवाणा। ही तों लाज जाणा माझी मज ॥
एकविध भावें आलिया शरण। कर्म धर्म जाण पूर्ण त्याचे ॥
समर्थाचे मुला काय खावयाची चिंता। तैसें मी त्या तत्वतां न विसंबे ॥
एकाजनार्दनीं हा माझा नेम। आणिक नाहीं वर्म भावेंविण ॥

१०८. तुमचे बोल वायां गेले तर माझें जीवित घेऊन काय करावयाचें?

तुमचे अप्रमाण होतां बोल। मग फोल[2] जीवित्व माझें ॥
कासया वागवूं सुदर्शन। नाहीं कारण गदेचें ॥
तुमचा बोल व्हावा निको। हेंचि देखा मज प्रिय ॥
मज यावें उणेंपण। तुमचें थोरपण प्रकाशूं द्या ॥
एकाजनार्दनीं देव। स्वयमेव बोलती ॥

---

१ कार्य. २ स्वाधीन. ३ दीन. ४ व्यर्थ. ५ खरा.

१०९. जे कायावाचामनानें मला अनुसरतात त्यांचें मी ऋणवैपण पत्करतो.

मज जे अनुसरले काया वाचा मनें । त्यांचें चालवणें सर्व मज ॥
ऋणवई[1] त्यांचा अनंत जन्मांचा । जे गाती वाचा कीर्ति माझी ॥
तयांचिया द्वारीं लक्ष्मीसहित । उभा मी तिष्ठत याचकपणें ॥
सर्व जडभारी जाणें योगक्षेम । एकाजनार्दनीं नेम जाणा माझा ॥

११०. त्याच्या द्वारांत तिष्ठत राहून त्याचें व्यंग मी पडूं देत नाहीं.

मजसी जेणें विकिलें शरीर । जाणें मी निर्धार अंकित त्याचा ॥
त्याचें सर्व काम करीन मी अंग । पडों नेदी व्यंगें[2] सहसा कोठें ॥
एकाजनार्दनीं त्याचा मी अंकित । राहें पैं तिष्ठत त्याचे द्वारीं ॥

१११. धर्माची वाट मोडून अधर्माची शीग चढते तेव्हां आम्हांस जन्म घ्यावा लागतो.

धर्माची वाट मोडे । अधर्माची शीग[3] चढे ।
तैं आम्हां येणें घडे । संसारीस्थिति ॥
आम्हां कां संसारा येणें । हरिभक्ति नामस्मरणें ।
जडजीव उद्धरणें । नामस्मरणें करूनि ॥
सर्वकर्म ब्रह्मस्थिति । प्रतिपादाव्या वेदोक्ति ।
हेंचि एक निश्चितीं । करणें आम्हां ॥
नाना मतें पाषांड[4] । कर्मठता अति बंड ।
तयाचें ठेंचणें तोंड । हरिभजनें ॥
विश्वरूप सृष्टि । अर्जुना दाविली दृष्टी ।
भिन्नभेदाची गोष्टी । बोलूं नये ॥

---

१ कर्जदार. २ संकट. ३ कमान, माप भरल्यावर मग आणखी ढीग करतात तो.
४ नास्तिक मत.

एकाजनार्दनीं । धरिती भेद मनीं ॥
दुर्‍हावले[1] येथुनी । निंदक जाण ॥

११२. तुम्हीं सडासंमार्जन करून गंध उगाळलेंत हा मजकडून मोठा अपराध झाला.

तुम्हीं कृपाळु जी देवा । केली सेवा आवडी ॥
करुनि सडासंमार्जन । पाळिलें वचन प्रमाण ॥
उगाळूनि गंध पुरविले । सोहोळे केले दासांचे ॥
ऐसा अपराधी पतित । एकाजनार्दनीं म्हणत ॥

११३. संतसंगतीनें माझें कार्य झालें.

संतसंगतीनें झालें माझें काज । अंतरीं तें निज[2] प्रगटलें ॥
बरवा झाला समागम । अवघा निवारला श्रम ॥
दैन्यदरिद्र दूर गेलें । संतपाउलें देखतां ॥
एकाजनार्दनीं सेवा । करीन मी आपुल्या भावा ॥

---

## ६. साक्षात्कार.

११४. अष्टसात्त्विकभाव उत्पन्न होतांच देव कृपा करतो.

सात्त्विका भरेंणें[3] रोमासीं[4] दाटणें । स्वेदाचें[5] जीवन येऊं लागे ॥
कांपे तो थरारी स्वरूप देखे नेत्रीं । अश्रु त्या भीतरीं वाहताती ॥
आनंद होय पोटीं स्तब्ध जाला कंठीं । मौन्य वाक्पुटीं धरुनि राहे ॥

---

१ दूर झाले. २ स्वरूप. ३ भरती. ४ अंगावरील केंस. ५ घाम.

टाकी श्वासोच्छ्वास अश्रुभाव देखा । जिरवुनी एका स्वरूप होय॥
एकाजनार्दनीं ऐसे अष्टभाव । उत्पन्न होतां देव कृपा करी ॥

११५. कानावाटें मी नयनास येऊन शेवटीं नयनाचा नयन झालों.

कानावाटे मी नयनासी आलों । शेखीं नयनांचा नयन मी जाहालों॥
दृष्टिद्वारा मी पाहें सृष्टी । सृष्टि हारपली माझे पोटीं ॥
ऐसें जनार्दनें मज केलें । माझें चित्ताचें जीवपण नेलें ॥
एकाजनार्दनीं जाणोनि भोळा । माझा सर्वांग जाहला डोळा ॥

११६. एकाजनार्दनीं सर्वांग डोळा बनतो.

चक्षुदर्पणीं[1][2] जग हें पाहा । जगज्जीवनीं मुरुनी रहा ।
तुर्या[3] कालिंदीतीर्थीं नाहा[4] । पापपुण्यासी तिळांजुळि वहा ॥
डोळ्यांनीं सत्य गुरुची खूण । आपुलें स्वरूप घ्या ओळखून ॥ध्रु.॥
तिही अवस्था सांडुनि मागें । अर्धचंद्राच्या चांदण्यांत वागे ।
चांदणें ग्रासुनि त्या ठायीं जागे । गड उन्मनीं झडकरी वेगें ॥
एवढें ब्रह्मांडफळ ज्या देहीं । तें आटलें देखण्याचे पोटीं ।
त्यासी पहातां पाठी ना पोटी । मीतूंपणाची पडली तुटी[5] ॥
चहूंशून्याचा निरसी जेणें । शून्य नाहीं तें शून्यपणें ।
शून्यातीताचि स्वयंभ होणें । शून्य गाळूनि निरशून्यपणें[6] ॥
चार सहा दहा बारा सोळा । ह्या तों आटल्या देखण्याच्या कळा।
कळातीत स्वयंभ निराळा । एकाजनार्दनीं सर्वांग डोळा ॥

---

१ डोळा. २ आरसा. ३ चवथी अवस्था. ४ स्नान करणें. ५ वियोग. ६ अत्यंत शून्य.

११७. डोळ्याचा डोळा उघडा पाहिल्यावर जन्ममरणास पुनः येणार नाहीं अशी खात्री पटली.

जन्ममरणाचें तुटलें सांकडें[1]। कैवल्य रोकडें उभें असे ॥
डोळियाचा डोळा उघड दाविला। संदेह फिटला उरी[3] नुरे ॥
एकाजनार्दनीं संशयाचि नाहीं। जन्ममरण देहीं पुन्हां न ये ॥

११८. चिन्मय आत्मज्योत पाहून एकाजनार्दनाची भ्रांति निरसली.

त्रिभुवनींचा दीपप्रकाशु देखिला। हृदयस्थ पाहिला जनार्दन ॥
दीपाची ती वाती वातीचा प्रकाश। कळिकामय[4] दीप देहीं दिसे॥
चिन्मय प्रकाश स्वयं आत्मज्योति। एकाजनार्दनीं भ्रांति निरसली॥

११९. एकाजनार्दनास सर्वत्र पहांट होऊन अवघा लखलखाट झाला आहे.

पाहलें[5] रे मना पाहलें रे। बुद्धिबोधें इंद्रिया सम जालें रे ॥
नयनीं पहातां न दिसे बिंब। अवघा प्रकाश स्वयंभ ॥
एकाजनार्दनीं पहांट। जनीं वनीं अवनीं[6] लखलखाट ॥

१२०. जिकडे पाहे तिकडे बोधभानूचा उदय होऊन अस्तमानाचें आडनांवही उरलें नाहीं.

बोधभानु तया नाहीं माध्यान्ह। सायंप्रातर्नाहीं तेथें कैंचा अस्तमान ॥

---

१ संकट, २ मूर्तिमंत. ३ बाकी. ४ ज्योतिरूप. ५ उजाडलें. ६ पृथ्वी.

कर्मचि खुंटलें करणेंचि हारपलें । अस्तमान गेलें अस्तमाना ॥
जिकडे पाहे तिकडे उदयोचि दिसे । पूर्वपश्चिम तेथें कैंचा भासे ॥
एकाजनार्दनीं नित्य प्रकाशा । कर्माकर्म जाले दिवसा चंद्र जैसा॥

१२१. एकनाथानें गंगेंत बुडी दिल्याबरोबर जळांत चिन्मयस्वरूप दिसल्यानें गंगा पावन झाली.

जळ स्पर्शों जातां स्नानीं । तंव चिन्मात्र भासे जीवनीं ॥
कैसी वाहताहे गंगा । स्नानीं हारपलें अंगा ॥
अंगत्व मुकलें अंगा । स्नानीं सोंवळी जाली गंगा ॥
एकाजनार्दनीं मज्जन[1] । सकळ तीर्थं जालीं पावन ॥

१२२. स्वयंप्रकाशांत स्नान करून एकभावानें सर्व भूतांस नमन करणें हीच संध्या.

स्वयंप्रकाशामाजी केलें असें स्नान।द्वैतार्थ त्यागून निर्मळ जाहलों॥
सुविद्येचें वस्त्र गुंडोनि बैसलों । भूतदया ल्यालों विभूति अंगीं ॥
संसारासी तीन वोंजळी घातलें पाणी। आत्मत्वालागुनि अर्घ्य दिलें
एका भावें नमन भूतां एकपणीं । एकाजनार्दनीं संध्या जाहली ॥

१२३. एकनाथाची संध्या होऊन त्याचा संदेह गेला.

झाली संध्या संदेह माझा गेला । आत्माराम हृदयीं शेजे आला ॥
गुरुकृपा निर्मळ भागीरथी। शांति क्षमा यमुना सरस्वती।
असीं पदें एकत्र जेथें होतीं । स्वानुभव स्नान हें मुक्त स्थिति ॥
सद्बुद्धीचें घालूनि शुद्धासन । वरी सद्गुरुची दया परिपूर्ण ।
शमदम विभूति चर्चुनी जाण । वाचे उच्चारी केशव नारायण ॥

---

१ स्नान, बुडी. २ अंथरूण. ३ स्थानें.

बोध पुत्र निर्माण झाला जेव्हां। ममता म्हातारी मरोनि गेली तेव्हां
भक्ति बहीण धाउनि आली गांवा।आतां संध्या करूं मी कैशी केव्हां॥
सहज कर्में झालीं तीं ब्रह्मार्पण। जन नोहे अवघा हा जनार्दन।
ऐसें ऐकतां निवती साधुजन। एकाजनार्दनीं बाणली निजखूण॥

### १२४. एकनाथाची घनगर्जना ऐकल्याबरोबर जनार्दनसागरास पूर आला.

वेणुनादाचिया किळा[१]। पान्हा फुटला निराळा॥
आर्तभूत जीव तिन्ही। चातक निवाले जीवनीं॥
स्वानुभवाचे सरिते[२]। जेविं जीवना[३] दाटे भरतें॥
एका एक गर्जे घनीं। पूर आला जनार्दनीं॥

### १२५. देव विटाळेंवीण पोटा आला.

विटाळेंविण पोटा आला। अवघा संसार मिंधा[४] केला॥
लग्न लागतां आला पोटा। मग सोडिलें अंतरपटा॥
वोंकारेसी बुडाली घडी[५]। लग्न लाविलें औटावे घडी॥
एकाजनार्दनीं लग्न समरसें। पाहों गेलिया त्या लाविलें पिसें[६]॥

### १२६. चतुर्भुजरूपाचें दर्शन होऊन संसाराचा ठाव पुसतो.

चतुर्भुज श्याममूर्ति। शंख चक्र ते शोभती।
पीतांबर वैजयंती[७]। रुळती गळां॥
देव देखिला देखिला। तेणें संसाराचा ठावो पुशिला।
विदेही तो भेटला। भक्त तयातें॥

---

१ किरण. २ नदी. ३ पाणी. ४ आधीन. ५ घटका. ६ वेड. ७ रत्नांची माळ.

दोघां होतांचि मिळणी । जुरे देव भक्तपणीं ।
फिटली आयणी[1] । सर्व कोड कठीण ॥
छंद पाहिजे नामाचा । निश्चयो कायामनें वाचा ।
एकाजनार्दनीं त्याचा । देव होय अंकित ॥

### १२७. चतुर्भुज देवास हृदयांतच पाहिल्यानें एकनाथाचा संशय फिटला.

सायासाचें बळ । तें आजि जाहलें अनुकूळ ॥
धन्य जाहलें धन्य जाहलें । देवा देखिलें हृदयीं ॥
एकाजनार्दनीं संशय फिटला । देव तो देखिला चतुर्भुज ॥

### १२८. ध्यानीं, मनीं, शयनीं एकनाथास देवाचें दर्शन.

एक धरलिया भाव । आपणचि होय देव ॥
नको आणिक सायास । जाय जिकडे देव भासे ॥
ध्यानीं मनीं शयनीं । देव पाहे जनीं वनीं ॥
अवलोकी जिकडे । एकाजनार्दनीं देव तिकडे ॥

### १२९. " जागत राम सोवत राम. "

गुरुकृपांजन पायो[2] मेरे भाई । रामबिना कछु[3] जानत नाहीं ॥
अंदर[4] राम भीतर राम । ज्या देखो व्हां रामही राम ॥
जागत राम सोवते[5] राम । सपनोंमे[6] देखुं तो रामही राम ॥
एकाजनार्दनीं भावही निका । जो देखो सो राम सरीका ॥

---

१ त्रास, क्लेश. २ लेइणें, घालणें. ३ कांहीं. ४ आंत. ५ निजलें असता. ६ स्वप्नांत.

### १३०. विठ्ठलावांचून रिता ठाव आतां उरला नाहीं.

मागें पुढें विठ्ठल भरला । रिता[1] ठाव नाहीं उरला ॥
जिकडे पहावें तिकडे आहे । दिशाद्रुम[2] भरला पाहे ॥
एकाजनार्दनीं सर्वदेशीं । विठ्ठल व्यापक निश्चयेशीं ॥

### १३१. देवाचा कसा नवलावो पहा कीं जिकडे पाहीन तिकडे देवच दिसतो.

पहा कैसा देवाचा नवलावो । पाहे तिकडे अवघा देवो ॥
पहाणें परतलें देवें नवल केलें । सर्वही व्यापिलें काय पाहों ॥
पहाणियाचा ठाव समूळ फिटला । अवघा देहीं दाटला[3] देव माझ्या ॥
एकाजनार्दनीं कैसें नवल जाहलें । दिशाद्रुम दाटले देहें सहजीं ॥

### १३२. जेथें तेथें देव उघडाच दिसत असल्यानें निलाजरासा वाटतो.

देवासी कांहीं नेसणें नसे । जेथें तेथें देव उघडाचि दिसे ॥
देव निलाजरा देव निलाजरा । देव निलाजरा पहा तुम्हीं ॥
न लाजे जेथें नाहीं गांव । पांढरा डुकर झाला देव ॥
एकाजनार्दनीं एकल्या काज । भक्ति तेणेंचि नेली लाज ॥

### १३३. देवास नेऊन बाहेर घातलें तरी तो परतून घरांमध्यें येतो.

वैष्णवा घरीं देव सुखावला । बाहेरी नवजे[4] दवंडोनि[5] घातिला ॥
देव म्हणे माझें पुरतसे कोड । संगती गोड या वैष्णवांची ॥

---

१ रिकामा. २ वृक्ष. ३ गच्च भरणें. ४ जात नाहीं. ५ हांकलणें.

जरीं देव नेउनी घातिला दुरी । परतोनि पाहे तंव घराभीतरीं ॥
कीर्तनाची देवा आवडी मोठी । एकाजनार्दनीं पडली मिठी ॥

### १३४. घर सोडून परदेशास गेलों असतां कड्याकपाटांवर श्रीहरि दिसून माझा एकांत नाहींसा झाला.

घर सोडोनि जावें परदेशा । मजसवें देव सरिसा ॥
कडेकपाटें[1]सी वरी । जिकडे पाहे तिकडे हरी ॥
आतां कोणीकडे जावें । जिकडे पाहे तिकडे देव ॥
एका बैसला निरंजनीं[2] । न जाइजे जनीं वनीं ॥

### १३५. अंतरीं बाहेरी एकमय होऊन गेलें.

जिकडे जावें तिकडे देवचि सांगातें । ऐसें केलें नाथें पंढरीच्या ॥
शब्द तेथें जाला समूळचि वांव[3] । गेला देहभाव हारपोनि॥
अंतरीं बाहेरीं एकमय जाहलें । अवघें कोंदाटलें[4] परब्रह्म ॥
एकाजनार्दनीं ऐसी जाहली वृत्ति । वृत्तीची निवृत्ति चिदानंदीं ॥

### १३६. मन रामांत रंगून रामरूपच होऊन गेलें.

मन रामीं रंगलें अवघें मनचि राम झालें ।
सबाह्य अभ्यंतरीं अवघें रामरूप कोंदलें ॥ ध्रु ॥
चित्तचि हारपलें अवघें चैतन्याचि झालें ।
देखतां देखतां अवघें विश्व मावळलें ।
पहातां पहातां अवघें सर्वस्व ठकलें ॥ १ ॥

---

१ गुहा. २ देव. ३ व्यर्थ. ४ भरलें.

आत्मयारामाचें ध्यान लागलें मज कैसें ।
क्रियाकर्म धर्म अवघें येणेंचि प्रकाशे ।
सत्य मिथ्या प्रकृति-पर रामचि अवघा भासे ॥ २ ॥
भक्ति अथवा ज्ञान शांति आणिक योग स्थिति ।
निर्धारितां न कळे रामस्वरूपीं जडली प्रीति ।
एकाजनार्दनीं अवघा रामचि आदिअंतीं ॥३॥

१३७. एकनाथाची स्वराज्यप्राप्ति.

हरिखाची गुढी बोधावा[1] आला ।
अहंकार गजेंतु अविवेकु मारिला ॥
संतोषें विवेक आपआपणिया विसरला ।
लाजुनी महा हारुष आनंदासी गेला ॥
मारविला क्रोध ममता सती निघाली ।
तुटला मत्सर शांति सुखें सुखावली ॥
एकाजनार्दनीं पाहतां सहजीं पैं सहजें ।
स्वराज्य सांग[2] तेथें नाहीं पैं दुजें ॥

१३८. आम्हीं मरून जिवावांचून जिवंत राहिलों.

देह जाईल तरी जावो राहील तरी राहो ।
दोराचियां सर्पा जिणें[3] मरणें ना वावो ॥
आम्हीं जितांचि मेलों जितांचि मेलों ।
मरोनियां जालों जीवेंविण ॥
मृगजळाचें जळ भरलें असतां नाहीं ।

१ बोध, २ संपूर्ण. ३ जगणें.

आटलिया तेथें कोरडें होईल काई ॥
एकाजनार्दनीं जगचि जनार्दन ।
जिणें मरणें तेथें सहज चैतन्यघन ॥

१३९. आतां आम्हांस अवघें त्रैलोक्यच आनंदाचें झालें आहे.

अवघेंचि त्रैलोक्य आनंदाचें आतां ।
चरणीं जगन्नाथा चित्त ठेलें ॥
माय जगन्नाथ बाप जगन्नाथ ।
अनाथाचा नाथ जनार्दन ॥
एकाजनार्दनीं एकपणें उभा ।
चैतन्याची शोभा शोभलीसे ॥

१४०. एकाजनार्दनापुढें देव स्वयमेव उभा असल्यानें देवभक्त ही भाषा निरसून गेली.

अभेद भजनाचा हरिखं[1] । देव भक्त जाहले एक ॥
कोठें न दिसे भेदवाणी । अवघी कहाणी[2] बुडाली ॥
हारपलें देवभक्तपण । जनीं जाहला जनार्दन ॥
देव भक्त नाहीं मात । मुळींच खुंटला शब्दार्थ ॥
एकाजनार्दनीं देव । पुढें उभा स्वयमेव ॥

१४१. डोळे भरून परब्रह्माच्या सुखाचा सोहळा मी पाहिला.

माझें मीपण देहींच मुरालें[3] । प्रत्यक्ष देखिलें परब्रह्म ॥
परब्रह्म सुखाचा सोहळा । पाहिलासे डोळां भरुनीयां ॥

---

१ आनंद. २ कथा. ३ नाहींसें झालें.

ब्रह्मज्ञानाची ते उघडली पेटी। जाहलें पोटीं शीतळ जाणा ॥
एकाजनार्दनीं ज्ञानाचें तें ज्ञान। उघड समाधान जाहलें जीवा ॥

१४२. एकानेक जनार्दनाच्या ठायीं एका एकपणें जडून गेला.

पाहों गेलों देवालागीं। देवरूप जालों अंगीं ॥
आतां मीतूंपणा ठाव। उरला नाहीं अवघा देव ॥
सुवर्णाचीं झालीं लेणीं। देव झाला जगपणीं ॥
घटीं मृत्तिका वर्तत। जगीं देव तैसा व्याप्त ॥
एकानेक जनार्दनीं। एका जडला एकपणें ॥

१४३. आतां मी पूजा करूं गेल्यास माझी मीच सेवा केल्याप्रमाणें होईल.

देवपूजे ठेवितां भावो। तो स्वयेंचि जाला देवो ॥
आतां कैसेनि पूजूं देवा। माझी मज होतसे सेवा ॥
अन्न[1] गंध धूप दीप। तेंही माझेंचि स्वरूप ॥
एकाजनार्दनीं करी पूजा। तेथें पूज्य पूजकु नाहीं दुजा ॥

१४४. जोंपर्यंत आपली आपण पूजा करण्याची राहाटी नाहीं तोंपर्यंत आपली पूजा करणाऱ्यापेक्षां अज्ञान बरा.

आपुली पूजा आपण करावी। ही जंव ठावी राहाटी[2] नाहीं ॥
कासया ती पूजा जाणिवेचा शीण। त्याहुनी अज्ञान बरा दिसे ॥
एकाजनार्दनीं ज्ञानाज्ञानें। पूजावे श्रीचरण विठोबाचे ॥

---

१ अत्तर. २ व्यवहार.

## १४५. अहं ब्रह्मास्मि.

मी तो स्वयें परब्रह्म । मीचि स्वयें आत्माराम ॥
मी तों असें निरुपाधि । मज नाहीं आधि[1]व्याधि ॥
मी तो एकट एकला । द्वैतभाव मावळला ॥
मजविण नाहीं कोणी । एका शरण जनार्दनीं ॥

## १४६. "कोहं ओहं सोहं" पलीकडचा बोध.

नामपाठें निवृत्तिज्ञानदेवा उपदेशी । ओहं सोहं कोहं साक्षी केले॥
तिन्हीपरता बोध तयासि बोधिला । नामपाठें झाला शांतरूप ॥
जनार्दनाचा एका गमोनि मनासी । लागतो चरणांसी जनार्दना ॥

## १४७. जें जें दृष्टीस दिसें तें तें ब्रह्मरूप आहे.

कैवल्यनि[2]धान तुम्हीं संतजन । कायावाचा मन जडलें पायीं ॥
सर्वभावें दास आंकित अंकिला । पूर्णपणें जाहला बोध देहीं ॥
जें जें दृष्टीं दिसें तें तें ब्रह्मरूप । एकाजनार्दनीं दीप प्रज्वाळिला ॥

## १४८. सर्वं खल्विदं ब्रह्म ।

मीच देवो मीच भक्त । पूजा उ[3]पचार मी समस्त ॥
हीच उपासना भक्ति । धर्म अर्थ सर्व पुरती ॥
मीच गंध मीच अक्षता । मीच वाहें मीच पुर्ता ॥
मीच धूप मीच दीप । मी माझें देखें स्वरूप ॥
मीच माझी करी पूजा । एकाजनार्दनीं नाहीं दुजा ॥

---

१ चिंता, व शारीरिक रोग. २ मोक्षाचा ठेवा. ३ साहित्य.

### १४९. अष्टही दिशांस देव परिपूर्ण भरल्यानें पूर्वपश्चिमभाव उरला नाहीं.

अष्टही दिशा पूर्ण भरला देव । मां[1] पूर्व पश्चिम भाव तेथें कैंचा ॥
पाहे तिकडे देव व्यापुनि भरला । रिता ठाँव उरला कोठें नाहीं ॥
समाधि समाधान मनाचें उन्मन । मीदेवा भिन्नपण नाहीं नाहीं ॥
एकाजनार्दनीं एकपणासाठीं । देव पाठीं पोटीं भक्तामागें ॥

### १५०. उत्तम भूमि शोधून गुरुवचनबीज पेरिल्यावर आलेल्या अनंत पिकाची गणती करणारा कोण ?

भूमि शोधोनि साधिलें काज । गुरुवचन बीज पेरियेलें ॥
कैसें पीक पिकलें प्रेमाचें । साठवितां गगन टोंचें[2] ॥
सहा[3] चारी[4] शिणले मापारी[5] । सकळ नव्हे अद्याप वरी ॥
एकाजनार्दनीं निजभाव । देहीं पिकला अवघा देव ॥

---

१ मग. २ लहान. ३ सहा शास्त्रें. ४ चार वेद. ५ मोजणारा. ६ संपूर्ण.

# संतवचनामृत

## अभंगसूचि

### निवृत्तिनाथ

## ज्ञानदेव

## सोपानदेव



## मुक्ताबाई



## चांगदेव



## नामदेव

## गोरा कुंभार



## विसोबा खेचर

## सावता माळी



## नरहरि सोनार



## चोखामेळा



## जनाबाई

## सेना न्हावी



## कान्होपात्रा



## भानुदास

## जनार्दन स्वामी



## एकनाथ